॥ श्रीपांडुरंग ॥

# अर्पण - पत्रिका

ज्यांच्या परमपवित्र चरणकमलसान्निध्यामुळें
आबालगोपाल स्त्रीपुरुष लहानथोरांस
भजन - भक्ति - प्रेम - भाव - निष्ठादि
उत्पन्न झाले व होत आहेत ;
निर्भीड, सडेतोड, प्रभावी
प्रवचनामुळें दुर्बोध असा वेदांत
समजूं व पटूं लागला आहे अशा
स्वानंदसम्राट् - तेजस्वी - भक्तकामकल्पद्रुम - दयार्णव
श्री ११०८ श्रीसच्चिदानंद अभिनव विद्याशंकर भारती स्वामी

## श्रीसंत कल्याणसेवक महाराज

श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य महाराज
संस्थान मठ संकेश्वर - करवीर
श्रीसंस्थानदेवता - पदकमलीं
हें भक्तिमाला पुष्प चौथें
श्रीअभंगवाणी
सविनय समर्पण.

—आचार्य भजनी मंडळ, संकेश्वर.

१.१०८ श्रीसच्चिदानंद अभिनवविद्याशंकर भारतीस्वामी
श्रीसंत कल्याणसेवकमहाराज



श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्यमहाराज
संस्थान मठ संकेश्वर – करवीर

श्रीपांडुरंग प्रसन्न

# भक्तिरेव गरीयसी।

## प्रकाशकाचें निवेदन

भक्तिज्ञानविरागार्थं कर्तव्यं भजनं सदा।

रामनामप्रभावेण प्रसन्नो वरदो हरिः।

'**श्रीअभंगवाणी**' हा ग्रंथ आज आमच्या आचार्य भजनी मंडळ, संकेश्वर भक्तिमालेचें चौथें पुष्प म्हणून प्रसिद्ध होत आहे. ही श्रीपांडुरंग – श्रीज्ञानेश्वर – माऊली – श्री ११०८ श्रीसच्चिदानंद अभिनव विद्याशंकर – भारतीस्वामी श्रीसंतकल्याणसेवक महाराज – श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य संस्थानमठ संकेश्वर– करवीर यांचीच कृपा होय; यांत तिलप्राय शंका नाहीं. कारण १९५७ सालीं दीपावलीस आचार्यभक्त श्री. महादेव गणेश गुणे, ४८५ नारायण पेठ, पुणे २. यांनी **कल्याणभजनावली** भाग पहिला प्रकाशित केला. तेव्हांच **कल्याणभजनावली** भाग दुसरा (अभंगादि) लवकरच प्रकाशित करण्याचें ठरलें. त्यानंतर सोमवार दि. ११ नोव्हेंबर १९५७ रोजीं श्रींची स्वारी संकेश्वरीं आली.

**श्रींची स्वारी** येथें आल्यानंतर थोडा काळ मध्यंतरीं गेला. नंतर येथेंहि **कल्याणभजनावली** भाग दुसरा छापण्याच्या विचारास सुरुवात झाली. पण प्रत्यक्ष कृतींत येईना म्हणून श्रीआचार्यसेवक श्री. सदाशिव रामचंद्र हुकेरी संकेश्वर, (बेळगांव) यांनीं '**श्रींचें थोडक्यांत चरित्र व कल्याण-पद्यावली**' हें पुस्तक संपादित व प्रकाशित केलें. आणि हेच या **श्रीअभंगवाणीचे** संपादक आहेत.

आतांपर्यंत श्रींना येथें येऊन तीन वर्षें झालीं. तरीहि या पुस्तकांबद्दल विचारच सुरू होते. परंतु सर्व अभंगांचें वर्गीकरण होऊन प्रत्यक्ष प्रकाशन मात्र आज होत आहे. ही ईश्वरी लीला-माया होय.

श्रींच्या शेकडों प्रासादिक अभंगांपैकीं या ५२५ अभंगांचें मार्मिक वर्गीकरण अध्यात्मशास्त्रविशारद श्री. ग. वि. तथा काकासाहेब तुळपुळे, सेवानिवृत्त डेप्युटी

पी एम् जी सागली यानीं केल असलेमुळें व 'अभगांतील शिक्षण' त्यांनींच लिहिली असलेमुळें श्रींची स्वारी आणि श्री काकासाहेब तुळपुळे हा **मणिकांचनयोग** भगवत्कृपेनें जमून आल्यामुळें वाचकाची मोठीच सोय झाली आहे

या पुस्तकात एकूण ५२५ अभग असून त्याचे दोन भाग केलेले आहेत परमार्थपथ व सकीर्ण प्रथम भागात १६ प्रकरणात ४०४ अभग व दुसऱ्या भागात ५ प्रकरणें व उरलेले १२१ अभग आहेत सर्वच अभग रसाळ, गोड, प्रासादिक असलेमुळें त्यात सरस निरस हा प्रश्नच उद्भवत नाहीं तथापि प्रत्येकाची रुचि भिन्न असलेमुळें ज्याच्या-त्याच्या रुचीप्रमाणें म्हणा अगर स्वभावाप्रमाणें कमी-जास्त प्रमाणात अभगाची आवड राहणार कारण सर्वश्रुतच आहे, 'व्यक्ति तितक्या प्रकृति' कोणास भक्तिप्रधान, कोणास नामप्रधान, कोणास सत्सगप्रधान तर कोणास चिकित्साप्रधान – विचारास धक्का देणारे अभग आवडतील

श्री श्रीपादराव जगनाथ गानू, व्यवस्थापक, राजगुरु प्रेस, पुणें २, यानीं अल्पावधींत आपुलकीनें छपाईचें सुबक व उत्तम काम करून दिलें याबद्दल आम्ही सर्वप्रकारें त्याचे आभारी आहोंत. तसेंच श्री सदाशिव रामचद्र हुक्केरी, श्री एकनाथ विष्णुपत रेळेकर, सकेश्वर, (बेळगाव), श्री ग वि तथा काकासाहेब तुळपुळे, सागली, श्री रामभाऊ शिवराम सहस्रबुद्धे, माजी 'केसरी' सहसपादक, श्री महादेव गणेश गुणे, पुण २, आदि ज्यानीं ज्यानीं ज्या कामीं मदत केली त्याचे आम्ही उपकृत आहोत

श्रींचा कृपा आशीर्वाद तर आमचेवर आहेच आहे तो वृद्धिंगत व्हावा हीच चरणीं प्रार्थना

**श्रीअभंगवाणी** जनता जनार्दनास आवडून आबाल गोपाल सर्वांचें इहपर कल्याण साधो अशी श्रीपाडुरग - ज्ञानेश्वर माऊली – श्रीमदाचार्यचरणीं हार्दिक अभ्यर्थना करून हें निवेदन सपवितो

श्रीरामनवमी, शके १८८२
दि ५-४-१९६०
सकेश्वर, (बेळगाव)

आचार्य-पाडुरगभक्त,
**श्रीकृष्ण ज्ञानदेवशास्त्री एकसबेकर,**
अध्यक्ष, आचार्य भजनी मडळ, सकेश्वर.

श्रीगुरुदत्त प्रसन्न

# संपादकाचें कथन

आचार्यभक्त श्री. महादेव गणेश गुणे, ४८५ नारायण पेठ, पुणें २ यांनीं १९५७ सालीं दीपावलीस **कल्याण – भजनावली**, भाग पहिला, श्रींच्या रसाळ पदपदांतरांनीं युक्त असें पुस्तक प्रकाशित केलें आणि या पुस्तकांत **कल्याण – भजनावली**, भाग २ रा, अभंगात्मक लवकरच प्रसिद्ध होईल असें छापलें आहे. आज या गोष्टीला तीन वर्षे पूर्ण झालीं. त्या वेळीं श्रींची स्वारी श्री १९०८ श्रीसच्चिदानंद अभिनव विद्याशंकरभारतीस्वामी श्रीसंत कल्याणसेवकमहाराज श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्यमहाराज संस्थान मठ संकेश्वर – करवीर हे पुण्यासच होते. सोमवार दि. ११ नोव्हेंबर १९५७ रोजीं **श्रींची स्वारी** संकेश्वरीं आली. आणि तेव्हांपासून आजतागायत श्रींचें प्रवचन सायंकाळीं ६॥ ते ८ पर्यंत अखंड चालूच आहे. दररोज प्रवचनाचे शेवटीं श्री स्वकृत संस्कृत अगर मराठी कवन, पद, अभंग सांगतात. कधीं कधीं हिंदी कवनंदेखील त्यांनीं स्वयस्फूर्तीनें केलेलीं सांगतात. तीं अनेकांनीं लिहून पण घेतलीं आहेत. तीं सर्व एकत्रित करून छापावींत म्हणजे आबालगोपाल आम जनतेस उपयोग होईल म्हणून सतत प्रयत्न चालू होते व तसे सुमारें पांच - सहाशें अभंग एकत्रित झालेहि. येथील आचार्य भगिनी - मंडळींकडून अडीच - तीनशे अभग आणि 'आचार्य सेविका मंडळ'- पुणें यांचेकडून दोन - अडीचशे अभंग मिळाले. त्या सर्वांचें वर्गीकरण करण्याचें काम चालू होतें आणि लोकांचा फारच आग्रह झाला कीं, रथोत्सवास श्रींचीं कांहीं पुस्तकें प्रसिद्ध होतील तर बाहेरगांवाहून उत्सवास येणाऱ्या लोकांना त्याचा लाभ होईल. म्हणून त्या वेळीं आम्ही दि. १४ फेब्रुवारी १९५९, रथसप्तमी, श्रींच्या वाढदिवशींच ' दुधाची तहान ताकावर भागवावी ' म्हणून **श्रींचें थोडक्यांत चरित्र व कल्याण – पद्यावली** सुमारें १४ – १५ पदें- व ४० – ४२ अभगांचें पुस्तक प्रसिद्ध केलें व त्या वेळींहि **कल्याण – भजनावली**, भाग दुसरा, अभंगादि लवकरच प्रसिद्ध होईल, असें आचार्य – सेवा मंडळाकडून प्रसिद्ध झालें.

त्यानतरहि आता वर्षांनीं कल्याण - भजनावली, भाग दुसरा या पुस्तकाच्या प्रसिद्धीचा योग जमून आला आहे आणि तो योग म्हणजे असा — येथील श्रीआचार्य मठात गीताजयति उत्सव दि ८ डिसेंबर ते १० डिसेंबर अखेरपर्यंत माठ्या थाटामाटात पार पडला [ गीताजयति - उत्सव श्रींची स्वारी येथें आल्यापासूनच सुरू झाला आहे ] त्या वळीं सागलीचे प्रसिद्ध अध्यात्मशास्त्रविशारद श्री ग वि तथा काकासाहब तुळपुळे, सेवानिवृत्त डी पी एम् जी याची श्रींच्या ( श्रीसत कल्याणसेवक महाराजाच्या ) अध्यक्षतेखालीं सुश्राव्य, सुललित व उद्बाधक अशीं प्रवचनें 'भगवद्‌गीता साक्षात्कारदर्शन' या विषयावर झालीं गीताजयतीचे शुभ मुहूर्तावरच दि १०-१२ ५९ रोजीं येथील 'आचार्य भजनी मडळ सकेश्वर' ( जि बेळगाव ) यानीं भक्तिमाला पुष्प पहिलें, श्री काकासाहेब तुळपुळे याचे अमृतहस्त प्रकाशित केलें नतर दुसरे दिवशीं ते श्रींचे दर्शनास डॉ जोशी व श्री ना द हरिदाससह आले त्या वेळीं आम्हीं त्याना श्रींचे ५ — ६ शें अभग, शिवाय श्रींचे अनेक अप्रकाशित व प्रकाशित ग्रथ दाखविले त्यानीं ते सामान्यत चाळून पाहून समाधान व्यक्त केलें नतर मी त्याना सहज म्हणालों कीं, "काका, या अभगाचें वर्गीकरण करावयाचें आहे आपण करू शकाल का?" तेव्हा ते लागलेच उत्तरले कीं, 'आम्ही पोष्टातील मडळी आम्हाला सॉर्टिंग करण्याचा अभ्यास ( सराव ) आहे तेव्हा हें वर्गीकरणाचें काम आमचेंच आहे आम्हीं अवश्य करू.' हे श्री काकाचे आनद, उत्साह व आपुलकीचे शब्द अद्याप माझ्या कानात घुमत आहेत

श्री काकानीं सागलीस जाण्यापूर्वी तुम्हीं सर्व अभग स्वतत्र असे लिहून पाठवा म्हणजे आम्हाला भरभर वर्गीकरण करता येईल असें सांगितलें त्याप्रमाणे आम्हीं दि २०-१२-५९ रोजीं सर्व अभग काकाच्याकडे सागलीस पाठविले त्यानीं थोड्याच दिवसात अभगाचें वर्गीकरण करून पाठविले. ( त्यानतर आणखीन सुमारें ५-६ शें अभग श्रींनीं विरचिलेले उपलब्ध झाले आहेत ) श्री काकासाहेब तुळपुळे याचेकडे पाठविलेल्या ५-६ शें अभगाचे त्यानीं दोन भाग व २१ प्रकरणें केलीं आहेत प्रथम भाग 'परमार्थपथ' यात १६ प्रकरणें असून त्यात ४०४ अभग आलेले आहेत दुसऱ्या भागात सकीर्ण अभग असून त्याचीं ५ प्रकरणें असून त्यात

सुमारें १२५ अभग आहेत. या वरील माहितीवरून या पुस्तकप्रसिद्धीचा अचानक योग असा जमून आला. मात्र नांव बदललें. '**श्रीअभंगवाणी**' पुष्प चौथें म्हणजेच **कल्याण भजनावली**, भाग दुसरा (अभगादि) पण आतां याला भक्तिमाला पुष्प चौथें 'श्रीअभगवाणी' असें नाव प्राप्त झालें आहे.

श्री. काकासाहेब तुळपुळे यांनीं 'अभंगांतील शिकवण' म्हणून या श्रीअभगवाणींतील प्रथम भागावर साधकांना मार्गदर्शन होईल असें परमार्थ-पथाचें सुलभ व उत्तम प्रकारें मार्गदर्शन केलें आहे. तें स्वतत्रपण दिलेंच आहे. दुसऱ्या भागावर मात्र त्यानीं विशेष लिहिलें नाहीं. ('अभगांतील शिकवण' हा स्वतत्र लेख पुढें दिला आहे तो पहा)

आम्हीं सामान्य जन. आम्हांला परमार्थपथाचा गध नाहीं तरी पण श्री. काकासाहेबानीं सुस्पष्ट व सुलभ लिहिलेली 'अभगांतील शिकवण' कोणालाहि कळू शकेल अशीच आहे

दुसऱ्या भागांत प्रथमच १७ वें प्रकरण 'तत्त्वज्ञान' म्हणून आहे. त्यांतलें आम्हांस फारसें कळलें नाहीं. तो विषय तत्त्वज्ञानी लोक जाणोत. त्यानंतर १८ व्या प्रकरणांत गीताविषयक ११ अभग आहेत. १८ व्या प्रकरणांत अनेक ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, रामदास, रामकृष्ण आदि संत महानुभावांचें स्तवन आहे २० वें प्रकरण मात्र आधुनिक काळांतील धर्माची ग्लानी, धर्माला कोणी त्राता वा रक्षक नाहीं. हिंदुमात्रानें संघटना करून ही दुरवस्था नष्ट करावी. आदि विचार आबालवृद्धाना चटका लावण्यासारखे आहेत. शेवटचें प्रकरण विविध विषय म्हणून आहे. त्यात खरोखरीच विविध विषय आहेत. प्रथम ५०० ते ५०३ या चार अभंगात नारद – नारायण संवादात्मक एका कथानकाचा भाग आलेला आहे. तो नीट सर्वांना समजावा म्हणून ती कथा येथें थोडक्यांत देत आहें.

एकदां देवर्षी नारद नारायणांकडे गेले असतां नारायण ध्यानमग्न बसले होते; म्हणून नारदांनीं त्यांना विचारलें, "हे नारायण ऋषे, सर्व लोक आपली भक्ति करतात, मग आपण कोणाची भक्ति करतां?" या प्रश्नाचें नारायणांना आश्चर्य वाटलें नाहीं त्यानीं नारदाला उत्तर दिलें, "ईश्वर-

साक्षात्काराचा हा ध्यानमार्ग शब्दानीं समजावून सागता येत नाहीं ईश्वर-साक्षात्काराच्या मार्गाचें ज्ञान प्राप्त होणें फार कठीण आहे," असें सामान्य-पणें सांगून, नारायण नारदाला म्हणाले, "मेरुपर्वताकडे श्वेतद्वीपाला जा तेथें बृहस्पति, एकत, द्वित, त्रित व वसुउपरिचर हे पाच पुरुष परमार्थसाधना करीत आहेत त्याचें काळजीपूर्वक निरीक्षण कर व मग परत ये "

नारद श्वेतद्वीपाला गेले तेथें पाच पुरुष एक यज्ञ करीत होते त्यात बृहस्पति हा अध्वर्यु असून एकत, द्वित व त्रित हे सदस्य होते व वसुउपरिचर हा यजमान होता येथें एक मोठी मनोवेधक गोष्ट सागितली आहे तिच्या-वरून असे दिसतें कीं, बृहस्पतीचें मन सहिता व ब्राह्मण यातच गुतलेलें होतें व हिंसायुक्त यज्ञाकडे त्याची प्रवृत्ति होती म्हणून त्याला ईश्वराचं दर्शन होऊ शकलें नाहीं तसेंच एकत, द्वित व त्रित याना महाभारतात ब्रह्मयाचे पुत्र व महर्षि असें म्हटलें तरी, त्यानीं शेकडों वर्षें केवळ शरीरशोषणाचें तप केलेलें असल्यामुळें, त्यानाहि ईश्वरप्राप्ति झाली नाहीं. केवळ तपानें, देहदडनानें साधकाला ईश्वरप्राप्ति होत नाहीं, म्हणून त्याना ईश्वरदर्शन होऊ शकलें नाहीं परतु वसुउपरिचराच चित्त आरण्यकें व उपनिषदें याच्या विचारात गढलें होतें इतर चौघापेक्षा तो अधिक भक्तिमान् होता किंबहुना त्या सर्वांमध्यें तो एकटाच खरा भक्तिमान होता व तो हिंसाहि करीत नसे म्हणून त्याला मात्र देवाचें दर्शन झालें त्याची श्रद्धा अशी होती कीं, **देहपीडनानें, तपानें, देव दिसणार नाहीं, तर भाव – आंतरिक भक्ति – असेल तरच तो दर्शन देईल** याप्रमाणें प्रसन्न होऊन देवानें वसुउपरिचराला आपलें रूप दाखविलें त्या दर्शनान त्याला फार समाधान झालें यावरून असं दिसतें कीं, वसुउपरिचराला नारदाच्याहि पूर्वी नारायणाकडून अध्यात्मज्ञान मिळालें होतें तो नारदापूर्वींचा नारायणाचा शिष्य होता

नारद नारायणाकडे परत आल्यावर त्यांना असें दिसून आलं कीं, याच्या-मध्य ऐकातिक भक्तीचा मोड उगवला आहे नारद आता साक्षात्कारमार्ग आक्रमण्याला अवश्य तो अधिकार प्राप्त करून घेऊन आले होते त्याना नारायणांनीं 'ऐकान्तिकोत्तम' अशा गौरवपूर्ण नावानें सबोधिलें.

**न च मां ते ददृशिरे न च द्रक्ष्यति कश्चन ।**
**ऋते ह्यैकान्तिकश्रेष्ठात् त्वं चैवैकान्तिकोत्तमः ॥**

माझें दर्शन घेण्याच्या इच्छेनें एकत, द्वित व त्रित हे ऋषि इकडे आले. त्याना मीं सागितल हे मुनींनो, तुम्ही आलात तसे लवकर परत जा अमच्याना त्या देवाच केव्हाहि दर्शन होणार नाहीं तेजामुळें त्याला पाहूणें कठीण आहे, त्या **भगवताचें दर्शन दीर्घकालानें अनन्यभक्ति प्राप्त झाल्यावरच होऊं शकतें.** त्याना माझ दर्शन झालें नाहीं व ऐकान्तिक भाक्ति असल्यावाचून कोणालाहि होणार नाहीं हे नारदा, तू मात्र ऐकान्तिक भक्तात श्रेष्ठ आहेस

नतर नारायणानीं नारदाला परमार्थमार्गाचा उपदेश केला नारदाच्या *ठिकाणीं साधकाला आवश्यक असे सर्व उत्कृष्ट गुण होते म्हणून त्यानीं* साधन करून आपली उत्तम अध्यात्मिक उन्नति करुन घेतली नारदाला विश्वरूपदर्शन झाल हें पाहून त्याला नितान्त समाधान झालें त्यावेळीं नारद म्हणाले, " हे प्रभो, तुझ मला दर्शन झाल हें माझ्या तपाचें व यम नियमाच मला आज एकाच वेळीं फल मिळालें तू पुराणपुरुष आहेस विश्वदर्शी, सर्वमूर्ति सिंह असा महाप्रभु आहेस तुझें दर्शन झालें ही माझ्यावर तुझी महान् कृपा आहे "

[ श्री ग वि तुळपुळे, सेवानिवृत्त डे पी एम् जी, सागली **भगवद्गीता साक्षात्कारदर्शन** पृ ८७ ते ९१ आधारें ]

अभग ५०८, ५१८ ते ५२२ या सहा अभगात पारतन्त्र्य हें दुःख व स्वातन्त्र्य हें सुख असें पटविलें आहे ( सर्वं परवश दुःख, सर्वमात्मवश सुखम् ) अभग ५११ व ५१२ यात सोवळें व ओवळें हा भ्रम असून शुचिर्भूतपणा हें खरें सोवळ होय देवाला कधींच विटाळ होत नाहीं हा महत्त्वाचा विचार पहावयास मिळतो आधुनिकाना यापासून मार्गदर्शन होईल अभग ५१५, ५१६, व ५१७ या तीन गौळणी असून आतरिक ऐकातिक भक्तिप्रेम काय असेल याची कल्पना येऊ शकेल.

या पुस्तकातील आणखी एक विशेष म्हणजे आजवर सस्कृतमध्यें अभंगवृत्त नव्हतें तें यात अभग २, ३, १४, १६, ५८ व २३२ हे सहा अभग सस्कृतमध्यें असून ते सर्वांना सहज समजतील असेच आहेत

हे वर्गीकृत अभंग हातीं आलेवर प्रेसकॉपी करणें, अभंगसूचि करणें, सुलभतेनें साधकाना वाचतांना अभंगांचा अर्थ आकलन व्हावा म्हणून शब्दकोश निर्माण करणें, (हा शब्दकोश श्रींच्या प्रवचनांतून ज्या ज्या वेळीं अभंगादिकांचें स्पष्टीकरण केलें जात असे त्या त्या वेळीं घेतलेल्या टिपणांच्या आधारें केलेला आहे.) वरील सर्व कामें करावीं आणि करवून घ्यावीं लागलीं. त्यामुळच पुस्तकरूपांत तयार होणेस विलंब लागला (त्या काळांत आचार्य भजनी मंडळाची भक्तिमाला, पुष्प दुसरें '**स्तोत्रगुच्छ**' आणि पुष्प तिसरें '**श्रीचरित्रपरिचय**' प्रकाशित झालें) ज्यानीं ज्यानीं या पुस्तकाच्या कार्यी मदत – सहाय्य केलें त्या सर्वांचे आम्ही ऋणि आहोंत.

हें श्रीअभंगवाणी पुस्तक सर्व जनास सर्व प्रकारें उपयुक्त व्हावें म्हणून शक्य तों यथाबुद्धि प्रयत्न केला आहे. प्रथमतः **पंचपदी** पण दिलेली आहे. व सर्व प्रकरणाचा साकल्यान अर्थ थोडक्यात व स्पष्ट कळावा म्हणून विस्तृत अनुक्रमणिकाहि दिलेली आहे म्हणून सर्व जनताजनार्दनांस हें पुस्तक आवडेल अशी आशा आहे.

ज्या श्रींच्या सानिध्यानें उत्साहवर्धक कृपा आशीर्वादानं हा **अभंगसंग्रह** करून जनता – जनार्दनाच्या हातीं देता आला त्या, श्री. ११०८ श्रीसच्चिदानंद अभिनव विद्याशंकर भारती स्वामी श्रीसत कल्याणसेवकमहाराज श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य, सस्थान मठ सकेश्वर – करवीर याचे परमपवित्र चरणकमलीं अंतःकरणपूर्वक ही अत्यल्पकृति सादर समर्पण करीत आहे

आचार्यसेवक

रंगपंचमी शके १८८२
गुरुवार १७–३–६०.

**सदाशिव रामचंद्र हुक्केरी.**
सकेश्वर (बेळगाव).

---

# अभंगांतील शिकवण

( अध्यात्मशास्त्रविशारद श्री. ग. वि. तथा काकासाहेब तुळपुळे, रि. डे पी एम्. जी , सांगली. )

प्रस्तुत पुस्तकांत जरी स्फुट अभंग दिलेले असले तरी त्यांत परमार्थाच्या शिकवणीचें सूत्र आहे. तसें सूत्र नसेल तर भजनासाठीं त्यांचा उपयोग होणार नाहीं, किंवा मुमुक्षूना त्यातून मार्गदर्शनहि होणार नाहीं या अभगात समग्र परमार्थमार्गाचें विवेचन केलेलें आहे तें संक्षिप्त रूपकानें वाचकांच्या समोर माडलें असता हे अभंग अधिक उपयुक्त होतील, असें वाटलें. म्हणून तसा प्रयत्न खालीं केला आहे. अभंगांचे दोन भाग केले आहेत. ( १ ) परमार्थपथ व ( २ ) संकीर्ण. खालीं पहिल्या भागाचें सारच मुख्यतः द्यावयाचें आहे. दुसऱ्या भागाचा उल्लेख शेवटीं अगदीं थोडक्यात केला जाईल.

## भाग १ — परमार्थपथ, प्रकरणें

## ( पाकळ्या ) १ ते १६

प्रक. १-२:— पहिल्या प्रकरणांत ईशस्तवन करून दुसऱ्यात भक्तिमार्गाकडे कां वळावें हें सांगितलें आहे परमार्थपथावर पाऊल ठेवण्यापूर्वी उद्भवणाऱ्या प्रश्नांचें हें उत्तर आहे. संसारातील सर्व गोष्टी नश्वर आहेत, शाश्वत कांहीं नाहीं; ज्यांचा मोह वाटतो ते सर्व सुखाचें सोयरे होत. जरा-मृत्यूच्या यातना कठीण. मृत्यूपासून कोणी सोडवू शकत नाहीं. विषयाचें सुख खोटें, वस्तुतः दुःखच तें. ससारांत कष्ट करून सुख मिळत नाहीं. शाश्वत सुख ईश्वरप्राप्तीनें मिळतें. रामच खरा सोयरा. तोच सर्व प्रकारें रक्षण करतो. आत्मलाभापरता लाभ नाहीं. म्हणून ससारात न गुततां भक्तिमार्गानें रामकृपा व रामदर्शन प्राप्त करून घ्यावें, यातच जीवनाची सफलता व सार्थकता आहे.

प्रक. ३-४ :— परमार्थमार्ग आक्रमावयाचा असेल तर दुर्गुणांचा त्याग करून सद्‌गुण अंगीं आणले पाहिजेत. विषयासक्ताला भक्तीच करणें शक्य नाहीं; मग ईश्वरप्राप्ति कशी होणार ! म्हणून विषयत्याग केला पाहिजे; मन मुंडलें पाहिजे. विठ्ठलमात्रा घेणारानें परस्त्री-परधनाचीं पथ्यें सांभाळलीं पाहिजेत. काम, क्रोध, लोभ, दंभ, अभिमान, निंदा हे सर्व महादोष आहेत. त्यांचें निर्मूलन केलें पाहिजे. आत्मदोष पहावे, परांचे पाहूं नका. संशय सोडावा; अपढपण टाकावें. दुसऱ्याला शुद्धि सांगून स्वतः शहाणा होत नाहीं, तो करंटा. सारांश सर्व दुर्गुण सोडून सद्‌गुण धरावे. षड्रिपूंचा त्याग करील तोच संन्यासी, तोच ज्ञानाधिकारी. पापाचा पश्चात्ताप झाला कीं, पापनाश होतो. विवेकानें देहाचा निर्वेद ( कंटाळा, वीट ) आला पाहिजे. अशा रीतीनें चित्त शुद्ध झालें म्हणजे संत भेटतात व ते परमार्थ मार्ग दाखवितात. औदार्य, सत्पात्रीं दान, अमानित्व, अदंभित्व, निरभिमानता हे सद्‌गुण भक्ताला अवश्य आहेत. भूतदया, शांति व क्षमा हे तर फार महत्त्वाचे गुण. हे सर्व सद्‌गुण संपादन करून उपासना करावी. हा भक्तीचा पाया आहे. याबरोबर विवेक जागृत झाला पाहिजे; मनांत भक्तिप्रेमाचा आनंद हवा. मग एकाग्रतेनें ध्यान होऊं शकतें.

प्रक. ५ :— परमार्थमार्गाचें आक्रमण करून ईश्वरप्राप्ति करून घ्यावयाची आहे. म्हणून प्राप्तव्य जो ईश्वर त्याचें स्वरूप बुद्धीला, कळणें अवश्य आहे. तें कळलें म्हणजे ईश्वराबद्दल प्रेम, आदर, भक्ति, श्रेष्ठ भीति इत्यादि भावना कांहीं प्रमाणांत उत्पन्न होतील व त्यांचा भक्तिसाधनाला उपयोग होईल. हें ज्ञान म्हणजे साक्षात्कार नव्हे. तरी त्याचा उपयोग होतो. शास्त्रांनीं व संतांनीं ईश्वराचें गुणवर्णन केलें आहे. प्रतिमा म्हणजे देव नव्हे. तो द्वंद्वातीत, इंद्रियांतीत एक, अद्वितीय असा निर्गुण आहे. 'नेति नेति' असें त्याचें वर्णन वेद करतात. पण तोच भक्तिप्रेमानें अवतार घेतो, सगुणरूप धरतो. असें सगुण निर्गुण एकत्व आहे. तो सगुणच षड्‌गुणैश्वर असून तो कर्ता आहे, सुखाचा सागर, भक्त सखा, भक्तांचा रक्षिता आहे. त्याच्या कृपेनें मायेचा नाश होतो; विश्वाची उत्पत्ति – स्थिति – लय त्याच्यामुळें होतात; तो सर्वांच्या अंतर्यामीं आहे; सर्वातीतहि आहे. अंतरात्मा, आत्मारामच खरा देव. राम - कृष्ण - दत्त सर्व एकच आहेत. ईश्वर सर्वांभूतीं

आहे. चराचर व्यापून उरला आहे. शिव शक्ति यांत अमेद आहे. रामकृपेनें माया तरून मोक्षप्राप्ति होते. ईश्वरच मोक्षदाता.

प्रक. ६-७ :— ईश्वरप्राप्तीसाठीं आपणांस भक्ति करावयाची आहे. म्हणून भक्ताचा आदर्श डोळ्यांपुढें पाहिजे व देवापासून भक्ताला काय लाभ होतात, हेंहि कळलें पाहिजे. भक्ताचीं लक्षणें कोणती; भूतदया, समबुद्धि, अभेदबुद्धि, काया-वाचा-मनाची शुद्धता, निरहंकार, नम्रता, अमत्सर, मानापमान-समता, परोपकार, लोक-लाजेचा त्याग, बोले तैसा चाले, क्षमा-शांति, देहासंबंधीं औदासीन्य, वासना-त्याग व विवेक हीं भक्तांचीं लक्षणें आहेत. परंतु त्याचें मुख्य महत्त्वाचें लक्षण म्हणजे ईश्वरासंबंधीं प्रेम, भक्ति, अनन्य-ऐकांतिक भक्ति ईश्वरावांचून दुसरीकडे न पाहणें. ईश्वरच आतिष्ट. ईश्वरच सर्वस्व ही वृत्ति. हें भक्ताचें मुख्य लक्षण. याप्रमाणें भक्तिप्रेमानें, अनन्य-भावानें नामस्मरण केलें म्हणजे भक्त ईश्वरस्वरूपच होतो. तो स्वतःच देव होतो. त्यानें गंगेत स्नान केलें तर त्याच्या ईश्वरी स्पर्शानें गंगा पावन होते. त्याला पूजा करणें अशक्य होतें. कारण सर्व कांहीं मीच या अनुभवानें पूजा करण्याला देव किंवा साहित्य उरत नाहीं. पूजा केलीच तर तो जणू स्वतः-चीच पूजा करतो. आतां देव-भक्ताचें नातें कशाप्रकारचें असतें ? देव भावाचा भुकेला आहे; भावपूर्ण भक्ति करणाऱ्या भक्तावर तो कृपा करतो. तो भक्त-वत्सल, भक्त-कैवारी, संकटहारक, सुखदाता, भक्तरक्षक आहे. अंतींचा खरा सोयरा रामच. तोच मायेचा नाश करून भक्तास आत्मपद देतो. स्वानंदमय. मोक्ष देतो, देवच अतीं भक्ताचा सेवक होतो. एका दृष्टीनें भक्ताच्या पोटीं देव जन्मास येतो; म्हणून भक्त वडील व देव धाकुटा सारांश अशी देव-भक्तांत पूर्ण ऐक्यच होतें.

प्रक. ८ ते १६ — इतकी पूर्व तयारी झाल्यानंतर प्रत्यक्ष परमार्थ-साधनांचा विचार करावयाचा. सद्गुरुकडून मिळालेल्या नामाचं स्मरण हा साधनाचा गाभा होय. नामस्मरण भक्तिभावानें झालें पाहिजे; भक्तिभाव हा साधनाचा आत्मा आहे. श्रवण-कीर्तन-चिंतन यांचाहि साधनाला फार उपयोग होतो साधनाला सत्संगाइतकें उपकारक दुसरें कांहीं नाहीं. शेवटीं ईश्वरदर्शनाच्या उत्कंठेनें व्याकुळ होऊन भक्त दर्शनासाठीं देवाची

करुणा भाकतो. ही तळमळ, तीव्र उत्कठा सर्व संतांनीं अनुभविली आहे. तळमळ इतकी वाढली म्हणजेच ईश्वरप्राप्ति जवळ आली असें समजावें. ज्ञानास मूळ भक्ति. निश्चयानें न कंटाळता साधन केल्यावांचून—नामस्मरणावांचून—ईश्वरदर्शन होणार नाहीं इच्छा—निश्चय—कर्मफल असा फलप्राप्तीचा क्रम आहे तो साक्षात्कारालाहि लागू आहे. भक्तीच मुख्यकर्तव्य; इतर लौकिक सत्कार्यें गौण होत. विवेकाचाहि नामस्मरणाला फार उपयोग होतो. नित्यानित्य विवेकानें वैराग्य उत्पन्न होतें. तें साधनाला अवश्य आहे. नामस्मरणाचें साधन करीत असतांना सर्व इंद्रियांना देवाचें काम द्यावें; शरणागतीची वृत्ति ठेवावी. अशा साधनानें सर्वत्र रामदर्शन होतें. आतां साधनाच्या सर्व अंगाचा विचार करूं.

(अ) सद्गुरु (प्रकरण = पाकळी ९) – परमार्थांत एक सद्गुरु साह्य. तीर्थीं धोंडा-पाणी; अजेय आत्मा, गुरु–कृपेशिवाय प्राप्त होत नाहीं. गुरु कृपेनें दुर्गुणांचा नाश होतो. परंतु ज्ञानदाता अधिकारी सद्गुरु विरळा. सत्य-संकल्प असेल तर त्याची भेट होईल परामक्ति, शाब्दे—परे निष्णात हीं त्याचीं लक्षणें होत. सद्गुरु म्हणजे प्रत्यक्ष देव, परब्रह्म तोच खरा सोयरा; त्याची अनन्य भावानें अखंड सेवा करावी. मग त्याच्या कृपेनें स्वानंद व कृतार्थता प्राप्त होईल.

(आ) नाम व नामस्मरण (प्रक. १०)—सद्गुरूकडून मिळालेल्या सबीज नामाचें स्मरण हा साधनाचा गाभा. सर्व वेद, पुराणें, शास्त्रें व संत यांनीं एकमुखान नामाची महती गायलेली आहे. सर्व संत नामस्मरणानेंच मुक्त झाले नामानें मोक्ष जोडतो, ज्ञान होतें. कैवल्यपद मिळतें. नामच सार. नाम परब्रह्म. तें सोपें व अमोघ साधन आहे. त्यापरतें साधन नाहीं. त्यानें भुक्ति—मुक्ति व तृप्ति यांचा लाभ होतो; प्रपंच—परमार्थ दोन्ही ठायीं सार्थक होतें. नाम हें अवैदिक साधन होय, हा आक्षेप खोटा आहे. पाप-ताप अहंकार यांचा नाश नामानें होतो; दुःख नष्ट होऊन सुख मिळतें ईश्वरप्राप्ति होते. पूर्ण समाधान लाभतें. सारांश नामस्मरणानें रामकृपा होऊन पूर्ण साक्षात्कार होतो व विदेहमुक्ति मिळते. नामांत नामीचें सामर्थ्य अनुभवास येतें.

करतो. जगाला खऱ्या सुखशांतीच्या मार्गाला लावतो. पापांडांचें खंडण करून नाम वाढवावें यासाठीं तो भक्तीचा डांगोरा पिटतो.

**( ऋ ) परापूजा ( प्रक. १६ )**—या अवस्थेंतील भक्ताचें जीवन म्हणजे जीवन्मुक्तावस्था; ब्रह्मस्वरूप होऊन व्यवहारांत जगदुद्धारासाठीं वागणें यालाच सहज समाधि, पराभक्ति अशीं नांवें आहेत. परापूजा किंवा आत्मपूजा पूर्णपूजा या रूपकांनीं या प्रकरणांत त्या अवस्थाचें वर्णन केलें आहे. ज्ञाता-ज्ञेय-ज्ञान, ध्याता-ध्येय-ध्यान, पूजक-पूज्य-पूजा या त्रिपुटींचा येथें लोप होतो. सर्व ब्रह्म झाल्यामुळें पूजा करणारा, पूजेचें साहित्य, आणि पूजेची मूर्ति उरत नाहीं. अशी ही अलौकिक भाग्याची पूजा जीवन्मुक्त पुरुष करीत असतो.

## भाग दुसरा—संकीर्ण अभंग

### ( प्रकरण-पाकळी ) १७ ते २१

परमार्थमार्गाचें विवेचन वर संपलें आतां संकीर्ण अभंगाचा अगदीं थोडक्यांत उल्लेख करावयाचा आहे.

**( प्रक. १७ ) तत्त्वज्ञान** — या प्रकरणांत चार्वाक, चार बौद्धपंथ, जैन हीं नास्तिक दर्शनें व सहा आस्तिक दर्शनें यांचा सिद्धांत थोडक्यांत सांगून श्रीमत् शंकराचार्यांच्या केवलाद्वैतमताचें श्रेष्ठत्व प्रतिपादलें आहे. शिवाय मोक्ष कोरड्या शुद्ध ज्ञानानें किंवा कर्मानें मिळत नाहीं; भक्तीनें मिळतो हा महत्त्वाचा विचार मांडला आहे. मोक्षासंबंधीं निरनिराळ्या दर्शनांचीं मतें सांगून, अद्वैतमतानें प्रतिपादिलेला "सर्वं खलु इदं ब्रह्म" हा अनुभव म्हणजे खरा मोक्ष हा सिद्धांत मांडला आहे. शेवटीं, अनंताच्या वाटेवर सर्वच साधक, सिद्ध कोणीच नाहीं, ईश्वराचें पूर्णज्ञान अशक्य; असा इशारा दिला आहे.

**( प्रक. १८ )** — येथें गीताविषयक कांहीं विचार आहेत. गीतार्थीं मन घाला. निष्काम कर्म करा. गीतेचें केवळ शब्दज्ञान व्यर्थ. साक्षात्कार हाच गीतार्थाच्या चक्रव्यूहांतून बाहेर पडण्याचा हमखास मार्ग होय. कर्म, भक्ति, ध्यान, ज्ञान यांचा समन्वय गीतेंत उत्तम साधला आहे सर्वांचा उद्धार होतो.

तुझ्या भेटीची उत्कंठा, तळमळ मला लागली आहे; मला दूर ठेवू नको; माझ्या हृदयात ठाण देऊन रहा मला दर्शन दे सुखासाठीं मी फार कष्ट केले, पण दु:खीच राहिलों मला शांति दे असा तळमळीचा धावा ऐकून राम धावून येतो; दर्शन देतो, देवाचा साक्षात्कार होतो

**(ऊ) साक्षात्कार (प्रक १४)**— साक्षात्कार म्हणजे हृदयीं रामदर्शन; तसेच बाहेरहि सर्वत्र रामदर्शन हीच रामाची आनंदमय भेट. सर्वत्र ईश्वर दिसू लागतो दुसरें कांहीं दिसत नाहीं सर्व इंद्रियांना ब्रह्माचा अनुभव येऊं लागतो. हीच उन्मनी अवस्था यानंतरची अवस्था म्हणजे "मीच राम" "अहं ब्रह्मास्मि" हा अनुभव नंतर "सर्वं खलु इदं ब्रह्म" हा केवलाद्वैताचा अनुभव "एकमेवाद्वितीय ब्रह्म" ही अनुभवाची पदवी येथ गाठली जाते. ज्ञानेश्वर, मुक्ताबाई, चांगदेव असे अनेक संत याप्रकारचे पूर्ण साक्षात्कारी योगी होऊन गेले

**(ॠ) साक्षात्काराचे परिणाम (प्रक १५)**— आपला साक्षात्कार साक्षात्कारी पुरुषालाच कळणारा त्याचा आनंद त्यालाच माहीत. इतरजन साक्षात्काराचें मूल्य त्याच्या त्यांना दिसणाऱ्या परिणामावरून करणार हें साहजिकच आहे लोकांना दिसतील असे साक्षात्काराचे परिणाम अनेक ग्रंथांत व अनेक संतांच्या वचनांत वर्णिलेले सांपडतात त्यांचा विचार करून सामान्य मनुष्य परमार्थाकडे वळतो कारण त्याला हेच परिणाम आकर्षक वाटतात, तेच त्याला पाहिजे असतात पूर्ण आनंद, पूर्ण नीति, पूर्ण ज्ञान हें साक्षात्काराचे परिणाम होत ईश्वरदर्शनाच्या आनंदानें अष्ट सात्विक भाव उत्पन्न होतात. दु:खाचा नाश होतो भूतदयादि सद्गुण उदय पावतात त्यामुळे मायेचा व भेदभावाचा नाश होतो सुखदु:ख, मानापमान इत्यादि द्वंद्वाचा लोप होतो अखंड रामदर्शनानें भक्त कर्मातीत, गुणातीत व देहातीत होतो त्याचा देहभाव स्वानंदात बुडून जातो जीवन कृतार्थ होतें धन्य धन्य होतें असा जीवन्मुक्त पुरुष सदा आनंदानें भरलेला म्हणून वासनारहित, समदृष्टि असतो त्याला कर्तव्य असें उरतच नाहीं तरी भूतदयेनें प्रेरित होऊन व ईश्वराची आज्ञा म्हणून तो भक्तिप्रसाराचें कार्य करून जगदुद्धार

करतो जगाला सच्या सुखशांतीच्या मार्गाला लावतो. पापाडाचें खंडण करून नाम वाढवावें यासाठीं तो भक्तीचा डांगोरा पिटतो

(अ६) परापूजा (प्रक. १६)—या अवस्थेतील भक्ताचे जीवन म्हणजे जीवन्मुक्तावस्था, ब्रह्मस्वरूप होऊन व्यवहारात जगदुद्धारासाठीं वागणे यालाच सहज समाधि, पराभक्ति अशीं नावें आहेत. परापूजा किंवा आत्मपूजा पूर्णपूजा या रूपकानीं या प्रकरणात त्या अवस्थेचें वर्णन केलें आहे ज्ञाता-ज्ञेय-ज्ञान, ध्याता-ध्येय-ध्यान, पूजक-पूज्य-पूजा या त्रिपुटींचा येथ लोप होतो सर्व ब्रह्म झाल्यामुळें पूजा करणारा, पूजेचे साहित्य, आणि पूजेची मूर्ति उरत नाहीं अशी ही अलौकिक भाग्याची पूजा जीवन्मुक्त पुरुष करात असतो.

## भाग दुसरा—संकीर्ण अभंग

## (प्रकरण पाकळी) १७ ते २१

परमार्थमार्गाचे विवेचन वर संपले आता संकीर्ण अभंगाचा अगदीं थोडक्यात उल्लेख करावयाचा आहे

(प्रक. १७) तत्त्वज्ञान — या प्रकरणात चार्वाक, चार बौद्धपंथ, जैन हीं नास्तिक दर्शनें व सहा आस्तिक दर्शनें यांचा सिद्धांत थोडक्यात सांगून श्रीमत् शंकराचार्यांच्या केवलाद्वैतमताचे श्रेष्ठत्व प्रतिपादलें आहे शिवाय मोक्ष कोरड्या शुद्ध ज्ञानानें किंवा कर्मानें मिळत नाहीं, भक्तीनें मिळतो हा महत्त्वाचा विचार मांडला आहे मोक्षासंबंधीं निरनिराळ्या दर्शनांचीं मतें सांगून, अद्वैतमतानें प्रतिपादिलेला "सर्वं खलु इदं ब्रह्म" हा अनुभव म्हणजे खरा मोक्ष हा सिद्धांत मांडला आहे शेवटीं, अनंताच्या वाटेवर सर्वच साधक, सिद्ध कोणीच नाहीं, ईश्वराचें पूर्णज्ञान अशक्य, असा इशारा दिला आहे

(प्रक. १८) — येथें गीताविषयक काहीं विचार आहेत गीतार्थांत मन घाला निष्काम कर्म करा गीतेचें केवळ शब्दज्ञान व्यर्थ साक्षात्कार हाच गीतार्थाच्या चक्रव्यूहातून बाहेर पडण्याचा हमखास मार्ग होय कर्म, भक्ति, ध्यान, ज्ञान यांचा समन्वय गीतेंत उत्तम साधला आहे सर्वांचा उद्धार होतो

( प्रक १९ ) — संतस्तवन या प्रकरणात प्रल्हाद, सती अनसूया, ज्ञानेश्वर, एकनाथ, समर्थ व इतर अनेक थोर संत याच गुणगान असून संतांचें कार्य व लक्षणं सांगितलीं आहेत.

( प्रक २० ) — धर्माची ग्लानी व हिंदुसंघटना अनेक चुकीच्या मतामुळें व औदासीन्यामुळ धर्माला ग्लानी आलेली आहे, त्याला त्राता व रक्षिता नाहीं. ही स्तिथि समाजाला घातक आहे हिंदुसंघटणा करून ही स्थिती बदलली पाहिजे असे विचार येथ मांडले आहेत

( प्रक. २१ ) — यात विविध विषय आलेले आहेत नारायणाच सर्व ध्यान करतात, नारायण कोणाच ध्यान करितो ? ज्ञानाधिकार प्राप्त केला पाहिजे सोंवळें-ओवळें हा भ्रम होय देवाला कधींच विटाळ होणें शक्य नाहीं. ब्रह्मज्ञानीच खरा सोंवळा देवाला सर्व मापा सारख्याच सुराज्यापेक्षा स्वराज्य श्रेष्ठ पारतंत्र्य हा नरक मतमतांतरें सोडून यत्न करा



काहीं भ्रम ९. मायेंच दुःख उमजून राम जोड १०. परमार्थावरील आक्षेप ११. परमार्थाचे समर्थन १२. नाशिवंत टाकून त्याच्या बदल्यांत शाश्वत सुख घे १३ असार संसारात एक परब्रह्म सार १४. संसारात आयुष्य व्यर्थ न घालवितां रामभक्तीनें कृतार्थ व्हावें १५ दुर्लभ नरदेहात भक्ति हाच लाभ १६. नरजन्मातील कर्तव्य १७. रामकृपा हेंच जीवनसार्थक १८ आत्मलाभच श्रेष्ठ १९. सन्मार्ग २०

## ३. दुर्गुणत्याग ( अभंग २१ ते ४० ) पृष्ठ १५–२१

षड्रिपु आहेत तेथें परमार्थ नाहीं २१ भोगपरायणता सोडून राघवाचें भजन करा २२ विषयासक्ताला मुक्ति नाहीं २३ ईषणात्रयाच्या त्यागावाचून परमार्थ नाहीं २४. दुर्गुणत्याग - सद्गुणसंपादन - तर मुक्ति २५ आधीं मन शुद्ध २६ तेणें पथ्यें सांभाळावीं २७ क्रोध हा थोर शत्रु २८. दम टिकत नाहीं २९ दांभिक लक्षणें ३०. अभिमान सोडला तर जनीं जनार्दन दिसेल ३१ निंदा हे महापाप ३२ आपले दोष पहा, पराचे नको ३३. दोषदृष्टि सोडा ३४. अपद्धाला मोक्ष कसला ३५ संशय सोड ३६ करटा बुद्धीच सांगतो ३७. दुर्गुणत्याग ३८ काय त्यागावें ३९. स्वभावधर्म ४०.

## ४. सद्गुणसंपादन ( अभंग ४१ ते ६० ) पृष्ठ २१–२६

षड्न्यासी तो सन्यासी, ज्ञानाधिकारी ४१ षड्रिपूंच्या नाशानें स्वरूपता ४२. पश्चात्तापानें पापनाश ४३ देहाचा निर्वेद याचा ४४. शुद्ध चित्त असल म्हणजे संत भेटतात ४५ सत्पात्रीं दान ४६. याचकाला विन्मुख पाठवू नको ४७. सद्गुणानीं गुरुपूजा ४८. अमानित्व - अदांभित्व ४९. अमानित्व ५०. अभिमान टाकून उपासना कर ५१. नेणिवेमाजी दडे ५२. भूतदया हा मुख्य गुण ५३ वृथा अहंकार टाकून, श्रद्धेनें परमार्थ साधा ५४. दया नसेल तर भजन व्यर्थ ५५. दया, क्षमा, शांति, तेथें देवाची वसती ५६. विवेक जागृत करा ५७. विषयत्याग करून, आत्मोद्धारासाठीं रामभजन कर ५८. आनंद असेल तर एकाग्र ध्यान ५९. श्रवणादि साधनानें आत्मानंद ६०.

## ५. ईश्वराचें स्वरूप ( अभंग ६१ ते १०२ ) पृष्ठ २७–३७

मूर्लेस्य प्रतिमा देवः । ६१. मूर्ति नाशिवंत ६२. पाषाणाचा देव खोटा ६३. प्रतिमा हा देव नव्हे ६४. ब्रह्मस्वरूप द्वंद्वातीत ६५. एकमेवाद्वितीयम् । ६६. द्वंद्वातीत ब्रह्म ६७. इंद्रियातीत 'मी' ६८. सर्वातीत परिपूर्ण ब्रह्म ६९. नेति नेति । ७०. माया-ब्रह्म-विचार ७१. श्रीरामाचें निर्गुण स्वरूप ७२. सगुण-निर्गुण एकच ७३ व ७४. भक्तप्रेमास्तव अवतार ७५. सगुण स्वरूप ७६. भगवंताचें षड्गुणैश्वर्य ७७. दत्त, राम, ब्रह्म सर्व एकच ७८. रामाचें स्वरूप ७९ व ८०. रामच सत्य ८१. राम सुखाचा सागर ८२. राम कला ८३. रामावांचून सोडविता नाहीं ८४. रामकृपेनें मायानाश ८५. कर्ता ईश्वर; देह प्रारब्धाधीन ८६. तज्जलान् । ८७. देव जवळी अंतरीं ८८. राम वनांत नाहीं, हृदयांत आहे ८९. आत्मारामच देवाचा देव ९०. सर्वाभूतीं वासुदेव ९१. जनीं जनार्दन, पण दिसत नाहीं ९२. राम सबाह्य अंतरीं ९३. स्थिरचर व्यापुन उरला ९४. आत्मा परिपूर्ण; मायाभेद नाहीं ९५. रिता ठाव नाहीं ९६. राम मन-बुद्धि-अतीत ९७. सर्वातीत राम ९८. सर्व वेदांचें सार म्हणजे रामाचें श्रेष्ठत्व ९९. शिवशक्ति अभेद १००. शक्तीच्या कृपेनें मायातरण १०१. मोक्षदायी राम १०२.

## ६. भक्ताचीं लक्षणें ( अभंग १०३ ते १४५ ) पृष्ठ ३७–४७

संतलक्षण १०३ व १०४. वारकऱ्याचीं लक्षणें १०५. संत लक्षण १०६. भक्ताची प्रवृत्ति १०७. भक्ताची वृत्ति १०८. नम्रता व अमत्सर हे भक्ताचे गुण १०९. संताचे ठिकाणीं वैरभाव अशक्य ११०. मानापमानयोस्तुल्यः १११. भक्तानें लोकलाज सोडिली पाहिजे ११२. समता ११३. परोपकारी भक्त हाच खरा सेवक ११४. हृदयीं राम भरणें हाच सत्याग्रह ११५. सर्वत्र व सर्वांत राम पाहणें हाच सत्याग्रह ११६. संतांची पुण्यमय हिंसा ११७. भूतांची दया हें मांडवल संतां ११८. संतच खरे सत्याग्रही ११९. भक्ताचीं लक्षणें १२०. भक्ताची भावना १२१. पाप-पुण्यानें राम दुरावतो १२२. शांति १२३. एकनाथांची शांति १२४. परमशांति १२५. शांतियुक्त वैराग्य पाहिजे १२६. शांतीचें मूळ

१२७. सेवक होऊन रामाचा आनंद लूट १२८. अनासक्त भक्त रामरूपत्वानें सुखी १२९. साधुलक्षणें १३०. रामाशिवाय मला कोणी नाहीं १३१. तुझ्यावांचून मला कोणी नाहीं १३२. रामाविण मला कोणी नाहीं १३३. रामाचें वेड १३४. रामाच्या संनिधानीं जगाचा विसर १३५. रामानें मन हिरावून नेलें १३६. भक्ताला प्रपंचच परमार्थ होतो १३७. रामभक्ताची धन्यता १३८. भक्तच देव होतो १३९ रामसेवक हनुमान १४०. अनन्यभक्त रामच होतो १४१. रामाचा दास स्वानंदपूर्ण ब्रह्म १४२ साधूच्या स्नानानें गंगा पवित्र १४३. आपलीच आपण पूजा करणार १४४. सर्वात्मभाव झाल्यावर पूजा अशक्य १४५.

## ७. देवभक्ताचें नातें (अभंग १४६ ते १६९) पृष्ठ ४८–५२

देव भावाचा भुकेला १४६. भक्तवत्सल राम १४७ व १४८. देवभक्ताचा कैवारी १४९. रामकृपेवाचून यश नाहीं १५०. संकटमोचन आत्माराम १५१. एक ईश्वरच खरा दाता १५२. रामाविण सुख नाहीं १५३. अंतींचा सोयरा एक रामच १५४. भक्तवत्सल आनंदस्वरूप राम १५५. भक्तरक्षक राम १५६. सेवकाला राम रक्षितो १५७ देवच भक्ताचा सेवक होतो १५८. देव भक्तांचा संबंध १५९. देव व भक्त म्हणजे गूळ-गोडीप्रमाणें अभिन्न १६०. रामकृपेनें मायानाश १६१. गुरुकृपेनें देहींच रामदर्शन १६२. रामकृपेनें मीच राम १६३. रामकृपेनें अभेददर्शन १६४. रामकृपेनें सर्वत्र आत्मदर्शन १६५. रामकृपे कृतार्थता १६६. रामकृपेनें स्वानंद १६७. रामच आनंदमय मोक्षदाता १६८. रामकृपेनें कैवल्य, आनंद १६९.

## ८. साधनमार्ग (अभंग १७० ते १९४) पृष्ठ ५४–६०

परमार्थ पथ १७०. साधनमार्ग १७१. साधनसोपान १७२. नामरूपातीत वस्तु चर्मचक्षूस दिसत नाहीं १७३. साधनानेंच साक्षात्कार १७४. साधनानें क्रमशः साक्षात्कार १७५. इच्छा-निश्चय-कर्म-फल १७६. अनासक्तीनें मनोजय १७७. भक्तीच मुख्य कर्तव्य-सघटना गौण १७८. प्रेमपूर्ण सेवा १७९. विवेकच

सद्गुरु १८० नित्यानित्यविवेकान रामप्राप्ति १८१ गाया पर बूझा नहि १८२ राम ध्यानानें दुर्गुणाचा नाश १८३ श्रवणभक्ति १८४ सगुणकीर्तनमाहात्म्य १८५ कीर्तनश्रवणमाहात्म्य १८६ कीर्तनान देव वेडा होतो १८७ श्रवण-मननाचा निश्चय १८८ सर्व इंद्रियांना देवाचं काम १८९ शरणागति १९० वृत्तींच्या सर्वांत स्वरूप १९१ सर्वत्र एकच देव हें ज्ञानदृष्टीनें पहा १९२ सर्वव्यापी देव पाहून शांत रहा १९३ स्वस्वरूपात स्नान केल्यानें ईश्वरत्व १९४

## ९. सद्गुरु ( अभंग १९५ ते २१६ ) पृष्ठ ६०–६५

परमार्थांत एक सद्गुरूच साह्य १९५ तीर्थी धोंडा पाणी— गुरुचरणाश्रयानें शुद्धता १९६ अज्ञेय आत्मा गुरुकृपेनें प्राप्त होतो १९७ गुरुकृपेनें विरक्ति, सद्गुण, भक्ति, ज्ञान १९८. सद्गुरूंना शरण गेल्यास ज्ञान १९९ गुरुसेवा व रामभक्ति याशिवाय ज्ञान नाहीं २०० आत्मज्ञान सांगणारा अधिकारी विरळा २०१ सत्यसकल्पान सद्गुरु – दर्शन २०२ गुरुलक्षण २०३ व २०४ सद्गुरुलक्षण २०५ सद्गुरुमहिमा २०६ व २०७ गुरुभक्ति २०८ सद्गुरु वचनच वेद २०९ सद्गुरु हाच खरा सोयरा २१० गुरूला पचाग-नमन २११ गुरूला साष्टांग नमन २१२ गुरुध्यानाची महती २१३ ईश्वर-स्वरूप सद्गुरूंच्या कृपेनें स्वानंद २१४ गुरुकृपेनें कृतार्थता २१५ सद्गुरुकृपेनें ब्रह्मानंद २१६

## १०. नाम ( अभंग २१७ ते २६० ) पृष्ठ ६५–७७

नामें मोक्ष जोडे २१७ नामच सुलभ साधन २१८ नाम हें सोपें साधन २१९ नामापरतं साधन नाहीं २२०. सर्व साधनांत नामस्मरण श्रेष्ठ २२१ नामाविण साधन नाहीं २२२ नामस्मरण हीच भक्ति २२३ रामनामानं प्रपंच परमार्थ दोन्ही साधतात २२४ नामसार २२५. नाममाहात्म्य २२६ व २२७ नामस्मरणाचें माहात्म्य २२८ नामाची महती २२९ हरिनामच परब्रह्म २३०. नामानें ज्ञान, ज्ञानानें कैवल्य २३१ वेदानंहि नामच सांगितलें

आहे २३२ वेद अनत बाल्लिा – सार नाम २३३ वेदादि सर्व प्रथात नामसाधन २३४ अठरा पुराणाच्या पोटीं । नामाविण नाहीं गोष्टी ॥ २३५ सर्वत्र नामाचीच प्रशस्ति २३६ नामान पूर्ण समाधान २३७ सर्व सत नामानेंच उद्धरिले २३८ नामस्मरणावरील आक्षेप खोटे २३९ नामस्मरणान अलभ्य लाभ २४० वासनाक्षय कसा होईल? २४१ नामानें पापनाश २४२ नामस्मरणानें कामाचा नाश २४३ रामनामान अहकारनाश २४४ नामानें दुःख नाश २४५ पावन नामान सुख २४६ मुखीं नामानें पापनाश, ईशप्राप्ति २४७ प्रेमयुक्त नामस्मरणानें राम कृपेन दर्शन देईल २४८ राम नामान रामकृपा २४९ नामान ईशकृपा व साक्षात्कार २५० नामघोषानें रामदर्शन २५१ रामनामान विदेहावस्था २५२ रामनामानें मोक्ष जोडतो २५३ नामानें मोक्ष २५४ रामनामाने भुक्ति मुक्ति २५५ रामनामान काम – धदा करिताहि रामसाक्षात्कार २५६ नामापुढें इतर साधनें बापुडीं २५७ रामनामच ब्रह्म २५८ रामनामाविण पुण्य तेंचि पाप २५९ नामात नामीचें सामर्थ्य २६०

## ११. सत्सग ( अभंग २६१ ते २६९ ) पृष्ठ ७७–७९

सत्सगाची आवश्यकता २६१ सत्सगाचे लाभ २६२ सतलक्षण २६३ सतसमागमानें दव जोडतो २६४ सताच महिमान अगाध २६५ सतदर्शनाचा महिमा २६६ सतभेट दुर्लभ २६७ ब्रह्मस्वरूप सताच दर्शन दुर्लभ २६८ रामकृपा असल तरच सतभेट २६९

## १२ भक्ति ( अभंग २७० ते ३०५ ) पृष्ठ ७९–८८

भक्तिमार्ग सर्व शास्त्रानीं प्रतिपादित २७० रामभक्तीशिवाय वासनानाश नाहीं २७१ सगुणभक्तिविना वचना २७२ भक्तीनेंच ईश्वरप्राप्ति २७३ भक्तीनें खरें ज्ञान व मोक्ष २७४ भक्ताविना मुक्ति नाहीं २७५ भक्तीविणें मुक्ति नाहीं २७६ सकाम भजनानें फल, निष्कामानें राम २७७ भक्ति-साधनाने जन्माचें सार्थक २७८ रामभक्तीन सर्वत्र रामदर्शन २७९ भक्ति

व ज्ञान एकच; तें सोडल्यानें बंध २८०. राममक्तीनें उद्धार २८१. राम-मक्तीनेंच परागति २८२. माया टाकून रामाचे पाय धरावे २८३. अखंड अनुसंधानानें अखंड सुख २८४. प्रेमभाव विरळाच दिसतो २८५ अखंड प्रेम २८६. अनन्य भक्ति २८७ व २८८. अनन्य भाव २८९. शरणागतीविना साक्षात्कार नाहीं २९०. एक कृपासागर रामालाच शरण जावें २९१. राम सखा केला त्याला परमानंद २९२. आत्मसमर्पण २९३. आध्यात्मिक सीतास्वयंवर २९४. राममक्तीनें सर्वत्र रामदर्शन २९५ रामस्वरूप होणं हीच परामक्ति २९६. रामध्यानानें विदेहावस्था २९७. भाव तेथें देव – आनंद २९८. रामकृपेनें स्वानंद २९९. आध्यात्मिक काशी ३००. आत्मप्रेमानें माया नाश ३०१. शिवोभूत्वा शिवं यजेत्। ३०२. ज्ञानोत्तर भक्तीच खरी ३०३. ईश्वरमक्तीनें ईश्वरत्व ३०४ भावमक्तीनें सायुज्यता ३०५.

## १३. कृपायाचन ( अभंग ३०६ ते ३२२ ) पृष्ठ ८८–९२

मनाची प्रबल चचलता ३०६. देवा ! पतितपावन हें ब्रीद खरें करा ३०७ देवा ! मला पतिताला तार ! ३०८. भेटीची तळमळ ३०९ व ३१०. तळमळ ३११. दर्शनाची उत्कंठा ३१२. रामदर्शनाची उत्कंठा ३१३. आवाहन ३१४. रामा ! दर्शन दे ३१५. देवाची काकुळती ३१६. करुणा ३१७. दर्शनाचा टाहो ३१८. दर्शनाची तळमळ ३१९. धावा केला असता राम पावतो ३२०. मक्तविघ्नहारक रामाचा धावा ३२१. धावा ऐकून राम आला ३२२.

## १४. साक्षात्कार ( अभंग ३२३ ते ३३७ ) पृष्ठ ९२–९६

हृदयीं रामदर्शन ३२३. उन्मनीच्या शेवटीं आनंदमय रामाची भेट ३२४. स्वयज्योतीच्या प्रकाशानें सर्वत्र रामदर्शन ३२५. सर्वत्र तद्वीक्षण ३२६, ३२७ व ३२८. सर्वावस्थांत रामदर्शन ३२९. सर्व इंद्रियानें ब्रह्मानुभव म्हणजे उन्मनी अवस्था ३३०. आध्यात्मिक विवाह ३३१. मीच राम ३३२. अहं ब्रह्मास्मि।

३३३. सर्वच ब्रह्म ३३४ सर्वं खलु इदं ब्रह्म। ३३५ द्वंद्वातीत ब्रह्मावस्था ३३६. साक्षात्कारी – योगी ३३७.

## १५. साक्षात्काराचे परिणाम

( अभंग ३३८ ते ३७३ ) पृष्ठ ९६–१०६

अष्ट सात्त्विक भाव ३३८. राम भेटीनें दुःखाचा नाश ३३९. सगुण निर्गुण एकच ३४०. रामदर्शनानें भूतदयादि सद्गुण ३४१. स्वरूपानुभवानें मायानाश ३४२ रामदर्शनानें सर्व भेदाचा अस्त ३४३ जीवन्मुक्ताचें समत्व ३४४. जीवन्मुक्ताची द्वंद्वातीतता ३४५. अपरोक्ष साक्षात्कारानें भेदांचा लोप ३४६. सर्वत्र रामदर्शनानें नैष्कर्म्य ३४७. रामदर्शनानें विदेहावस्था ३४८. अखंड रामाचा समागम ३४९. थेंबुटा सागरीं बुडाला ३५० जीवनमुक्ताची विदेहावस्था ३५१. स्वानंदात देहभाव बुडाला ३५२. ईश्वरोन्मादानें देहाची विस्मृति ३५३. सर्वातीत रामाच्या दर्शनानें मायातरण ३५४. रामदर्शनाने धन्यता ३५५. ब्रह्मदर्शनानें द्रष्टाच उरत नाहीं ३५६. ब्रह्माकार, आनंदपूर्ण वृत्ति म्हणजे निर्विकल्पता ३५७. अहं ब्रह्मास्मि। ३५८. एकमेवाद्वितीयम् ३५९, ३६० व ३६१. सर्वं खलु इदं ब्रह्म, हा अनुभव ३६२. सर्व ब्रह्म ३६३. जीवन्मुक्त लक्षणें ३६४. आध्यात्मिक संसार ( मोक्ष ) ३६५. तस्य कार्यं न विद्यते। ३६६. जगदुद्धार ३६७. ज्ञानी पुरुषाचें कार्य, जगदुद्धार ३६८. आत्ममुक्तीहून परमुक्ति-सेवा श्रेष्ठ ३६९. धर्मसंस्थापनार्थाय ३७०. करूं पापाड खंडण ३७१. वाढवावें नाम ३७२. पिटूं भक्तीचा डांगोरा ३७३.

## १६. परापूजा ( अभंग ३७४ ते ४०४ ) पृष्ठ १०६–११२

रा षोडशोपचार स्वात्मपूजा अभंग ३७४ ते ३९७.

म „ पूर्णपूजा „ ३९८ ते ४०४.

हृदयस्थाचीच पूजा खरी ३७४. ध्यान ३७५. आवाहन ३७६. आसन ३७७. पाद्य ३७८. अर्घ्य ३७९. स्नान ३८०. वस्त्र ३८१. यज्ञोपवीत ३८२.

गंधविलेपन ३८३. पुष्प ३८४. पुष्पादि ३८५. धूप-दीप ३८६. नैवेद्य ३८७. तांबूल ३८८. दक्षिणा ३८९. फल-नारिकेल ३९०. प्रदक्षिणा ३९१. स्तोत्र ३९२. नमन ३९३. तीर्थग्रहण-विसर्जन ३९४. स्वात्मपूजा साधावी ३९५. स्वात्मपूजेस मुख्य चित्तशुद्धि ३९६. मानसी पूजा मीच करी ३९७. षोडशोपचार ब्रह्मच ३९८. आवाहन ३९९. आसनादि ४००. पुष्पादि ४०१. तांबूलादि ४०२. आर्तिक्यादि ४०३. सोज्वळ पूजा ४०४.

---

# भाग दुसरा

# संकीर्ण अभंग

## पाकळी १७ ते २१ ( अभंग ४०५ ते ५२५ )

### १७. तत्त्वज्ञान ( अभंग ४०५ ते ४५० ) पृष्ठ ११३–१२६

चार्वाकमत ४०५ व ४०६ बौद्धमतें ४०७ माध्यमिक बौद्धमत ४०८. योगाचार बौद्धमत ४०९ सौत्रांतिक बौद्धमत ४१०. वैभाषिक बौद्धमत ४११. अर्हत् मत ४१२ रामानुजाचें विशिष्टाद्वैत ४१३ मध्वाचार्यांचें शुद्ध द्वैत ४१४ न्याय – वैशेषिकदर्शन ४१५ सांख्य दर्शन ४१६. पूर्व मीमांसा – दर्शन ४१७ योगदर्शन ४१८ केवलाद्वैतदर्शन ४१९. अजातवाद ४२०. मिथ्या तेंचि झालें सत्य। सत्य तेंचि झालें असत्य ॥ ( मायाविभास ) ४२१. माया ब्रह्माधीन आहे ४२२. नेह नानास्ति किंचन। ४२३. ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या, जीवो ब्रह्मैव। ४२४ अन्वयव्यतिरेकसिद्धि ४२५. गुणातीत स्वानंदरूप आत्माच ब्रह्म ४२६. मनो बुद्ध्यहंकारचित्तादि नाहम। ४२७. मीच देव हा साक्षात्कार ४२८. ऐक्य मुळातच आहे ४२९ आत्मानंद स्वयंसिद्ध आहे ४३० सर्व व्यापक ब्रह्म ४३१. तीन पुरुषार्थ नाशिवंत; मोक्ष अविनाशी ४३२. पहिल्या ३ पुरुषार्थांनीं अनित्य सुख, मोक्षानें नित्य सुख ४३३ मोक्षच खरें सुख – खरा पुरुषार्थ ४३४. आनंदरूप मोक्ष हाच मुख्य

पुरुषार्थ ४३५. मोक्षाच्या चुकीच्या कल्पना ४३६, ४३७ व ४३८. भजनादि साधनानें ब्रह्मस्थिति साधावी ४३९ संपूर्ण दु:खनिवृत्ति म्हणजे मोक्ष ४४०. अद्वैत – वेदांतांत प्रतिपादिलेला मोक्षच सत्य ४४१. केवळ कर्मानें मोक्ष नाहीं ४४२. कोरड्या शब्दज्ञानानें मुक्ति नाहीं ४४३. देव भक्तीने मिळतो, शब्दज्ञानानें नाहीं ४४४. अनुभवावांचून शब्दज्ञान व्यर्थ ४४५. ज्ञानादेव तु कैवल्यम्। ४४६. ज्ञानाच्या ६ भूमिका ४४७. ज्ञानाची सातवी भूमिका म्हणजे ब्रह्मभाव ४४८ माझें भजन करणारासहि माझें खरें स्वरूप कळत नाहीं ४४९. अनंताच्या वाटेवर सर्वच साधक; सिद्ध नाहींच ४५०.

## १८. गीता ( अभंग ४५१ ते ४६२ ) पृष्ठ १२६–१३०

गीतार्थाचा चक्रव्यूह ४५१. अर्थामध्यें मन घाला ४५२. निष्कामकर्म करावें कारण कर्मत्याग अशक्य ४५३. भक्ति ज्ञान हाच गीतार्थ ४५४. गीतेचें शब्दज्ञान व्यर्थ ४५५. साक्षात्कार हा गीतार्थाच्या चक्रव्यूहांतून बाहेर पडण्याचा मार्ग ४५६. कर्म – भक्ति – ध्यान – ज्ञान समन्वय ४५७. सर्वांचा उद्धार होतां ४५८. लोकसंग्रहार्थ कर्म आचरावें ४५९. वासुदेवः सर्वम्। ४६०. वस्तुमार्गीं आत्माराम ४६१. सर्वधर्मान् परित्यज्य ४६२.

## १९. संतस्तवन ( अभंग ४६३ ते ४८९ ) पृष्ठ १३०–१३५

प्रल्हाद ४६३. सती अनसूया ४६४. संतांचें कार्य ४६५. ज्ञानी संत ४६६. परि ते स्वरूपीं मिळाले–संत ४६७. कांहीं भक्तश्रेष्ठ ४६८. ज्ञानदेवांची थोरवी ४६९. अवतार पांडुरंग ४७०. ज्ञानेश्वर माहात्म्य ४७१ व ४७२. ज्ञानदेवप्रशस्ति ४७३. संतश्रेष्ठ ज्ञानदेव ४७४. ज्ञानेश्वरांचा चमत्कार ४७५. ज्ञानेश्वरीची महती ४७६. ज्ञानेश्वर–ज्ञानेश्वरी ४७७. चार अलौकिक भावंडें ४७८. एकनाथांची शांति ४७९. ब्राह्मणो मम दैवतम्। ४८०. एकनाथांची शांति ४८१. नाथाच्या शांतीनें ब्राह्मणास पश्चात्ताप ४८२. भक्त एकनाथ खरे सुधारक ४८३. समर्थांची धन्यता ४८४. समर्थ मातेला नेत्र देऊन दर्शन देतात ४८५. समर्थांना राम-दर्शन ४८६. श्रीरामकृष्णांना दर्शन ४८७. श्रीरामकृष्णांना जगन्मातेचा आदेश ४८८. मातामय श्रीरामकृष्ण ४८९.

## २०. धर्माची ग्लानि व हिंदुसंघटना
(अभंग ४९० ते ४९९) पृष्ठ १३६–१३८

धर्माला ग्लानी आली ४९० खोट्या विश्वबंधुत्वाच्या भ्रमानें स्वधर्माची उपेक्षा ४९१ धर्माला त्राता नाहीं ४९२ यतींची अधोगति ४९३ धर्मश्रद्धा हीनाची अधोगति ४९४ धर्माचें रक्षण करा ४९५ हिंदुसंस्कृतीच्या पुनरुज्जीवनासाठीं संघटना करा ४९६ हिंदुसंघटनेची आवश्यकता ४९७ संघटनेनें हिंदुधर्माची दुरवस्था दूर करा ४९८ संघटनेनें हिंदूंची दुरवस्था नष्ट करा ४९९

## २१. विविध विषय (अभंग ५०० ते ५२५) पृष्ठ १३९–१४६

नारायण कोणाचें ध्यान करतो ५०० नारायणाचें उत्तर–अधिकार प्राप्त करून घे ५०१ नारदानें काय पाहिलें ? ५०२ नारद ज्ञानाधिकारी झाले ५०३ कुराणांतील खरा धर्म मुसल्मानी नर मानीत नाहीं ५०४ जंगम मदाचछेद ५०५ जंगमगर्वहरण ५०६ समर्थांचें राजकारण ५०७ स्वातंत्र्यमहती ५०८ दासबोधाची श्रेष्ठता ५०९ दासबोधापासून लाभ ५१० सोवळें ओवळें हा भ्रम ५११ देवाला विटाळ होणें शक्य आहे का ? ५१२ ब्रह्मज्ञानींचें खरें सोंवळें ५१३. सर्वभाषा देवाला सारख्याच ५१४ गोकुळचा चोर (गौळण) ५१५ ईश्वराचें स्वरूप (गौळण) ५१६ कृष्णप्रेम (गौळण) ५१७ पारतंत्र्य हा नरक ५१८ स्वातंत्र्य 'भिक्षां देहि' नें मिळत नाहीं ५१९ स्वातंत्र्यासाठीं मरणास तयार व्हा ५२०. सुराज्याहून स्वराज्य श्रेष्ठ ५२१ स्वराज्य हवें, केवल सुराज्य नको ५२२ शठं प्रति शाठ्यम् । ५२३ कर्मयोगी जर्मन आर्य ५२४ मतमतांतर सोडा, हितार्थ दार्योद्योग करा ५२५

(३) अभंगसूचि पृष्ठ १४७–१५६
(४) भक्तिमाला रचना योजना पृष्ठ १५८–१६०
(५) शब्दकोश पृष्ठ १–२१
(६) अभिप्राय पृष्ठ २२–३०
(७) जाहिराती ६ पानें

---

# श्रीअभंगवाणी

## शुद्धिपत्र



| पृष्ठ | अभंग | चरण | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| १३ | १४ | २ | *सचित्साख्यम् | सचित्सौख्यम् |
| ६९ | २३२ | १ | भुरि | भूरि |
| ८२ | २८१ | ५ | सर्व | सर्व |
| ८३ | २८६ | ४ | आढळती | आदळती |
| १०३ | ३६३ | ७ | जिर्द्वंद्व | निर्द्वंद्व |
| १०६ | ३७३ | २ | माऊला | माऊली |
| ,, | ३७४ | २ | स्तेवोनी | स्तवोनी |
| १०८ | ३८३ | ३ | मेद | भेद |
| ११२ | ४०२ | ० | तांबूलादि | तांबूलादि |
| १२८ | ४५९ | ३ | वर्तती | वर्तताती |
| १३७ | ४९४ | ५ | उच्छृसलपणे | उच्छृसलपणें |
| १४० | ५०७ | ५ | सोडविल | सोडविलें |

—या श्रीअभंगवाणी ग्रंथाच्या खर्चाला मदत म्हणून—

पुण्याचे जगप्रसिद्ध जादुगार रघुवीर यांनी दि. १४ मे १९६० रोजी संकेश्वर येथे जादूचे प्रयोग करून, त्या एका खेळाचे संपूर्ण उत्पन्न रु ४४० दिले आहेत

अध्यक्ष—आचार्य सेवा मंडळ, संकेश्वर.

श्रीअभंगवाणी पृष्ठें २० + १२ + १६० + ३० + ८ = २३०

# पंचपदी

(आचार्य भगिनी मंडळ, संकेश्वर, यांचें, श्रींचे — श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य श्रीसंत कल्याणसेवकमहाराज यांचें — तत्त्वावधानतेनुसार दर रविवारीं दुपारीं ४॥ ते ६ भजन होत असतें. त्यांतील नमन, पंचपदी, उपसंहार, आरती आदि येथें दिलीं आहेत.)

## नमन

यं ब्रह्म वेदान्तविदो वदन्ति। ज्येष्ठं प्रधानं पुरुषं तथाऽन्ये॥
विश्वोद्गतेः कारणमीश्वरं वा। तस्मै नमो विघ्नविनायकाय॥ १॥

नमस्ते शारदे देवि काश्मीरपुरवासिनी॥
त्वामहं प्रार्थये नित्यं विद्यादानं च देहि मे॥ २॥

ब्रह्मानन्दं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं
द्वन्द्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम्॥
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतं
भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि॥ ३॥

गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः॥
गुरुः साक्षात्परंब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः॥ ४॥

नमस्तस्मै सदैकस्मै कस्मैचिन्महसे नमः॥
यदेतद्विश्वरूपेण राजते गुरुराज! ते॥ ५॥

गुरवे सर्वलोकानां भिषजे भवरोगिणाम्॥
निधये सर्वविद्यानां दक्षिणामूर्तये नमः॥ ६॥

शंकरं शंकराचार्य केशवं बादरायणम् ॥
सूत्रभाष्यकृतौ वन्दे भगवन्तौ पुनः पुनः ॥ ७ ॥

नमः पार्वतीपते हरहर महादेव ।
सीताकांतस्मरण जय जय राम ।
श्रीमच्छंकराचार्य महाराज की जय ।

## भजन

रघुपति राघव राजाराज । पतितपावन सीताराम ॥ ध्रु० ॥
जानकीजीवन रामनाम । सुंदर माधव मेघश्याम ॥ १ ॥
गंगा तुलसी शालिग्राम । श्रीराम जयराम जयजयराम ॥ २ ॥
सांब सदाशिव गौरीशं । वन्दे गंगाधरमीशम् ॥ ३ ॥
नारायण विधि वसिष्ठ राम । रामदास कल्याण धाम ॥ ४ ॥
मारुतिराया बलभीमा । भजनालागी द्या प्रेमा ॥ ५ ॥

नमः पार्वतीपते हरहर महादेव ।
सीताकांतस्मरण जयजयराम ।
श्रीमच्छंकराचार्य महाराज की जय ।

पद १ बिहाग – त्रिताल

वंदन भावें पदा गणेशा । तुरवी आशा भवभयपाशा ॥ ध्रु० ॥
कर्ता धर्ता सुरवर माता । वक्रतुण्ड गणनायक सत्ता ॥ १ ॥
सच्चित्सुखघन विद्याशंकर । भारत भारती स्वामी सुखकर ॥ २ ॥

पद २ भीमपलास – त्रिताल.

गणराया नमितां, भावें ॥ ध्रु० ॥
तापपाप न च तिमिर भवाचें । सुरनर किन्नर नमिती साचे ॥ १ ॥
सच्चित्सुखघन विद्याशंकर । भूमा भारती नित्य निरंतर ॥ २ ॥

पद ३. भूप–त्रिताल

शंकर भोलानाथ दिगंबर। भक्ता सुखकर सांब महेश्वर ॥ ध्रु० ॥

त्रिशूल डमरु पिनाक धरी कर।
मोक्षदायक विद्यादाकर।
राम राम जप नीलकंठ हर ॥ १ ॥

## भजन

शिव हर रे शिव हर रे। सांब सदाशिव शिव हर रे ॥

पद ४ केदार–त्रिताल

मनों, राम सदा भज पावन रे ॥ ध्रु० ॥
सांब सदाशिव शंकर भोला। सिद्ध-शिरोमणी भक्तचि रे ॥ १ ॥
वाल्ह्यापापी ऋषिवर बनला। आद्य कान्यस्र ख्यातचि रे ॥ २ ॥
मारुतिनें हृदीं राम दाविला। सेवक कल्याण रामचि रे ॥ ३ ॥

पद ५ पहाडी–त्रिताल

सदा नर! ध्याई प्रभू–पद रे ॥ ध्रु० ॥
गुरुपदकमलीं मन स्थिर करि वा। चंचलता त्यज रे ॥ १ ॥
प्रेम-भक्तिनें अनन्यभावें। सार्थक इह कर रे ॥ २ ॥
जग नग विसरुनी नाम-रूप हें। सच्चित्सुख भज रे ॥ ३ ॥
अनंत अच्युत अद्वय धाम। सेवक शिव-पर रे ॥ ४ ॥

## भजन

गुरु महाराज गुरु। जय जय परब्रह्म सद्गुरु ॥

[ हें भजन झाल्यावर समयानुसार अभंग, पदें, गौळणा आदि म्हणावींत दोनतीन पदा–अभंगानंतर मध्यें पुढाल भजनांपैकीं एखादें भजन म्हणत जावें ]

## भजनें

बोल हरि बोल हरि, हरि हरि बोल
केशव माधव मुकुंद हरि बोल ॥ १ ॥
राधा कृष्ण जय कुंजविहारी। मुरलीधर गोवर्धनधारी ॥ २ ॥
विठ्ठल विठ्ठल विठ्ठल रखुमाई ॥ ३ ॥
निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताबाई एकनाथ नामदेव तुकाराम ॥ ४ ॥
दिगंबरा रे दिगंबरा। श्रीपाद वल्लभ दिगंबरा ॥ ५ ॥
रामदास गुरु माझे आई। मजला ठाव द्यावा पायीं ॥ ६ ॥
कल्याणा योगिराजा। तारी रे महाराजा ॥ ७ ॥
गोपाल राधे कृष्ण गोविंद गोविंद ॥ ८ ॥
राम लक्ष्मण जानकी। जय बोलो हनुमान की ॥ ९

[ सर्व अभंग, पदें, भजनादि म्हणून झाल्यावर उपसंहार करणेपूर्वी 'ज्ञानोबा माऊली तुकाराम' असा थोडा गजर करून नंतर खालचा अभंग म्हणून पुढील उपसंहार म्हणावयाचा ]

## उपसंहार

पद—भीमपलास—धुमाळी

स्वात्मारामोऽहं भूमा परमसुखी।
परमात्माऽहं परिपूर्णोऽहं। परात्परोऽहं, केवलोऽहम् ॥ ध्रु० ॥
स्वेन स्वस्मिन् स्वयं ब्रह्म, स्व महिम्नि स्वानुभूतम्।
सत्यं ज्ञानघन, सिद्ध सहजसुखम् ॥ १ ॥
चित्कल्याण हृदये नित्यं, सेव्यसेवासेवकरहितम्।
प्राप्तं परमपदं, शान्तं विमलसुखम् ॥ २ ॥

## श्लोक

सदा सर्वदा योग तुझा घडावा।
तुझे कारणीं देह माझा पडावा ॥

उपेक्षूं नको गूणवंता अनंता ।
रघूनायका मागणें हेंचि आतां ॥ १ ॥

## मागणें

रघुनायदासा कल्याण व्हावें ।
अतिसौख्य व्हावें आनंद व्हावें ॥
उद्वेग नासो वरि[1] शत्रु नासो ।
नाना विलासें मग तो विलासो ॥ १ ॥
कोडें नको रे कलहो नको रे ।
कापट्यकर्मीं सहसा नको रे ॥
निर्वाणचिंता निरसी अनंता ।
शरणागता दे बहु घातमाता[2] ॥ २ ॥
अजयो न हो रे जयवंत हो रे ।
आपदा नको रे बहु भाग्य हो रे ॥
श्रीमंतकारी जनहीतकारी ।
पर ऊपकारी हरिदास तारी ॥ ३ ॥

## प्रार्थना

कल्याण करी देवराया । जनहित विवरी ॥ ध्रु० ॥
तळमळ तळमळ होतचि आहे । हे जन हातिं धरी ॥ १ ॥
अपराधी जन चुकतचि गेले । तुझा तूंचि सांवरीं ॥ २ ॥
कठिण त्यावरि कठीण झालें । आतां न दिसे उरी ॥ ३ ॥
कोठें जावें काय करावें । आरंभिली वोहरी[3] ॥ ४ ॥
दास म्हणे आम्ही केलें पावलों । दयेसि नाहिं सरी ॥ ५ ॥

१. आणखी. २. युक्तिप्रयुक्ति, अनुभव. ३. वणवा, रडगाणे, सत्यनाश.

### १. आरती—आत्मारामाची.

नाना देहीं देव एक विराजे। नाना नाटक लीला सुंदर रूप साजे॥
नाना तीर्थी क्षेत्रीं अभिनव गति गाजे।
अगाध महिमा पिंड–ब्रह्मांडीं गाजे॥ १॥

जयदेव जयदेव आत्मयारामा। निगमागम शोधीतां न कळे
गुणसीमा। जयदेव जयदेव॥ ध्रु०॥

बहुरूपीं बहुगुणीं बहुता काळांचा।
हरिहर ब्रह्मादीक देव सकळाचा॥
युगानुयुगीं आत्माराम आमूचा।
दास म्हणे महिमा न बोलवे वाचा॥ २॥

### २ आरती—सद्‌गुरूची

सुखसहिता दुखरहिता निर्मळ एकांता।
कलिमलदहना गहना स्वामी समर्था।
न कळे ब्रह्मादिकां अंत अनंता।
तो तूं आम्हां सुलभ जय रूपावंता॥ १॥
जय देव जय देव जय करुणाकरा।
आरती ओंवाळूं सद्‌गुरु माहेरा॥
जय देव जय देव॥ ध्रु०॥
मायेविण माहेर विश्रांति ठाव।
शब्दीं अर्थी लाभ बोलणीं वाव॥
सद्‌गुरुप्रसादें सुलभ उपाव।
रामी रामदासा फळला सद्भाव॥ २॥

### ३ आरती—श्रीरामाची

आत्मारामा ज्ञानगंगास्नानानें।
भूमा परमानंदा चिदंबरानें॥

अहं ब्रह्मास्मि 'सोऽहं सूत्रानें ।
निर्वासना मनें साष्टांगधानें ॥ १ ॥
जय देव जय देव जय जय श्रीरामा ।
आरती ओवाळूं सच्चित्सुखधामा ॥ जय देव जय देव० ॥ध्रु० ॥

ब्रह्मात्माशिवरामा हृत्पद्म वाहो ।
शुद्धचित्त-तुलसीदलमाला वाहो ॥
स्वयसिद्ध अक्षर अक्षता वाही ।
नामरूपातीत गुलाल बुक्काही ॥ २ ॥

षड्रिपु जाळोनी शम-दम-धूपानें ।
पंचप्राण ज्योती स्वय दीपानें ॥
नैवेद्य पच-कोश पक्वान्नें ।
आत्माराम स्तोत्र मनो मौनानें ॥ ३ ॥

स्वात्माराम-भेटी राम दर्शन ।
स्वयं स्वेन् स्वस्मिन् स्वात्मदर्शन ॥
नित्याप्त सिद्ध स्वानुभव पूर्ण ।
श्रीराम जयराम सेवक कल्याण ॥ ४ ॥

★ ★ ★

अच्युतं केशव रामनारायणं ।
कृष्ण दामोदरं वासुदेवं हरिम् ॥
श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं ।
जानकी नायक रामचंद्रं भजे ॥ १ ॥

हरे राम हरे राम राम राम हरे हरे ॥ } तीन वेळां म्हणणें
हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ॥ }

नमः पार्वतीपते हरहर महादेव ।
सीताकांतस्मरण जय जय राम ।

ॐ

आचार्य भजनी मंडळ, संकेश्वर.

# भक्तिरेव गरीयसी ।

भक्तिज्ञानविरागार्थं कर्तव्यं भजनं सदा ॥
रामनामप्रभावेण प्रसन्नो वरदो हरिः ॥ १ ॥

# भक्तिमाला

## पुष्प चौथें

१११०८ श्री श्रीसच्चिदानंद अभिनव विद्याशंकर भारतीस्वामी
श्रीसंत कल्याणसेवक महाराज
श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य संस्थान मठ संकेश्वर-करवीर
विरचित

## श्रीअभंगवाणी

भाग पहिला—परमार्थ पथ : पाकळी १ ते १६ ( अभंग १ ते ४०८ )

### पाकळी १. ईशस्तवन ( अभंग १ ते ३ )

१. गणेशस्तवन

नमितां गणेश सर्व विघ्ननाश । सर्व विद्याधीश लंबोदर ॥ १ ॥
लंबोदर ब्रह्म कर्ता धर्ता हर्ता । सर्व जगसत्ता हा नियंता ॥ २ ॥
नियंता नमितां सेवक कल्याण । होय परिपूर्ण स्वयं ब्रह्म ॥ ३ ॥

### २ रामस्तवन ( संस्कृत )

अयोध्यानगरे पुष्पकविमाने । रत्नसिंहासने समासीनम् ॥ १ ॥
राघवं श्यामलं देवैः स्तूयमानं । प्रसन्नवदनं ध्यायन्नित्यम् ॥ २ ॥
जपेद्रामनाम निर्वाणसौख्यदं । पूर्णकल्याणदं सेवकाय ॥ ३ ॥

### ३ रामवर्णन ( संस्कृत )

वीरासनासीनं रघुवररामं । अमिततेजसं चापहस्तम् ॥ १ ॥
पौलस्त्यसूदनं विभीषणप्राणं । भरतजीवनं सीतानाथम् ॥ २ ॥
हनुमद्हृदयं वसिष्ठस्य ज्ञानं । सेवककल्याणं ध्यायेद् ब्रह्म ॥ ३ ॥

## पाकळी २. परमार्थाकडे कां वळावें ( अभंग ४ ते २० )

### ४. आपदांत ईश्वरभक्ति ; त्यामुळें सार्थक

वैदिक पंडित नवरा लाभला । परि वेडा झाला तारुण्यांत ॥ १ ॥
लाभलें न सुख संसाराचें मज । अंत हो सहज कर्मयोगें ॥ २ ॥
पूर्व कर्म-पुण्यें वैधव्य घडलें । तारुण्यांत आलें मातृगृहीं ॥ ३ ॥
भक्ति-माता सेवा करितसे नित्य । त्यजावें अनित्य कलेवर ॥ ४ ॥
सद्गुरु श्रीराम दर्शन देवोनी । मनाशी ओढोनी नेलें माझ्या ॥ ५ ॥
धरोनीयां कर वरिती यथार्थ । दावी परमार्थ सुलभचि ॥ ६ ॥
सर्व सुख लाभ सदगुरुसंयोगें । भक्तिमाता योगें पूर्ण झाला ॥ ७ ॥
माया लज्जा गेली जनीं मनीं नाहीं । रतली मी पाहीं सद्गुरूसी ॥ ८ ॥
माता पिता भर्ता श्रीराम सर्वथा । सेवक तत्त्वतां राम होय ॥ ९ ॥

### ५. विषयाचें सुख तें महादुःख

विषयीं हो नाहीं सुख । निर्विषय सत्य सुख ॥ १ ॥
सुखासाठीं खटपट । करिताती पहा नीट ॥ २ ॥
सुख नोहे दुःख लोटे । जन्म मृत्यु भोगी खेटे ॥ ३ ॥
जन्म मृत्यु चूकवाया । धरी श्रीरामाचे पाया ॥ ४ ॥
मोक्ष सत्य राम एक । वरी कल्याणसेवक ॥ ५ ॥

## ६. मरणाचें स्मरण ठेवून रामास भजा

कोणी एका काळीं सोडोनियां देहा। जावें लागे गेहा पुत्र मित्रा ॥ १ ॥
पुत्र मित्र कोणी सोडवीना अंतीं। यमदूत नेती प्राणसखा ॥ २ ॥
सखा सोयरा तो आत्माराम एक। इतर मायीक कामा नये ॥ ३ ॥
नये कामा माया या मा सा ती वायां। भजा रामराया नित्यनेमें ॥ ४ ॥
नित्य नेमें सेवें सीताराम भेटे। नवल हें मोठें सर्वनास ॥ ५ ॥
सर्व त्रास चुके जन्ममरणाचा। राम अयोध्येचा सन्निधानीं ॥ ६ ॥
सन्निधानीं सदा सेवकासी दिसे। इतरांसी असे दुरावला ॥ ७ ॥

## ७. रामाविण इतर सर्व सुखाचे सोयरे

केंची जाया केंची माया। भुलूं नको मूर्खा वायां ॥ १ ॥
प्रेम आपल्याकरितां। मिथ्या दाविते ममता ॥ २ ॥
दुःख होतां दूर पळे। तरी उघडेना डोळे ॥ ३ ॥
ऐसा नाहक संसार। दुःख भोग जन्मभर ॥ ४ ॥
अंतीं सोडविना कोणी। रामावीण नाहीं धनी ॥ ५ ॥
करीं सोयरा श्रीराम। सेवकाचा जो विश्राम ॥ ६ ॥

## ८. रामच खरा आसरा; इतर स्वार्थाचें नातें

ध्यावा राम सीतापती। तोचि तारी सर्वाप्रती ॥ १ ॥
नाहीं कोणीच आसरा। रामावांचोनी दूसरा ॥ २ ॥
सर्व आपस्वार्थी जन। सांगा परमार्थी कोण ॥ ३ ॥
रामीं गुंते ज्याचें मन। तोचि परमार्थी जाण ॥ ४ ॥
लाभे सेवकासी राम। नाहीं सेवेपर वर्म ॥ ५ ॥

## ९. आत्मारामावांचून इतर सर्व कांहीं भ्रम

जाती कुल गोत्र विद्या धन मान। नामरूप मन बंधनचि ॥ १ ॥
बंधन तोडोनी स्वयें मुक्त जाला। आत्मरूप त्याला परीपूर्ण ॥ २ ॥

परिपूर्ण आत्मा विराजतो सदा। अखंड आनंदा पार नाहीं ॥ ३ ॥
नाहीं पार आदि अंत नेति नेति। कुंठे शब्द मती स्वानुभवें ॥ ४ ॥
स्वानुभवें एक सेवका कल्याण। स्वयं रामकृष्ण कृपा साच ॥ ५ ॥

## १०. मायेचें दुःख उमजून राम जोड

नको मायेच्या तो वारा। चोर्यांशीच्या येरझारा ॥ १ ॥
माया मनासी मोहवी। मिथ्या विषयीं गुतवी ॥ २ ॥
नसे तेंचि दिसें खरें। भास रज्जु सर्पाकारें ॥ ३ ॥
चांदी नाहीं तो शिंपला। मृग भुले मृगजला ॥ ४ ॥
वंध्यापुत्र शशशृंग। तोडी मायेचा तो संग ॥ ५ ॥
जोडी राम सीतापती। ऐसी सेवक विनंति ॥ ६ ॥

## ११. परमार्थावरील आक्षेप

पुत्र मित्र भार्या गेह देह धन। नाशिवंत जाण जग सर्व ॥ १ ॥
सर्व जग मिथ्या वेदांतोपदेश। केला सर्व नाश साधूसंतीं ॥ २ ॥
साधुसंतीं सारा समाज निर्वीर्य। काय नाम 'आर्य' आर्यावर्ती ॥ ३ ॥
आर्यावर्ती काय हरिभक्तिमार्गे। कसे जन जगे अर्थ नाहीं ॥ ४ ॥
नाहीं अर्थ धर्म काम, मोक्ष कैंचा। सेवक जगाचा वदतसे ॥ ५ ॥

## १२ परमार्थाचें समर्थन

अर्थ काम यांचा धर्मांशीं संयोग। वर्णाश्रम सांग नुपेक्षी वा ॥ १ ॥
नुपेक्षी वा भक्ति रामभूतमात्रीं। भावना अंतरीं शुद्ध व्हावी ॥ २ ॥
व्हावी शुद्ध चित्तवृत्ति रामीं लीन। हेंचि तत्त्वज्ञान सांगताती ॥ ३ ॥
सांगताती संत साधुजन सारे। तरोनी तारारे सर्व जना ॥ ४ ॥
जना सर्व राम भजोनी कल्याण। सेवकाचें ज्ञान राम जग ॥ ५ ॥

## १३. नाशिवंत टाकून त्याच्या बदल्यांत शाश्वत सुख घे

नाशिवंत देसी ब्रह्मसुख घेसी। मग तुज कैसी उपाधी बा ॥ १ ॥
नाशिवंत दिलें पद तें लाधलें। आतां तूं आपुलें मानूं नको ॥ २ ॥
मानूं नको देहे मानूं नको गेहे। पंचभूतिक हें जाईजणें ॥ ३ ॥
जाईजणें दृश्य नाशिवंत भास। मनदृश्य भास जाणतसे ॥ ४ ॥
जाणतसे सर्व जाणत्या नेणून। जाण-नेण-पण सोडी बापा ॥ ५ ॥
सोडी कल्पनेचा प्रांत नामरूपें। सेवी बा अरूप सर्वातीत ॥ ६ ॥
सर्वातीत जाणे ऐसे ज्ञाते थोडे। जोडे वाडे कोडें सेवकासी ॥७॥

## १४. असार संसारांत एक परब्रह्मसार (संस्कृत)

असारे संसारे साररूपमेकं। नेह नानात्मकं परब्रह्म ॥ १ ॥
परब्रह्म नित्यं ज्ञानानंदसत्यं।
अव्यक्तमचिन्त्यं वाचातीतम् ॥ २ ॥
वाचातीतमजं निर्मलं निश्चलं।
अखंडमकलं सच्चित्साख्यम् ॥ ३ ॥
सच्चित्सुखघनं सर्वातीतपूर्णं। सेवककल्याणं स्वयंसिद्धम् ॥ ४ ॥

## १५. संसारांत आयुष्य व्यर्थ न घालवितां रामभक्तीनें कृतार्थ व्हावें

संसाराचे पायीं रात्रंदिन कष्ट। करिताती नष्ट व्यर्थ आयु ॥ १ ॥
व्यर्थ वय जातें राम भजाना कां। भुलला मायिका मोहपाशा ॥ २ ॥
मोहपाश सूक्ष्म बाधे ज्ञानियासी। श्रीराम भक्तासी रक्षीतसे ॥ ३ ॥
रक्षीतसे राम-पायीं मन ठेवा। स्वानंद लुटावा अहर्निश ॥ ४ ॥
अहर्निश राम हृदीं करी वास। रामसेवकास कल्याणचि ॥ ५ ॥

## १६ दुर्लभ नरदेहांत भक्ति हाच लाभ ( संस्कृत )

दुर्लभं मानव प्राप्येह शरीर । विषय विस्तारो मास्तु मास्तु ॥ १ ॥
मास्तु मास्तु कदा निःसाराहंकारो । भज निर्विकारं राम-ब्रह्म ॥ २ ॥
राम-ब्रह्म साक्षादक्षरममल । व्यापकं सकल गुणातीतम् ॥ ३ ॥
गुणातीतमेकं सच्चिद्घनानंद । पूर्णकल्याणदं सेवकाय ॥ ४ ॥

## १७. नरजन्मांतील कर्तव्य

जन्मा आलियाचें करावें सार्थक । जेणें राम एक ठायीं पडे ॥ १ ॥
ठाई पडे राम करितां साधन । श्रवण-मनन-निदिध्यास ॥ २ ॥
निदिध्यासें निज स्वरूप सांपडे । जेथें सुटे कोडें मायिकाचें ॥ ३ ॥
मायिक संसार मिथ्या व्यवहार । सोडोनी साचार राम धरा ॥ ४ ॥
धरा राम एक तोडा सर्व दुःख । जरडीत सुख सेवकासी ॥ ५ ॥

## १८. रामकृपा हेंच जीवन-सार्थक

जन्मा आलियाचें जाहलें सार्थक । रामकृपा देख जाली जरी ॥ १ ॥
होय रामकृपा ऐसे फार थोडे । समर्थ रोकडे रामदास ॥ २ ॥
रामदासीं कृपा उगीच का जाली । तपश्चर्या केली विलक्षण ॥ ३ ॥
विलक्षण सर्व समर्थांचें पहा । सेवकासी दहा दिशा पेरीं ॥ ४ ॥

## १९. आत्मलाभच श्रेष्ठ

आत्मलाभाहून श्रेष्ठ लाभ नाहीं । पुत्र वित्त पाही नाशिवंत ॥ १ ॥
नाशिवंत सर्व विश्व नामरूप । कल्याण अरूप मायातीत ॥ २ ॥
मायातीत सच्चित्सुख नित्यपूर्ण । स्वरूप वर्णन नेति नेति ॥ ३ ॥
नेति नेति श्रुति वदती वेदांतीं । कुंठे शब्द मती स्वानुभवें ॥ ४ ॥
स्वानुभवें आत्मा ब्रह्म वस्तु एक । कल्याणसेवक स्वयंसिद्ध ॥ ५ ॥

## २०. सन्मार्ग

राम पाहूं या हो । ब्रह्म होऊं या ॥
निजानंदीं सर्व काळ । दृढ राहूं या ॥ ध्रु० ॥

मन वाचा आवरूनी । दृढ समाधि साधोनी ॥
जातां येतां जनीं वनीं । एक पाहूं या ॥ १ ॥
व्याप्य-व्यापकाचें नांव । कार्य करणाराचें गांव ॥
नको सकल्पासी वाव । अज अव्यया ॥ २ ॥

ब्रह्मप्राप्ती नवी नोहे । स्वस्वरूप सदा आहे ॥
उलटूनि मार्गे पाहे । पूर्ण अद्वया ॥ ३ ॥
कड-चामीकर न्यायें । भ्रांति नाशे ब्रह्म होये ॥
सच्चित्सुखघन स्वयें । विना माया ॥ ४ ॥

नित्य शुद्ध बुद्ध मुक्त । वेद वेदांत सिद्धांत ॥
सेवक कल्याण सयुक्त । ब्रह्म व्हा या ॥ ५ ॥

# पाकळी ३. दुर्गुणत्याग ( अभंग २१–४० )

## २१. षड्रिपु आहेत, तेथें परमार्थ नाहीं

काम-लोभाधारें अहंकार ठाणें । सत्त्वाचें चांदणें नाहीं तेथें ॥ १ ॥
नाहीं तेथें धर्म भूत-दया दान । एकात्मदर्शन भक्तिप्रेम ॥ २ ॥
भक्तिप्रेम रामकृष्ण हरि वाचें । सहज जीवाचें कोड पुरें ॥ ३ ॥
पुरें कोड रामनामें प्रेमरस । हृदयीं रामास सांठवितो ॥ ४ ॥
सांठवितो हरि सेवक कल्याण । नवाहे समान जन राम ॥ ५ ॥

विधी देव पूजा काम्य आचरण । भोगपरायण पुरुषार्थ ॥ २ ॥
पुरुषार्थ धर्म अर्थ काम हाही । नाहीं कांहीं पाही पूर्णपणें ॥ ३ ॥
पूर्णपणें जन सत्त्वहीन दीन । आत्मबलहीन मोक्ष कैचा ॥ ४ ॥
कैचा मोक्ष सुख निर्वीर्य मानवा । भजा रे राघवा सेवक व्हा ॥ ५ ॥

## २३. विषयासक्ताला मुक्ति नाहीं

विषयाचा अभिलाष । त्यासी सर्व भेद खास ॥ १ ॥
विषयाच्या चिंतनानें । मुक्ति नर काय जाणे ॥ २ ॥
विषयाशा आधीं सांडी । मग साधन वा मांडी ॥ ३ ॥
गोडी वैराग्याची जाण । गुरुरूपें साच पूर्ण ॥ ४ ॥
नर नारी भेद भासे । तया ब्रह्मज्ञान नसे ॥ ५ ॥
विषयाचें अणुमात्र- । भान संसारचि अत्र ॥ ६ ॥
सदा निर्विषय मन । पूर्ण सेवक कल्याण ॥ ७ ॥

## २४. ईषणात्रयांच्या त्यागावांचून परमार्थ नाहीं

कनक कांता कीर्ति न शिरेचि चित्त । तोचि परमार्थ साधितसे ॥ १ ॥
साधितसे सत्य सार सच्चित्सुख । वायां भार देख शब्दज्ञान ॥ २ ॥
शब्दज्ञान साक्षाद् अपरोक्ष ब्रह्म । पूर्णानंद धाम न च जोडे ॥ ३ ॥
जोडे राम ब्रह्म जनीं जनार्दन । भजन कीर्तन आनंदानें ॥ ४ ॥
आनंदी आनंद जन जनार्दन । सेवक कल्याण आत्माराम ॥ ५ ॥

## २५. दुर्गुणत्याग–सद्गुणसंपादन–तर मुक्ति

नवरा न वरा मारा अहंकारा । सद्गुरूचे धरा पाय भावें ॥ १ ॥
माया लज्जा आशा शाकिनी डाकिणी । उच्चाटा साजणी ज्ञानसंगें ॥ २ ॥
भक्ति माता, बंधू विवेक विराग । मनोजय योग साधा आधीं ॥ ३ ॥

तितिक्षा बहिण सद्‌गुरू नवरा । बोध पुत्र घरा सुखवी तो ॥ ४ ॥
मुक्ति कांता संगें सेवक कल्याण । उन्मत्त उन्मन एकी एक ॥ ५ ॥

## २६. आधीं मन मुंडा

वेदांतश्रवण करिती सकळ । आचरण वळ नाहीं कांहीं ॥ १ ॥
कांहीं नाहीं म्हणे भोगेच्छा सुटेना । मायेच्या बंधना तोडिना तो ॥ २ ॥
तोडिना तो इच्छा मन आवरोनी । मनातें धरोनी मारावें त्या ॥ ३ ॥
मारावें त्या मनें मनातें सेवक । कंटकें कंटक उच्चाटा हो ॥ ४ ॥

## २७. तेणें पथ्यें सांभाळावीं

हरिनाम घेतो म्हणोनियां मदा । नाचरावें कदा दोष कोणी ॥ १ ॥
दोष कोण करी स्मरण भजन । तेणें भक्ति जाण ओस पडे ॥ २ ॥
ओस पडे धर्म हरिनाम बळें । अधर्म दसळे अंतरींचा ॥ ३ ॥
अंतरींचें कर्म शुद्ध नोहे बापा । देवाचेनि खेपा मावळेना ॥ ४ ॥
मावळे सज्जन संगतीनें दोष । कल्याण अशेष सेवकाचें ॥ ५ ॥

## २८. क्रोध हा थोर शत्रु

कशाला कोप हृदयांत । कशाला क्रोध चित्तांत ॥ ध्रु० ॥
कशाला राग सर्वत्र । पुत्र मित्रावरी अत्र ॥
इह-पर सौख्य ना कुत्र । तयाला दुःख सर्वत्र ॥ १ ॥
क्रोध हा मांग चांडाळ । स्पर्शतां तनु अमंगळ ॥
करावें स्नान तात्काळ । विवेकें शुद्ध निर्मळ ॥ २ ॥
करोनी कोप यमसदना । जाउनी यातना नाना ॥
भोगितां नीच योनींना । क्रोध हा काळ सोडीना ॥ ३ ॥
कोप हा काळ प्रत्यक्ष । दया ना मायेचा अक्ष ॥
बाल स्त्री मारितो साक्ष । ऋषि मुनी देत समक्ष ॥ ४ ॥

विचारें शांति साधावी । सुराचा मार्ग ती दावी ॥
रघुवीर भक्ति ही जरवी । पाविजे परतरा पदवी ॥ ५ ॥
सदा चित्सुखघना ध्यावें । श्रीराम नाम हें गावें ॥
स्वसौख्य नित्य भोगावें । सेवका वेडचि वरवें ॥ ६ ॥

## २९. दंभ टिकत नाहीं

कशाचें तें काय कोठें अनुष्ठान । पळाले ब्राह्मण अष्ट दिशा ॥ १ ॥
कडासनें माळा पळी पंचपात्र । सर्व कांहीं तत्र राहिलेंसें ॥ २ ॥
दे माय धरणी ठाव जाली स्थिती । वस्त्रें गळालीं तीं पळतां पळतां ॥ ३ ॥
दंभ करी सोंग दावावया जगा । देवासाठीं जागा मनीं नाहीं ॥ ४ ॥
सेवक कल्याण धरी खरा भाव । एक मनीं देव दत्तात्रेय ॥ ५ ॥

## ३०. दांभिक लक्षणें

संत केसा ओळखावा। साधू कोण तो जाणावा ॥ १ ॥
कलियुगीं जग भोंदू। वेष करिती सुसाधू ॥ २ ॥
तांडा शिष्यशिष्यीणींचा। हव्यास तो संपत्तीचा ॥ ३ ॥
'जावें गुरूसी शरण। अर्पावें त्या तनु धन' ॥ ४ ॥
ऐसा उपदेश याचा। स्वार्थ साधिताती साचा ॥ ५ ॥
परमार्थ-लेश नाहीं। द्रव्य दारा दृष्टी पाही ॥ ६ ॥
नादीं यांच्या लागूं नका। गीता भागवत देखा ॥ ७ ॥
सेवकासी तळमळ। तोडू बुवाबाजी मूळ ॥ ८ ॥

## ३१. अभिमान सोडला तर जनीं जनार्दन दिसेल

सोडूनियां अभिमान। पाहीं जनीं जनार्दन ॥ १ ॥
गूळ आणि गोडी पाहीं। भिन्न नोहे कदा कांहीं ॥ २ ॥
शक्ति शक्तिवता काहीं। भेद नसे अणु पाही ॥ ३ ॥

जन नोहे, जनार्दन। सर्व कांहीं नारायण ॥ ४ ॥
अणुरेणू पूर्ण राम। सेवकाचें सुखधाम ॥ ५ ॥

## ३२. निंदा हें महापाप

सार भोक्ते सार भोगिताती सदा। इतरासी धंदा निंदेचा तो ॥ १ ॥
निंदा कोण करी न जाणे जो राम। त्याचें नष्ट कर्म कैसें जाये ॥ २ ॥
दुसऱ्याचा दोष नसतांचि काढी। दोष-परवडी स्वयें मात्र ॥ ३ ॥
सेवक साचार विनवी भल्यातें। गीतेच्या अर्थातें पहा घ्या हो ॥ ४ ॥

## ३३. आपले दोष पहा; पराचे नको

प्रत्यक्ष वर्तन आक्षेपार्ह नाहीं। परी लोक पाही दोषदृष्टी ॥ १ ॥
दोषदृष्टी लोक लौकिक जाणेना। रूढी आणी मना पुरातन ॥ २ ॥
पुरातन धर्म आचार सोज्वळ। घरोघरीं खूळ सुधारक ॥ ३ ॥
सुधारक सर्व आचारविचार। पाळीना साचार कांहीं एक ॥ ४ ॥
कांहीं एक दोष सज्जना लाविती। स्वयें आचरिती दोष मात्र ॥ ५ ॥
दोषमात्र मनीं जनीं विचक्षण। परस्त्री-कांचन-मद्य सेवी ॥ ६ ॥
सेवी मद्यमांस ब्राह्मण म्हणवी। फजीती करावी कासयासी ॥ ७ ॥
कासयासी निंदा करितां पराची। कल्याण साधाचि सेवकत्वें ॥ ८ ॥

## ३४. दोषदृष्टि सोडा

मृत्पात्र ठेवोनी शकुनी कुपात्र। मामासी अरत्र परत्र ना ॥ १ ॥
परत्र ना झालें गेलें सोडा सारें। स्वभाव सोडा रे दोषदृष्टी ॥ २ ॥
दोषदृष्टी मनीं सद्गुण संपादा। कल्याण संपदा सेवकासी ॥ ३ ॥

## ३५. अवद्याला मोक्ष कसला

देह आत्मा किंवा देहाहून भिन्न। भिन्न तरी जाण विभु न वा ॥ १ ॥
विभु जरी आत्मा कर्ता कीं अकर्ता। आत्मा हा अकर्ता भोक्ता न वा ॥ २ ॥

अभोक्ताचि आत्मा एक वा अनेक। होय जरी एक कैसा आहे ॥ ३ ॥
आहे सविशेष किंवा निर्विशेष। जरी निर्विशेष मोक्ष कैसा ॥ ४ ॥
कैसा मोक्ष ज्ञानें प्रपंच हा मिथ्या। सेवक हो सत्यामार्गी लीन ॥ ५ ॥

## ३६. संशय सोड !

नको वाव संशयासी। सर्व नाश संशयेसी ॥ १ ॥
संशयात्मा विनश्यति। गीतें श्रीकृष्ण बोलती ॥ २ ॥
अंतरींचा राम सदा। मनीं धरावा सारिखा ॥ ३ ॥
सेवकासी राम ध्यान। पूर्ण लाभले कल्याण ॥ ४ ॥

## ३७. करंटा बुद्धीच सांगतो

आचरण नाहीं काडीचें जीवनीं। उद्धत तो जनीं बोध करी ॥ १ ॥
बोध करी मना मग सर्व जनां। ब्रह्मांड रचना पालटण्या ॥ २ ॥
पालटण्या सर्व सुधारक सिद्ध। मनोवृत्ति शुद्ध नाहीं नाहीं ॥ ३ ॥
नाही नाहीं जन राम ही भावना। तरी कार्य जाणा व्यर्थ सारें ॥ ४ ॥
व्यर्थ सारें नोहे श्रीराम जाणतां। सेवक तत्त्वतां कल्याणचि ॥ ५ ॥

## ३८. दुर्गुणत्याग

थोतांड पाषांड बंड नको बापा। नीच योनि खेपा कासयासी ॥ १ ॥
कासया भजनीं विमुख सर्वदा। भोजनीं कां कदा अविश्वास ॥ २ ॥
अविश्वास देव धर्म संत कार्जी। वदे हांजी ! हांजी ! साहेबांसी ॥ ३ ॥
साहेब शब्दासी पाळितसे पूर्ण। करी अनमान मायबापा ॥ ४ ॥
मायबाप देव धर्म संत व्यर्थ। सर्वत्र पोटार्थ मरताती ॥ ५ ॥
मरण चुकवी राममाय पूर्ण। सेवक कल्याण रामकृपें ॥ ६ ॥

### ३९. काय त्यागावें

नको नको दुष्टसंग । क्षणोक्षणीं मनोभंग ॥ १ ॥
दुष्ट बुद्धि नष्ट कृती । द्रव्य-दारा हरीताती ॥ २ ॥
निंदा अपशब्द बोली । सदा सर्वदा टवाळी ॥ ३ ॥
काम-क्रोधाचें विढार । मोह मद लोभ घर ॥ ४ ॥
स्त्रैण संगती पासोनी । दूर व्हावें साधकांनीं ॥ ५ ॥
सज्जनाचे संगतीचें । सेवकासी भाग्य साचें ॥ ६ ॥

### ४०. स्वभावधर्म

सूर्याचा स्वभाव प्रकाश उष्णता । अग्नीसी शीतता कैसी होय ॥ १ ॥
सज्जन पहातो सर्वाभूतीं राम । सर्वदा निष्काम आत्माराम ॥ २ ॥
श्वानपुच्छापरी दुर्जन स्वभाव । स्वानंदानुभव त्यास कैसा ॥३॥
दुर्गुणा सोडोनी सद्गुणा वरावें । सेवकें सेवावें स्वात्मानंदा ॥४॥

## पाकळी ४. सद्गुणसंपादन (अभंग ४१ ते ६०)

### ४१. षड्न्यासी तो संन्यासी ज्ञानाधिकारी

द्रव्य दारा त्याग करी । तोचि पूर्ण अधिकारी ॥ १ ॥
अंतर्त्याग मुख्य घडे । तया रघुराम जोडे ॥ २ ॥
ब्रह्मज्ञानी खरा जाणा । वैराग्याचा योगिराणा ॥ ३ ॥
झालें वैराग्य विषयीं । तोचि लाहे ज्ञानसोयी ॥ ४ ॥
देई वैराग्य सेवका । राजाराम पूर्ण निका ॥ ५ ॥

### ४२. षड्रिपूंच्या नाशानें स्वरूपता

नवरा मारिला सद्गुरु वरीला । दंभ दीर गेला देशोधडी ॥ १ ॥
सासुसासऱ्याची दिली तिलांजली । भक्ति माता आली प्रेमासाठीं ॥२॥

बोध-पुत्र जाला घरदार जाळी। शत्रूतें निर्दाळी क्षणमात्रें ॥ ३ ॥
पुत्र तो बुडाला उन्मनी-गंगेंत। विलाप करीत कोण बेसे ॥ ४ ॥
मारिला वरील जाला आला गेला। एकलाचि ठेला एकपणें ॥ ५ ॥
एकपण नाहीं दुजेपण कोठें। शब्दें काय भेटे? सच्चित्सुख ॥ ६ ॥
वाचे मना मौन केवळ श्रीराम। सेवक अनाम सहजचि ॥ ७ ॥

## ४३. पश्चात्तापानें पापनाश

आज सुदीन पर्वणी। स्नाना जातां धरा मनीं ॥ १ ॥
काजळाचा लेप करा। मुखींचपराक मारा ॥ २ ॥
पापनाश होय सर्व। जोडे पुण्य स्वस्वभाव ॥ ३ ॥
रामकृष्ण हरि तरी। सेवकांतें मुक्त करी ॥ ४ ॥

## ४४. देहाचा निर्वेद ( वीट, कंटाळा ) यावा

भुलूं नको बाह्य वेषा। नाना अलंकार भूषा ॥ १ ॥
मिथ्या मायेचा बाजार। तेथे गुंतें मन चोर ॥ २ ॥
अस्थि मांसाचें शरीर। शिरा नाडी मज्जा शिर ॥ ३ ॥
नाक कान तोंड डोळे। अवघे मांसाचे हे गोळे ॥ ४ ॥
नवद्वारें वाहे घाणी। तेथें कां बा गुंते प्राणी ॥ ५ ॥
माया-नवल हें पहा। भुलतसे जन देहा ॥ ६ ॥
विवेकासी केले जेणें। त्याचें संपलें भुलणें ॥ ७ ॥
सार आत्मा निवडिला। रामीं सेवक नटला ॥ ८ ॥

## ४५. शुद्धचित्त असलें म्हणजे संत भेटतात

चित्त नाहीं वित्तीं कामाची न चाड। माया मोह वेंड मानामान ॥ १ ॥
मानामान मिथ्या, वर्ते समाधानी। नेणता जाणोनी ऐशा नरा ॥ २ ॥
ऐशा नरा साधु भेट शीघ्र देती। सेवका जोडती रामपाय ॥ ३ ॥

## ४६. सत्पात्रीं दान

दान तेंचि जाणा सत्पात्रीं अर्पण। ईश्वरतर्पण तेणें होय ॥ १ ॥
सत्पात्र सोडोनी अन्यासी जें दान। भस्मीं अवदान दिल्यापरी ॥ २ ॥
सेवका कल्याण सत्पात्रीं सुदान। फल प्रासी जाण अचिंत्यचि ॥ ३ ॥

## ४७. याचकाला विन्मुख पाठवूं नको

देऊं काय तूज सांग आतां मज। गृहांत सहज कांहीं नाहीं ॥ १ ॥
नाहीं कांहीं ऐसें म्हणों नये कदा। आहेचि सर्वदा वस्तुमाजीं ॥ २ ॥
माजी वस्तु गृहीं जी कां असे सत्य। तीच देई सत्य बहु मानी ॥ ३ ॥
मानी बहु बाळा आवळाचि एक। शंकर सेवक कल्याणचि ॥ ४ ॥

## ४८. सद्गुणांनीं गुरुपूजा

गुरुपद पूजूं भावें। सेवा करूं सर्व भावें ॥ १ ॥
पीठ हृदय करून। गुरुमूर्ती संस्थापून ॥ २ ॥
शुद्ध भाव मन चंगा। जलगंगा पांडुरंगा ॥ ३ ॥
नेसावया चिदंबर। गंध सचित्सुख थोर ॥ ४ ॥
भक्ति-सुवर्ण भूषणें। रामनाम पुष्प लेणें ॥ ५ ॥
अहं सोहं धूप दीप। मोद नैवेद्य अमूप ॥ ६ ॥
ऐक्यभावें नमस्कार। सेवकाचे सोपस्कार ॥ ७ ॥

## ४९. अमानित्व – अदंभित्व

सन्मान सांकडें साधुसंत वर्या। स्वकीर्ति कानीं या पडो नेदी ॥ १ ॥
पडो नेदी मन सत्कार आदरीं। सर्वज्ञता परी लीनता हो ॥ २ ॥
लीनता स्वरूपीं लौकिकीं उद्वेग। मोठेपणा चांग डावलती ॥ ३ ॥
डावलती मान कीर्ति चाड नाहीं। माया मिथ्या पाही सर्वकाळ ॥ ४ ॥
सर्वकाळ मन श्रीरामस्वरूप। कल्याण अमूप सेवकाचें ॥ ५ ॥

## ५०. अमानित्व

नोळखावें मज देखावें न कोणी । योगी भक्त ज्ञानी साधूसंत ॥ १ ॥
साधुसंत मान लोकीक देखून । उपेक्षा करून पळबसे ॥ २ ॥
पळतसे परी पळो नेदी जन । जन जनार्दन पूर्ण भाव ॥ ३ ॥
पूर्ण भाव ऐसा निरपेक्ष ज्ञानी । राम जनीं वनीं सेवकासी ॥ ४ ॥

## ५१. अभिमान टाकून उपासना कर

इच्छूं नको मान त्यागी अभिमान । नेम उपासना सोडूं नको ॥ १ ॥
देह हा कारणी लावी वा जनाच्या । परमार्थ साचा प्रगटवी ॥ २ ॥
उपासना केंद्र बहुविध स्थानी । स्थापी ज्ञानपानीं तृप्तवाया ॥ ३ ॥
रामाचा आधार सर्वांसी साचार । गुरु सर्वाधार सेवकासी ॥ ४ ॥

## ५२. नेणिवेमाजी दडे

आपुलें सुकृत आपण न बोले । वाय अभ्यासिलें न मीरवी ॥ १ ॥
मिरवी न ज्ञान वैराग्य स्वधर्म । कर्म धर्म वर्म न सांगेची ॥ २ ॥
न सांग स्वात्मस्थिति ब्रह्मभाव । ज्ञानया स्वभाव स्वयसिद्ध ॥ ३ ॥
स्वयसिद्ध आतमाराम ज्ञानीराज । सेवक सहज रामरूप ॥ ४ ॥

## ५३. भूतदया हा मुख्य गुण

दु ख देऊ नये कोणीं एका प्राण्या । मधुर बोलण्या काय वेंचे ॥ १ ॥
आत्मवत सर्व माना प्राणीमात्र । श्रीराम सर्वत्र भरलासे ॥ २ ॥
अणू रेणू माजी श्रीराम संपूर्ण । शिवमुनि जन ध्याती सदा ॥ ३ ॥
आनंदी आनंद रामरूपा मार्जि । अमृत पवित्र रामपद ॥ ४ ॥
जोड स्वात्माराम सेवका कल्याण । राम ब्रह्म पूर्ण एकीएक ॥ ५ ॥

## ५४. वृथा अहंकार टाकून श्रद्धेनें परमार्थ साधा

अहंकार वृथा मनुष्यें न माथां। घेऊनियां व्यथा वडवड ॥ १ ॥
करावी कासया वल्गना पोकळ। तुटे मायाजाळ ऐसें करा ॥ २ ॥
श्रीरामचरणीं माथा लीन व्हावा। 'श्रीराम 'करावा नामघोष ॥ ३ ॥
शम दम पूर्ण मानसीं वैराग्य। तरी होय योग्य आत्मज्ञाना ॥ ४ ॥
असावा विश्वास वेद-गुरु-वाक्यीं। पूर्ण ब्रह्मात्मैक्यीं सेवक हो ॥ ५ ॥

## ५५. दया नसेल तर भजन व्यर्थ

ऐसें कैसें हो भजन। छेप सचेतनीं पूर्ण ॥ १ ॥
वेल तुळसी तोडोनी। वहातसे अचेतनीं ॥ २ ॥
क्षुधितासी अन्न देता। श्राद्ध पक्ष आहे म्हणा ॥ ३ ॥
मुंगी वासराचे मुखीं। काढोनियां खावें सुखीं ॥ ४ ॥
व्याही जावयासी दान। अतिथींसी ना दे जाण ॥ ५ ॥
बैल घोडा जोडी स्वार। करी प्रयाण हो नर ॥ ६ ॥
पाही राम सर्वभूतीं। करी सचेतनीं प्रीती ॥ ७ ॥
राम चिन्मात्र सर्वत्र। पाहे सेवक पवित्र ॥ ८ ॥

## ५६. दया क्षमा शांति, तेथें देवाची वसती

केवळ देऊळीं देव नाहीं कांहीं। दया धर्म पाहीं तेथें देव ॥ १ ॥
देव तेथें कार्य समाजोपयोगी। उपकारी योगी धर्म रक्षी ॥ २ ॥
रक्षी धर्म संत सर्व देव पाही। संस्कृति धर्महि रक्षीतसे ॥ ३ ॥
रक्षितसे सर्वा साभिमान पूर्ण। सेवक कल्याण वासुदेव ॥ ४ ॥

## ५७. विवेक जागृत करा

कोठील तूं कोण कोठोनी आलासी। ऐशा विचारासी घेई बापा ॥ १ ॥
जेथून आलासी तया चुकलासी। देह मी म्हणसी अविचारें ॥ २ ॥

# पाकळी ५. ईश्वराचें स्वरूप (अभंग ६१ ते १०२)

## ६१. मूर्खस्य प्रतिमा देवः ।

प्रतिमाचि देव हा ज्याचा निश्चय । तो न करी सोय सर्वेनासी ॥ १ ॥
सर्वत्र श्रीराम अंतर्बाह्य पूर्ण । संवळींत खूण काय आहे ॥ २ ॥
आहे काय देवाविण अणुरेणू । जनीं जनार्दनू सेवकाचा ॥ ३ ॥

## ६२. मूर्ति नाशिवंत

धातु पाषाणाचा देव । नवसीती सर्व जीव ॥ १ ॥
पुत्र देई वा मजसी । विनविती पाषाणासी ॥ २ ॥
पति कासयासी व्हावा । देव पुत्र देतो जीवा ॥ ३ ॥
देव गोटा भाव खोटा । सेवकाचा राम मोठा ॥ ४ ॥

## ६३. पाषाणाचा देव खोटा

पाषाणाचा देव मातिचाचि भक्त । सर्वपण व्यक्त नाहीं देवा ॥ १ ॥
देवा नाहीं ठाव भक्त अभाविक । देव भक्त देख निलाजिरे ॥ २ ॥
निलाजिरे सारे ऐसे देव भक्त । सेवकासी व्यक्त सर्व राम ॥ ३ ॥

## ६४. प्रतिमा हा देव नव्हे

पूजुनियां देव संपुष्टीं ठेविला । सर्वत्र भरला कळेनाचि ॥ १ ॥
कळेना प्रतिमा देव कैसा होय । भाव तरी काय पूर्ण आहे ॥ २ ॥
आहे पूर्ण देव प्रतीमा म्हणती । परि तो नेणती सर्वाठायीं ॥ ३ ॥
सर्वांठायीं राम जनीं जनार्दन । सेवक कल्याण पूर्णपणें ॥ ४ ॥

## ६५. ब्रह्मस्वरूप द्वंद्वातीत

द्वैताद्वैतातीत लक्ष्यालक्ष्यातीत । वेदशास्त्रातीत मत्स्वरूप ॥ १ ॥
परापरातीत ज्ञानाज्ञानातीत । कर्माकर्मातीत निरंतर ॥ २ ॥

देह प्राण मन बुद्धि नव्हे खास । मूळ स्वरूपास जाण आधीं ॥ ३ ॥
नित्य शुद्ध बुद्ध मुक्त हा स्वभाव । सांपडला ठाव सेवकासी ॥ ४ ॥

## ५८. विषयत्याग करून, आत्मोद्धारासाठीं रामभजन कर (संस्कृत)

निःसारविषयसेवनं विहाय । संसारोद्धाराय रामं भज ॥ १ ॥
रामं भज सदा सगुण निर्गुण । मायाविलक्षण निराकारम् ॥ २ ॥
निराकारपूर्ण साकारमोंकार । ब्रह्म निर्व्यापारं सर्वाधारम् ॥ ३ ॥
सर्वाधारमेकं भवरोगवैद्यं । मनोवाचाऽवेद्यं गूढात्मानम् ॥ ४ ॥
गूढात्मानं सर्वसेवककल्याण । शिवमुनिप्राणं नित्य भज ॥ ५ ॥

## ५९. आनंद असेल तर एकाग्र ध्यान

चित्तशुद्ध तरी भगवत्कृपा । आनंदस्वरूपा आनंदचि ॥ १ ॥
आनंद प्रगटे संस्कार करोनी । श्रवण मननीं मन जडे ॥ २ ॥
जडे मन ध्यानीं श्रीरामरायाच्या । शिवमुनि त्याच्या रंगीं रंगे ॥ ३ ॥
रंगीं रंगे सर्वभाव भक्तियोगें । मनाचिया जोगें मिळे तरी ॥ ४ ॥
मिळे जरी मन श्रीरामचरणीं । सेवक कल्याणीं कल्याणचि ॥ ५ ॥

## ६०. श्रवणादि साधनानें आत्मानंद

नित्य सत्य शुद्ध श्रवण घडतां । मनन तत्त्वतां सहजचि ॥ १ ॥
सहज घडतें श्रीरामाचें ध्यान । सगुण निर्गुण एकरूप ॥ २ ॥
एकरूप मन राम-नामीं लीन । विसरूनी घन तनु सर्व ॥ ३ ॥
तनु सर्व असे भानमात्र नसे । आनंद गवसे रामरूपें ॥ ४ ॥
रामरूपें पूर्ण सेवक कल्याण । रामावीण आन कांहीं नाहीं ॥ ५ ॥

# पाकळी ५. ईश्वराचें स्वरूप (अभंग ६१ ते १०२)

## ६१. मूर्खस्य प्रतिमा देवः ।

प्रतिमाचि देव हा ज्याचा निश्चय । तो न करी सोय सर्वत्रासी ॥ १ ॥
सर्वत्र श्रीराम अंतर्बाह्य पूर्ण । संवळीत पूर्ण काय आहे ॥ २ ॥
आहे काय देवाविण अणुरेणू । जनीं जनार्दनू सेवकाचा ॥ ३ ॥

## ६२. मूर्ति नाशिवंत

धातु पाषाणाचा देव । नवसीती सर्व जीव ॥ १ ॥
पुत्र देई गा मजसी । विनविती पाषाणासी ॥ २ ॥
पति कासयासी व्हावा । देव पुत्र देतो जीवा ॥ ३ ॥
देव गोटा भाव खोटा । सेवकाचा राम मोठा ॥ ४ ॥

## ६३. पाषाणाचा देव खोटा

पाषाणाचा देव मातिचाचि भक्त । खरेपण व्यक्त नाहीं देवा ॥ १ ॥
देवा नाहीं ठाव भक्त अभाविक । देव भक्त देख निलाजिरे ॥ २ ॥
निलाजिरे सारे ऐसे देव भक्त । सेवकासी व्यक्त सर्व राम ॥ ३ ॥

## ६४. प्रतिमा हा देव नव्हे

पूजुनियां देव संपुष्टीं ठेविला । सर्वत्र भरला कळेनाचि ॥ १ ॥
कळेना प्रतिमा देव कैसा होय । भाव तरी काय पूर्ण आहे ॥ २ ॥
आहे पूर्ण देव प्रतीमा म्हणती । परि तो नेणती सर्वाठायीं ॥ ३ ॥
सर्वाठायीं राम जनीं जनार्दन । सेवक कल्याण पूर्णपणें ॥ ४ ॥

## ६५. ब्रह्मस्वरूप द्वंद्वातीत

द्वैताद्वैतातीत लक्ष्यालक्ष्यातीत । वेदशास्त्रातीत मत्स्वरूप ॥ १ ॥
परापरातीत ज्ञानाज्ञानातीत । कर्माकर्मातीत निरंतर ॥ २ ॥

वेद्यावेद्यातीत भेदाभेदातीत । शुद्धाशुद्धातीत मत्स्वरूप ॥ ३ ॥
सत्यासत्यातीत नामरूपातीत । कार्याकार्यातीत स्वयसिद्ध ॥४॥
' माया-ब्रह्म ' शब्दातीत सर्वातीत । एकपणातीत कैवल्यचि ॥५॥
सेव्यसेवातीत सेवक कल्याण । राम ब्रह्म पूर्ण मत्स्वरूप ॥ ६ ॥

## ६६. एकमेवाद्वितीयम् ।

अधिष्ठान सर्व मीचि परमात्मा । नेणोनियां आत्मा द्वैतभान ॥ १ ॥
द्वैतभान जें जें तें तें सर्व माया । वध्या पुत्र वाया काल्पनिक ॥ २ ॥
काल्पनिक काया छाया माया वायां । विसरे आत्मया स्वयज्योती ॥३॥
स्वयज्योती आत्मसूर्याचे प्रकाशें । द्वैत माया कैसें तम असे ॥ ४ ॥
असेनाचि तम आत्मप्राप्ति होतां । सद्गुरु तत्त्वतां कृपायोगें ॥ ५ ॥
कृपायोगें गुरु सेवक कल्याण । सद्गुरुचरण सेवा भावें ॥ ६ ॥

## ६७. द्वद्वातीत ब्रह्म

गुण नाहीं दोष इष्ट ना अनिष्ट । गुप्त ना प्रगट राम ब्रह्म ॥ १ ॥
सगुण निर्गुण द्वैत ना अद्वैत । भिन्नाभिन्न हेत कांहीं नाहीं ॥ २ ॥
स्वार्थ परमार्थ भाव ना अभाव । पाठ पोट वाव नाहीं नाहीं ॥ ३ ॥
सत्य ज्ञानानंत शब्दातीत ब्रह्म । स्वसवेद्य धाम स्वात्ममात्र ॥ ४ ॥
स्वय स्वेन स्वस्मिन् ज्ञात स्वात्मरूप । कल्याण अमूप सेवकाचें ॥ ५ ॥

## ६८. इंद्रियातीत ' मी '

चक्षूसी मज दृष्टि कोठूनियां । श्रवण कराया कर्ण नाहीं ॥ १ ॥
गंध जाणावया नासिकाचें घ्राण । नाहीं नाहीं जाण स्वरूपासी ॥ २ ॥
रसना नसेचि कटु गोड चव । वोलासी तो वाव मुळीं नाहीं ॥ ३ ॥
त्वचाभावें उष्ण शीत स्पर्श नाहीं । मृदु कठीणहि गेलें त्या ॥ ४ ॥
देणें घेणें यासी हस्त नाहीं बापा । जाणें येणें खेपा पाय नाहीं ॥ ५ ॥
इंद्रिय मेळावा नव्हे मी हो खास । सेवक सत्यास लक्षीतसे ॥ ६ ॥

## ६९. सर्वातीत परिपूर्ण ब्रह्म

परब्रह्म पर परिपूर्ण पाहे । सर्वातीत आहे जेथें तेथें ॥ १ ॥
इंद्रियांच्या पर अर्थांच्या तें पर । मनाच्याही पर बुद्धिपर ॥ २ ॥
बुद्धिपर आत्मा तयापर महा । अव्यक्त त्या पहा पर असे ॥ ३ ॥
त्यापर पुरुष नाहीं पर तया । असंग अद्वया निरंजना ॥ ४ ॥
सेवक कल्याण म्हणे पूर्ण लक्षा । उतरेल नक्षा मायामोह ॥ ५ ॥

## ७०. नेति नेति ।

सांपडेसा नोहे अंतरात्मा पाहे । विवरोनि राहे शांत बापा ॥ १ ॥
नाहीं गवसत प्रवचनें कांहीं । पहातां ग्रंथही कोटी बहु ॥ २ ॥
मन वाचा जेथें पांगुळत आहे । तया कोण पाहे निरंजना ॥ ३ ॥
म्हणताती श्रुति पहा नेति नेति । तेथें काय मति चालतसे ॥ ४ ॥
नाम-रूप-दृश्य-भासातीत पाहे । परब्रह्म आहे निर्विकार ॥ ५ ॥
सेवक-कल्याण परिपूर्ण स्वतां । सांपडे तत्त्वतां गुरुरूपें ॥ ६ ॥

## ७१. माया-ब्रह्म-विचार

नाहीं रूप रामा कोण वरीलचि । नाहीं की गुणची पक्रमान ॥ १ ॥
पक्रमान नांव घेई सीताबाला । लाजली अबला रामीं लीन ॥ २ ॥
लीन रामीं माया राम निराकार । लग्नाचा विचार निःशब्दचि ॥ ३ ॥
निःशब्दचि ब्रह्म राम स्वयसिद्ध । नित्य शुद्ध बुद्ध विमुक्तचि ॥ ४ ॥
विमुक्तचि राम-सेवक कल्याण । वधूवर जाण रामरूप ॥ ५ ॥

## ७२. श्रीरामाचें निर्गुण स्वरूप

सद्गुरु श्रीराम सुखाचें हें धाम । मनासी विराम आत्माराम ॥ १ ॥
आत्मारामीं काम संकल्प विकल्प । चांचल्य तें अल्प कांहीं नाहीं ॥ २ ॥
कांहीं नाहीं शून्य आहे पण गेलें । गेले शब्द ठेले उभें द्वैत ॥ ३ ॥

द्वैत ना अद्वैत शून्य ना अशून्य । अनुभव अन्य, वाचा नाहीं ॥ ४ ॥
नाहीं वाचा मौन स्वयंसिद्ध पूर्ण । सेवक कल्याण एकीएक ॥ ५ ॥

## ७३. सगुण निर्गुण एकच

देव कोण कैसा सगुण निर्गुण । नाम रूप खूण सांगा मज ॥ १ ॥
सांगा मज देव मूर्त वा अमूर्त । ब्रह्म मूर्तामूर्त श्रुति वदे ॥ २ ॥
वेद श्रुति ब्रह्म नामरूपातीत । सर्व ब्रह्म हेत नामरूप ॥ ३ ॥
नामरूप देव ब्रह्म सर्व कांहीं । मुळीं भेद नाहीं मिथ्या वाद ॥ ४ ॥
मिथ्या वाद नको सगुण निर्गुण । देव ब्रह्म पूर्ण एकीएक ॥ ५ ॥
एकीएक देव नानाकार धरी । भक्तांतें उद्धरी कृपामात्रें ॥ ६ ॥
कृपा राघवाची सेवक कल्याण । सगुण निर्गुण राम ब्रह्म ॥ ७ ॥

## ७४. सगुण निर्गुण एकच

सत्य ज्ञानानंत ब्रह्म । विटेवरी उभें ब्रह्म ॥ १ ॥
रूप वर्ण नाहीं ज्यास । तोचि पांडुरंग खास ॥ २ ॥
सर्वांभूतीं वासुदेव । व्यापक तो पंढरीराव ॥ ३ ॥
देव सगुण-निर्गुण । गुरुरूपें भाव पूर्ण ॥ ४ ॥
पूर्ण भाव नामीं होता । तरे सेवक तत्त्वतां ॥ ५ ॥

## ७५. भक्त प्रेमास्तव अवतार

जाणोनियां माझा मनोभाव पूर्ण । श्रीराम सगुण रूप धरी ॥ १ ॥
रूप धरी शांत सांवळें साजिरें । नित्य मनोहरें पूर्णत्वेंसी ॥ २ ॥
पूर्ण राम ब्रह्म सद्गुरु होऊनी । राम नाम मनीं ठसवी तो ॥ ३ ॥
ठसवी श्रीराम स्वनाम संपूर्ण । सेवक कल्याण साधविलें ॥ ४ ॥

मंदहास मुख आनंद भरित । वरदान देत अनाथासी ॥ ३ ॥
अनाथा आधार श्रीराम संपूर्ण । सेवक कल्याण राम ब्रह्म ॥ ४ ॥

## ७७. भगवंताचें षड्गुणैश्वर्य

ज्ञानैश्वर्य बल शक्तिवीर्य तेज । संपन्न सहज भगवान ॥ १ ॥
भगवान नित्य शुद्ध बुद्ध मुक्त । स्वभाव संयुक्त मायातीत ॥ २ ॥
मायातीत परि देह धरितसे । कृपा करीतसे भक्तवरां ॥ ३ ॥
भक्तांचा उद्धार हेतु अवतार । कल्याण साचार सेवकाचें ॥ ४ ॥

## ७८. दत्त, राम, ब्रह्म सर्व एकच

सत्य ज्ञानानंत ब्रह्मचि साचार । नित्य निराकार एकरूप ॥ १ ॥
एकरूप दत्त साच अत्रिसुत । पूर्ण अवधूत मायातीत ॥ २ ॥
मायातीत ध्रुव कैवल्य कल्याण । सेवक निर्वाण दत्त राम ॥ ३ ॥

## ७९. रामाचें स्वरूप

श्रीराम व्यापक सगुण निर्गुण ॥ गुणागुण पूर्ण पूर्णानंद ॥ १ ॥
पूर्णानंद देव त्रिमूर्ति श्रीराम । अंतर्बाह्य धाम राम एक ॥ २ ॥
एक राम सर्व चौऱ्यासी आधार । अवस्था साचार उन्मनी हो ॥ ३ ॥
उन्मनी शब्दाचा नसोनि आकार । प्रकृति विकार नाहीं नाहीं ॥ ४ ॥
नाहीं नाहीं गेलें आहे राम ठेलें । सेवका भेटले जनीं वनीं ॥ ५ ॥

## ८०. रामाचें स्वरूप

सत्य ज्ञानानंत वेदाचें जें सार । भवभयपार परं ब्रह्म ॥ १ ॥
परं ब्रह्म राम सर्वत्र व्यापक । परिपूर्ण एक स्वात्मानंद ॥ २ ॥
स्वात्मानंद साक्षात् अपरोक्ष सत्य । सच्चिद्घन नित्य स्वयंमात्र ॥३॥
स्वयंमात्रवस्तु रामभद्र खास । सदा सेवकास कल्याणचि ॥ ४ ॥

## ८१. रामच सत्य

कर्म भक्ति ज्ञान श्रीराम प्रकारीं । योग याग कैसें रामाविण ॥ १ ॥
रामाविण नाही सत्य मिथ्या माया । ब्रह्म ध्यान वाया होय काय ॥२॥
काय होय मिथ्या राम आदि अंतीं । सेवक विश्रांति राम ब्रह्म ॥ ३ ॥

## ८२. राम सुखाचा सागर

सीताराम सर्व सुखाचा आगर । श्रीराम आधार सर्व सुखा ॥ १ ॥
सर्व सुख राम – समागमें होय । दु खवार्ता काय सीतारामा ॥ २ ॥
सीताराम पायीं सर्वसुख लाभ । सेवका सुलभ राम ब्रह्म ॥ ३ ॥

## ८३. राम कला

राम कर्ता करविता । प्राणियासी काय सत्ता ॥ १ ॥
राम भोक्ता भोगविता । अचेतनीं चैतन्यता ॥ २ ॥
राम अहं – रावणासी । मारी, जोडी सौख्यराशी ॥ ३ ॥
राम नाम दो अक्षर । भवसिंधू करी पार ॥ ४ ॥

सर्व कांहीं जाणे सद्गुरुकृपेनें । श्रवणमननें समाधान ॥ ८ ॥
समाधान सोपें होय निदिध्यासें । साक्षात्कार ऐसें नाम त्यासी ॥ ९ ॥
त्यासी नाम कैचें अरूप – अगुणा । धरितां सगुणा सोय लाभे ॥ १० ॥
लाभे सोय म्हणे करितां विवेक । कल्याण – सेवक अनुभवें ॥ ११ ॥

## ८५. रामकृपेनें माया नाश

रामकृपा – सूर्योदयें । द्वैत – माया – तम जाये ॥ १ ॥
हा सच्चिदानंदघन । हृदीं मम राम पूर्ण ॥ २ ॥
नित्य शुद्ध बुद्ध मुक्त । स्वात्मस्वभाव संयुक्त ॥ ३ ॥
ब्रह्म कल्याण सेवक । नामरूपातीत एक ॥ ४ ॥

## ८६. कर्ता ईश्वर; देह प्रारब्धाधीन

प्रारब्ध देहाचें जैसें तैसें होत । जाणें येणे व्रत कांहीं नाहीं ॥ १ ॥
कोठें कधीं देह येणें जाणें करी । कोण सांगे तरी निश्चयानें ॥ २ ॥
तैसें होत नाहीं अनुभव सर्वा । उगीच कां गर्वा वाहताती ॥ ३ ॥
ईश्वरेच्छा जैसी तैसा घडवितो । कर्ता मी करितों व्यर्थ दंभ ॥ ४ ॥
कर्ता करविता राम परिपूर्ण । सेवक कल्याण रामपदीं ॥ ५ ॥

## ८७. तज्जलात् ।

सृष्टिपूर्वी नाहीं स्थूल सूक्ष्म कांहीं । आत्माराम पाही मीचि एक ॥ १ ॥
एक मी स्थितींत लयानंतर मी । परमानंद मी परिपूर्ण ॥ २ ॥
परिपूर्ण ब्रह्म शुद्ध निर्विकल्प । चिन्मात्र स्वरूप सर्वातीत ॥ ३ ॥
सर्वातीत नित्य सेवक कल्याण । आदिनारायण नाम नाहीं ॥ ४ ॥

## ८८. देव जवळीं अंतरीं ।

कासया फिरावें काशी रामेश्वर । अयोध्या केदार गया पुरी ॥ १ ॥
जवळीं अंतरीं राम असोनियां । नोळखती तया जाती दूरी ॥ २ ॥

## ८१. रामच सत्य

कर्म भक्ति ज्ञान श्रीराम प्रकाशें । योग याग कैसें रामाविण ॥ १ ॥
रामाविण नाहीं सत्य मिथ्या माया । ब्रह्म ध्यान वाया होय काय ॥२॥
काय होय मिथ्या राम आदि अतीं । सेवक विश्रांति राम ब्रह्म ॥ ३ ॥

## ८२. राम सुखाचा सागर

सीताराम सर्व सुखाचा सागर । श्रीराम आधार सर्व सुखा ॥ १ ॥
सर्व सुख राम–समागमें होय । दु:खवार्ता काय सीतारामा ॥ २ ॥
सीताराम पायीं सर्वसुख लाभ । सेवका सुलभ राम ब्रह्म ॥ ३ ॥

## ८३. राम कला

राम कर्ता करविता । प्राणियासी काय सत्ता ॥ १ ॥
राम भोक्ता भोगविता । अचेतनीं चैतन्यता ॥ २ ॥
राम अहं – रावणासी । मारी, जोडी सौख्यराशी ॥ ३ ॥
राम नाम दो अक्षर । भवसिंधू करी पार ॥ ४ ॥
राम शिव वाचे पूर्ण । वरी सेवक कल्याण ॥ ५ ॥

## ८४. रामावांचून सोडविता नाहीं

एकलेंचि यावें एकलेंचि जावें । मध्येंचि भुलावें मायाजाळीं ॥ १ ॥
मायाजाळीं तुज कोण सोडविता । माता पिता कांता कामा नये ॥२॥
नये कामा पुत्र मित्र आणि बंधू । तोडी हा संबंधू निश्चयेंसी ॥ ३ ॥
निश्चयेंसी राम मनोभावें ध्यातां । तुटेल तत्त्वता मायापाश ॥ ४ ॥
मायापाश नसे स्वरुप जाणता । रज्जूसी नेणतां सर्प भासे ॥ ५ ॥
भासे सर्प परि अधिष्ठानीं नसे । निर्विकार असे आदि अतीं ॥ ६ ॥
आदि अतीं ब्रह्म मध्यें उगा भ्रम । ज्ञाता जाणे वर्म सर्व नाहीं ॥ ७ ॥

सर्व कांहीं जाणे सद्गुरुकृपेनें । श्रवणमननें समाधान ॥ ८ ॥
समाधान सोपें होय निदिध्यासें । साक्षात्कार ऐसे नाम त्यासी ॥ ९ ॥
त्यासी नाम कैचें अरूप – अगुणा । धरितां सगुणा सोय लाभे ॥ १० ॥
लाभे सोय म्हणे करितां विवेक । कल्याण – सेवक अनुभवें ॥ ११ ॥

## ८५. रामकृपेनें माया नाश

रामकृपा – सूर्योदयें । द्वैत – माया – तम जाये ॥ १ ॥
हा सच्चिदानंदघन । हृदीं मम राम पूर्ण ॥ २ ॥
नित्य शुद्ध बुद्ध मुक्त । स्वात्मस्वभाव संयुक्त ॥ ३ ॥
ब्रह्म कल्याण सेवक । नामरूपातीत एक ॥ ४ ॥

## ८६. कर्ता ईश्वर; देह प्रारब्धाधीन

प्रारब्ध देहाचें जैसें तैसें होत । जाणें येणें व्रत कांहीं नाहीं ॥ १ ॥
कोठें कधीं देह येणें जाणें करी । कोण सांगे तरी निश्चयानें ॥ २ ॥
तैसें होत नाहीं अनुभव सर्वा । उगीच कां गर्वा वाहताती ॥ ३ ॥
ईश्वरेच्छा जैसी तैसा घडवितो । कर्ता मी करितों व्यर्थ दंभ ॥ ४ ॥
कर्ता करविता राम परिपूर्ण । सेवक कल्याण रामपदीं ॥ ५ ॥

## ८७. तज्जलान् ।

सृष्टिपूर्वी नाहीं स्थूल सूक्ष्म कांहीं । आत्माराम पाही मीचि एक ॥ १ ॥
एक मी स्थितींत लयानंतर मी । परमानंद मी परिपूर्ण ॥ २ ॥
परिपूर्ण ब्रह्म शुद्ध निर्विकल्प । चिन्मात्र स्वरूप सर्वातीत ॥ ३ ॥
सर्वातीत नित्य सेवक कल्याण । आदिनारायण नाम नाहीं ॥ ४ ॥

## ८८. देव जवळीं अंतरीं ।

कासया फिरावें काशी रामेश्वर । अयोध्या केदार गया पुरी ॥ १ ॥
जवळीं अंतरीं राम असोनियां । नोळखती तया जाती दूरी ॥ २ ॥

जपें तीर्थे क्षेत्रें तपें योग-यागें । पूजोनियां लिंगें लक्ष कोटी ॥ ३ ॥
सबाह्याभ्यंतरीं अणुरेणू पूर्ण । श्रीराम संपूर्ण असोनिया ॥ ४ ॥
सैरा वेरा हिंडे भ्रांत सारे जन । तया नारायण भेटे कैसा ॥ ५ ॥
मागें पुढें राम सेवका विराम । पाही ब्रह्म राम सर्व काळ ॥ ६ ॥

## ८९. राम वनांत नाही, हृदयांत आहे

वनां जाऊनियां करणें हो काय । जेथें तेथें पाय श्रीरामाचे ॥ १ ॥
श्रीरामाचे पाय हृदयीं स्मराहो । चिंतन करा हो आत्मयाचें ॥ २ ॥
आत्मयाचें सूख अनायासें लाभ । सर्व माया दंभ रामीं लीन ॥ ३ ॥
लीन रामीं मन सेवक कल्याण । लुटा स्वात्मधन जनीं वनीं ॥ ४ ॥

## ९०. आत्मारामच देवाचा देव

ब्रह्मादि त्रिदेव वंदिती जयासी । ऋषि मुनी त्यासी ध्यात असे ॥१॥
ध्यात असे सच्चित्सुखघन राम । विमल विराम सर्वत्रासी ॥ २ ॥
सर्व त्रास चुके देव अगोचर । देखतां अपार पूर्णानंद ॥ ३ ॥
पूर्णानंद सदा साक्षादनुभव । अपरोक्ष देव कल्याणचि ॥ ४ ॥
कल्याण कैवल्य एक आत्माराम । सेवक आराम अंतर्बाह्य ॥ ५ ॥

## ९१. सर्वांभूतीं वासुदेव

ब्रह्मस्थिती जाण सुबोध सुगम । सच्चित्सुख धाम सर्वांभूतीं ॥ १ ॥
सर्वांभूतीं खास वासुदेव वास । पूर्ण आत्मयास भेद नाहीं ॥ २ ॥
भेद नाहीं एक भक्त हाचि देव । माया-ब्रह्मभाव स्फूर्तरूप ॥ ३ ॥
स्फूर्तरूप शब्द ब्रह्म राम कृष्ण । सेवक कल्याण सर्व ब्रह्म ॥ ४ ॥

## ९२. जनीं जनार्दन; पण दिसत नाहीं

चालते बोलते जनीं जनार्दन । प्रत्यक्ष पाहन व्यक्तरूप ॥ १ ॥
व्यक्तरूप राम सर्वत्र भरला । दिसेना कोणाला अहंतेनें ॥ २ ॥
अहंता ममता कर्मविधि योग । हाचि भवरोग मायापाश ॥ ३ ॥

मायापाश सांडी मांडी उद्धळेव । न लगे, जाण देव सर्वांतरीं ॥ ४ ॥
सर्वांतरीं सर्व सिद्ध सत्य राम । सेवक विराम आत्माराम ॥ ५ ॥

## ९३. राम सबाह्य अंतरीं

राम सर्वां भूतांतरीं । उच्च नीच कैसी परी ॥ १ ॥
राम ब्रह्मा मुंगीवरी । व्यापक हा चराचरीं ॥ २ ॥
राम सर्वांचे शरीरीं । नांदे इंद्रिय-व्यापारीं ॥ ३ ॥
राम अणुरेणूं भरी । जैसी सागरीं लहरी ॥ ४ ॥
राम सबाह्याभ्यंतरीं । सेवकातें मुक्त करी ॥ ५ ॥

## ९४. स्थिरचर व्यापुन उरला

अंतर्बाह्य पूर्ण रामचि एकला । सर्वत्र सजला नामरूपें ॥ १ ॥
नामरूपें शोभे हाचि नामातीत । अव्यक्त अच्युत परिपूर्ण ॥ २ ॥
परिपूर्ण जग नग अणुरेणू । भरोनी आपणू सर्वातीत ॥ ३ ॥
सर्वातीत ब्रह्म राम कृपाघन । सेवक कल्याण स्वयंसिद्ध ॥ ४ ॥

## ९५. आत्मा परिपूर्ण; मायाभेद नाहीं

आत्मा परिपूर्ण सर्वत्र एकला । येथें मी वेगळा कोण असे ॥ १ ॥
कोण असे नित्य शुद्ध बुद्ध मुक्त । स्वसंवेद्य-युक्त अनादि मी ॥ २ ॥
अनादि अनंत सत्य ज्ञानानंद । नाहीं माया भेद कर्म धर्म ॥ ३ ॥
कर्म धर्म वर्म राम एकी एक । ब्रह्मासि सेवक रामरूपा ॥ ४ ॥

## ९६. रिता ठाव नाहीं

आतां कोठें जावें रामावांचोनियां । द्वैत-तम-माया नाहीं कांहीं ॥ १ ॥
नाहीं देश काळ नामरूप भेद । सच्चिद्घनानंद स्वयंभान ॥ २ ॥
स्वयंब्रह्म वस्तु राम रूपावंत । सेवका अनंत कल्याणचि ॥ ३ ॥

## ९७. राम मन-बुद्धि-अतीत

मनाचें तें नये थोरपण कामा । वाचातीत धामा निरंजना ॥ १ ॥
पांगुळते बुद्धि नये कामा सिद्धि । जेथें भेद बुद्धि अणु नाहीं ॥ २ ॥
मन बुद्धी अंत, सनातन संत । अद्वेताचा प्रांत सेवकासी ॥ ३ ॥

## ९८. सर्वातीत राम

कांहीं नाहीं एक पाहीं । रामपदीं धरी सोयी ॥ १ ॥
भूमी आप तेज नाहीं । वायु आकाशहि नाहीं ॥ २ ॥
मन बुद्धि चित्त नाहीं । इंद्रियांचा मेळ नाहीं ॥ ३ ॥
अहं सोहं मावळलीं । सेवकासी भेटी झाली ॥ ४ ॥

## ९९. सर्व वेदांचें सार म्हणजे रामाचें श्रेष्ठत्व

वेदांचें जें गुह्य शास्त्राचें जें सार । पुराणांचें थार राम एक ॥ १ ॥
स्मृति मुनि ऋषी कवि जपी तपी । राम बहुरूपीं गर्जताती ॥ २ ॥
राम हा तारक राम परं ब्रह्म । सोडा सर्व भ्रम मायिकाचा ॥ ३ ॥
राम परंतप राम परंतत्त्व । राम सर्व देव नाना देहीं ॥ ४ ॥
सगुण निर्गुण पूर्ण रामराणा । देतो पूर्णपणा सेवकासी ॥ ५ ॥

## १००. शिवशक्ति अभेद

त्रिपुरसुंदरी आनंदलहरी । घेई कडेवरी बाळा माता ॥ १ ॥
माता सर्वभूतां प्रसवसी लीलें । सर्वत्र भरलें स्वात्मतेज ॥ २ ॥
तेज शक्तिमाया अभिन्न तूं ब्रह्म । कोण तुजसम व्यापकचि ॥ ३ ॥
व्यापकचि सर्व भरोनी उरली । वर्णन माऊली कोण करी ॥ ४ ॥
करी कोण शब्द सर्व तुझी सत्ता । ओंकार तत्त्वतां रूप तुझें ॥ ५ ॥
तुझे रूपावीण व्यक्त ब्रह्म नोहे । समाधान पाहे स्वस्वरूपीं ॥ ६ ॥
स्वस्वरूपीं तूंच ब्रह्म मात्र खास । आई-सेवकास कल्याणचि ॥ ७ ॥

## १०१. शक्तीच्या कृपेनें मायातरण

जगदेश्वरी मा त्रिपुरसुंदरी । बाळा धरी करीं प्रेमें आई ॥ १ ॥
अन्नपूर्णा ग्रास ज्ञानान्नाचा देई । भवभय नेई काळी दूर ॥ २ ॥
सरस्वती बोधी ब्रह्मविद्या साच । ताप पाप जाच माता वारी ॥ ३ ॥
द्वितीयता भान दरिद्रता, लक्ष्मी । नाश करी नामी स्वात्मदानें ॥ ४ ॥
पार्वती भवानी अंबा गौरी सीता । माया तूं जगता उत्पादिसी ॥ ५ ॥
स्थितिलयकर्त्री सदभिन्न होसी । प्रेमें उद्धरीसी सेवकासी ॥ ६ ॥
कल्याण सेवका मायेपर केलें । ब्रह्मपदीं लीलें संस्थापीलें ॥ ७ ॥

## १०२. मोक्षदायी राम

त्रैलोक्य-श्रीमंत मोक्षश्रीदाता हा । सीताराम पहा परिपूर्ण ॥ १ ॥
परिपूर्ण राम स्वात्मदान करी । स्वानंदा माझारीं बुडवितो ॥ २ ॥
बुडवितो मी तूं अहंता ममता । पूर्ण आत्मसत्ता देत असे ॥ ३ ॥
देत असे नित्य शुद्ध मुक्त पद । सच्चिद्घनानंद सीताराम ॥ ४ ॥
सीताराम सत्य ज्ञानानंत पूर्ण । सेवक कल्याण साक्षाद्ब्रह्म ॥ ५ ॥

# पाकळी ६. भक्ताचीं लक्षणें (अभंग १०३ ते १४५)

## १०३. संतलक्षण

संत समबुद्धी भूतदया पूर्ण । शत्रु मित्र जन भेद नाहीं ॥ १ ॥
नाहीं भेद नर-नारी सान थोर । श्रीराम साचार पाहातसे ॥ २ ॥
पहातसे राम जनीं वनीं मनीं । मुनी ज्ञानी ध्यानीं राम एक ॥ ३ ॥
एक राम सदा सर्वात संपूर्ण । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ४ ॥

## १०४. संत लक्षण

संत मन बुद्धि काया वाचा शुद्ध । सत्य नित्य बुद्ध मुक्त ब्रह्म ॥१॥
ब्रह्म मुक्त संत असोनी प्रपूर्ण । सर्वत्र देखून रामरूप ॥ २ ॥

रामरूप सर्व भावें नमस्कारी । सर्वांतें उद्धरी बोध-मार्गें ॥ ३ ॥
बोध-मार्गें संत राम करी पूर्ण । सेवक कल्याण स्वात्मानंद ॥ ४ ॥

## १०५. वारकऱ्यांचीं लक्षणें

आम्ही विठ्ठलाचे भक्त । कळी काळा हाणूं लाथ ॥ १ ॥
वारकरी पंढरीचा । लेश नाहीं अहंतेचा ॥ २ ॥
पायां पडे एकमेकां । अंतरींचा राम देखा ॥ ३ ॥
चमत्कार केशवाचा । सर्व कांहीं पाही साचा ॥ ४ ॥
गर्व जाईल विलया । लागे संताचिया पायां ॥ ५ ॥
कल्याणाचा हा सेवक । अहंकारा पडे धाक ॥ ६ ॥

## १०६. संतलक्षण

सर्वगत सर्व ब्रह्म सदा सम । लिगाड विषम आन नाहीं ॥ १ ॥
नाहीं आन वासुदेव सर्व पूर्ण । महात्मा संपूर्ण साधूसंत ॥ २ ॥
संत साधु शुद्ध महात्म्य कळेना । निजानंदीं जाणा वर्तताती ॥ ३ ॥
वर्तताती बाल उन्मत्त पिशाच्च । स्थिति ब्रह्म साच कळेनाचि ॥ ४ ॥
कळेना सज्जन राम परिपूर्ण । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ५ ॥

## १०७. भक्ताची प्रवृत्ति

भावें गावें नाम आवडतें मज । अन्य व्यर्थ काज नावडे हो ॥ १ ॥
श्रवण कीर्तन भजन अर्चन । साष्टांग वंदन संत देवा ॥ २ ॥
सदन त्यजावें तपोवना जावें । सेवका स्वभावें हरि वेड ॥ ३ ॥

## १०८. भक्ताची वृत्ति

भाव मनोवृत्ति भक्तिप्रेमनिष्ठा । आत्मज्ञाननिष्ठा ब्रह्मनिष्ठा ॥ १ ॥
ब्रह्मनिष्ठ ब्रह्म वस्तु आत्माराम । भाव भक्तिप्रेम कर्म धर्म ॥ २ ॥
धर्म कर्म वर्म श्रीराम भावना । सदा जनां-वनां माझीं एक ॥ ३ ॥
एक माझी मज स्वरूपसमृद्धि । नाहीं अन्य बुद्धि रामावीण ॥ ४ ।
रामावीण नाहीं अणुरेणू पूर्ण । सेवक कल्याण रामभाव ॥ ५ ॥

## १०९. नम्रता व अमत्सर हे भक्ताचे गुण

थोर कधीं करीनाच । प्राणीमात्र हेवा साच ॥ १ ॥
मनोभावें भजे देवा । लहानपण देगा देवा ॥ २ ॥
अणुरेणूं राम पूर्ण । सदा सेवक कल्याण ॥ ३ ॥

## ११०. संताचे ठिकाणीं वैरभाव अशक्य

अंधार आदित्या आहे कां ठावूक । अग्निसी कां देश शीत ठावें ॥१॥
गूळ न जाणेचि कडू आम्ल चव । संतां वैरभाव नाहीं ठावा ॥ २ ॥
जन जनार्दन श्रीराम समर्थ । कल्याण यथार्थ सेवकाचें ॥ ३ ॥

## १११. मानापमानयोस्तुल्यः ।

ज्ञान परीपूर्ण देहोपाधी तरी । देह कधीं तरी ब्रह्म नोहे ॥ १ ॥
ब्रह्म नोहे देह दुर्जन भेटती । फजीती मांडिती उघडीच ॥ २ ॥
उघडी न डोळे जन अज्ञ जाण । सज्जना दूषण लावितातो ॥ ३ ॥
लावताती दोष प्रयत्नें करून । सत्याग्रह जाण म्हणोनियां ॥ ४ ॥
म्हणोनियां सर्व साहतो सेवक । नारायण देख जनीं वनीं ॥ ५ ॥

## ११२. भक्तानें लोकलाज सोडिली पाहिजे

स्वार्थ परमार्थ एकरूप जाण । रामनामीं मन पूर्ण ज्याचें ॥ १ ॥
पूर्ण ज्याचें मन प्रपंचीं असत । सहज घडत परमार्थ ॥ २ ॥
परमार्थ घडे परी लोक अडे । लौकीक बिघडे अपवाद ॥ ३ ॥
अपवाद देती विपरीत जन । नाहक दूषण लाविताती ॥ ४ ॥
लावताती दोष निंदिती सज्जनां । लौकिकचि मनामाजीं वसे ॥ ५ ॥
वसे मनामाजीं भीड चाड जनां । लौकिक कल्याणा आड असे ॥ ६ ॥
आड असे जन मन नि लोकीक । सेवका मायिक चाड नसे ॥ ७ ॥

## ११३. समता

सर्वाभुतीं वासुदेव । नीच उच्च नाहीं जीव ॥ १ ॥
सान थोर सर्व एक । पंचभूतें पूर्ण देख ॥ २ ॥

नीच उच्च भाव सोडा । सदा पांडुरंगा जोडा ॥ ३ ॥
नीच उच्च सर्व राम । सेवकाचें सुखधाम ॥ ४ ॥

## ११४. परोपकारी भक्त हाच खरा सेवक

व्यक्ति मनोभाव घडण घडावी । कुशलता व्हावी सेवाभावीं ॥ १ ॥
सेवाभावें सर्व समाज आपुला । भारुन टाकला एकाएकीं ॥ २ ॥
एकाएकीं कळो नये हो पालट । प्रेमळ उत्कट सुधारक ॥ ३ ॥
सुधारक खरे थोर कार्यकर्ते । स्वात्मशुद्ध मतें आचरणें ॥ ४ ॥
आचरण शुद्ध जन जनार्दन । सेवक कल्याण राम ब्रह्म ॥ ५ ॥

## ११५. हृदयीं राम भरणें हाच सत्याग्रह

सत्याचा आग्रह सत्याग्रह जाण । सत्य ज्ञान घन राम मनीं ॥ १ ॥
मनीं रामरूप हृदय मोकळें । सुशांत सोवळें निर्विकार ॥ २ ॥
निर्विकार वृत्ती अहंकारहीन । क्षमाशील जाण संत सदा ॥ ३ ॥
सदा संत नम्र हरिभाव पूर्ण । जन जनार्दन सेवकाचा ॥ ४ ॥

## ११६. सर्वत्र व सर्वात राम पाहणें हाच सत्याग्रह

निर्भय निर्वैर सहज वर्तन । सत्याग्रह जाण म्हणोनियां ॥ १ ॥
म्हणोनियां सर्व व्यापक स्वरूप । संकल्पाचें पाप नाहीं मनीं ॥ २ ॥
नाहीं मनीं आन श्रीरामावांचून । सर्व जन वन रामरूप ॥ ३ ॥
रामरूप नर-नारी-सान-थोर । उघडा विचार सर्व कांहीं ॥ ४ ॥
सर्व कांहीं राम स्वयं ज्योती पूर्ण । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ५ ॥

## ११७. संतांची पुण्यमय हिंसा

घातकी असोनी म्हणवीती संत । पातकाचा हेत स्पर्शेनाची ॥ १ ॥
आत्मबोधशस्त्रें कामक्रोध मारी । एकांतें संहारी महामाया ॥ २ ॥
महामाया सर्वा फसवी तयातें । तोडी सत्य नातें स्वात्मतेजें ॥ ३ ॥
सच्चित्सुखधाम राम परीपूर्ण । सेवक कल्याण हिंसेचेनी ॥ ४ ॥

## ११८. भूतांची दया हें भांडवल संतां

राम भावनेनें जन सेवा करी । रामकृष्ण हरि वाचे सदा ॥ १ ॥
सदा वाचे जन-जीवन-घडण । नको चालवण सहसाही ॥ २ ॥
सहसा सहज सर्व प्राणी लोकां । दुःख देऊं नका काडीमात्र ॥३॥
काडीमात्र हिंसा नये कदा कामा । अहिंसक सदा हरिसेवा ॥ ४ ॥
हरिसेवा हरी पातकांच्या राशी । सेवक सर्वांशीं एकरूप ॥ ५ ॥

## ११९. संतच खरे सत्याग्रही

आत्मविश्वासचि अंतरीं सुंपूर्ण । नम्रता प्रपूर्ण सर्वां ठायीं ॥ १ ॥
सर्वां ठायीं रामदर्शनें कल्याण । सर्वत्रांचें मन हरीतसे ॥ २ ॥
हरीतसे हरि रामकृष्ण जाण । सत्याग्रह पूर्ण म्हणोनियां ॥ ३ ॥
म्हणोनियां ज्ञान-देव-एकनाथ । सेवक समर्थ तुकाराम ॥ ४ ॥

## १२०. भक्तांचीं लक्षणें

जैसें वाचे बोले तैसेंचि चालणें । श्रीराम देखणें सर्व जनीं ॥ १ ॥
जनीं सर्व सदा वासुदेव भावें । रामपदीं व्हावें लीन पूर्ण ॥ २ ॥
पूर्ण लीनपणें अंगीं जाणपण । नये अभिमान ज्ञानीपणा ॥ ३ ॥
ज्ञानीपणें वंदा किंवा निंदा कोणी । विषमता मनीं नाहीं कदा ॥४॥
कदा मनीं नसे द्वेष हेवा भाव । सेवक स्वभाव शांत सदा ॥५॥

## १२१. भक्ताची भावना

श्रीरामभावना स्वधर्म स्वभाव । भक्ति-प्रेमभाव मनोवृत्ति ॥ १ ॥
मनोवृत्ति सर्व अणुरेणूं राम । आराम स्वधाम पूर्णपणें ॥ २ ॥
पूर्णपणें जग नग प्राणीमात्र । श्रीराम सर्वत्र भरलासे ॥ ३ ॥
*भरलासे स्वात्माराम सांदोसांदीं । सच्चिद्‌घनानंदीं मन रमे ॥४॥*
रमे मन रामीं स्वरूपीं प्रपूर्ण । सेवक कल्याण राम सर्व ॥५॥

## १२२. पापु-पुण्यानें राम दुरावतो

पापें नरकासी पुण्यें स्वर्गा जातो । राम दुरावतो पापपुण्यें ॥ १ ॥
पापपुण्य नाशी रामनाम एक । भक्तिभाव देख पूर्णत्वेंसी ॥ २ ॥
पूर्णत्व श्रीराम नामें भक्तवर्या । ज्ञानदेव आर्या नाम मुखीं ॥ ३ ॥
मुखीं नाम चित्तीं श्रीहरि रामाचें । ध्यान सदा साचें एकरूप ॥ ४ ॥
एकरूप राम नाम ब्रह्म पूर्ण । सेवक कल्याण रामनामें ॥ ५ ॥

## १२३. शांति

एकनाथ जातां गोदेहुनी घरीं । म्लेंच्छ अंगावरीं थुंकीतसे ॥ १ ॥
थुंकीतसे पुन्हां स्नाना नाथ जाती । पूर्ण तयां शांती आत्माराम ॥२॥
आत्माराम नाथ शांतीचा पुतळा । चरणीं लोटला गर्वहीन ॥ ३ ॥
गर्वहीन होतां सेवका कल्याण । तनु मन धन राम सर्व ॥ ४ ॥

## १२४. एकनाथांची शांति

आंगीं लावी नाना दोष । तरी नये कदा रोष ॥ १ ॥
शांती ऐसी जया अंगीं । रंगे पूर्ण पांडुरंगीं ॥ २ ॥
एकनाथ शांत पूर्ण । सर्व साधुमाजीं जाण ॥ ३ ॥
शांतीसागर सेवका । भेटे पैठणीं अनेकां ॥ ४ ॥

## १२५. परम शांति

चोर धन लुटे जरी । दुःख नोहे मनीं तरी ॥ १ ॥
पुत्र कन्या शत्रु वधी । मोह पाझरेना कधीं ॥ २ ॥
कांता व्यभिचार करी । क्रोध नयेचि अंतरीं ॥ ३ ॥
काया गांजी नर नारी । शांती चळेनाची खरी ॥ ४ ॥
ऐसा एकनाथ शांत । संतामाजीं पूर्ण संत ॥ ५ ॥
सेवकासी भेटतसे । पैठणीं ते ठाण असे ॥ ६ ॥

## १२६. शांतियुक्त वैराग्य पाहिजे

हेंकाड पिसाट वैराग्य नुसतें । शांतीवीण न तें शोभतसे ॥ १ ॥
शोभतसे सत शांतीवीण कैसा । क्रोधाचा वळसा नुकलेचि ॥ २ ॥
नुकले वैराग्य बाह्य जरी पूर्ण । वेग कोप जाण अतरीं हो ॥ ३ ॥
अंतरीं सुशांत बाह्य शांत पूर्ण । तोचि सत जाण पूर्णपणें ॥ ४ ॥
पूर्णपणे राम जनीं वनीं पाहीं । राम लवलाही सेवक हो ॥ ५ ॥

## १२७. शांतीचें मूळ

वाढे शांती जों जों सत्य । तों तों वैराग्य हो नित्य ॥ १ ॥
ऐसा आहे अनुभव । सर्वांभूतीं वासुदेव ॥ २ ॥
विरक्ति नि शांती साच । एके ठायीं वसेनाच ॥ ३ ॥
विरक्तास राग फार । दुर्वासादि ऋषी नर ॥ ४ ॥
शांतीसागर सेवक । एकनाथ पूर्ण देख ॥ ५ ॥

## १२८. सेवक होऊन रामाचा आनंद लूट

येई लुटोनी आनंद । न च दु ख दैन्य खेद ॥ १ ॥
देई राम सुख पूर्ण । आनदाची खाण जाण ॥ २ ॥
सीताराम हा सर्वस्व । भेटे आनंद वर्चस्व ॥ ३ ॥
सीताराम सेवकाचा । सेवक सीतारामाचा ॥ ४ ॥

## १२९. अनासक्त भक्त रामरूपत्वानें सुखी

आसक्तीरहित सुखी नरवीर । कामना विचार रोगमुक्त ॥ १ ॥
रोगमुक्त भवशोक श्रम नाहीं । मनीं राम पाही बैसलासे ॥ २ ॥
बैसला सर्वत्र श्रीराम अंतरीं । आनदामाझारीं देव भक्त ॥ ३ ॥
देव भक्त एक आनदें डोलती । मिठी घालताती एकमेकां ॥ ४ ॥
एकमेकां एक स्वानद साम्राज्य । सेवका स्वराज्य कल्याणचि ॥ ५ ॥

## १३०. साधुलक्षणें

तोचि साधु खरा जाण । जया शुद्ध ब्रह्मज्ञान ॥ १ ॥
देहोपाधी जावत्काल । धरी सगुणा निश्चल ॥ २ ॥
सोडोनियां आशापाश । सदासर्वदा उदास ॥ ३ ॥
जोपयेत् सर्व कर्म । जाणोनियां त्यांची वर्म ॥ ४ ॥
बाह्यत्याग अंतर्त्याग । करीतसे तो निःसंग ॥ ५ ॥
जाणतसे सारासार । आत्मानात्म तैसा थोर ॥ ६ ॥
हरिकथा निरूपण । वेदान्त राजकारण ॥ ७ ॥
धनुर्धर उपासना । करितसे अनुदिना ॥ ८ ॥
शक्ति-युक्ति भक्ति-शांती । तया जोडलीसे मुक्ती ॥ ९ ॥
बोले तैसा स्वयें चाले । धरी सेवक पाउलें ॥ १० ॥

## १३१. रामाशिवाय मला कोणी नाहीं

मज नाहीं कोणी विश्वीं । माता पिता सुता भवीं ॥ १ ॥
राम एक जगीं खरा । नव्हे नव्हे दुजा थारा ॥ २ ॥
दृश्य भास नाहीं तेथें । रामपद सर्व हो तें ॥ ३ ॥
स्वामी सर्वच भरला । भेटे राम सेवकाला ॥ ४ ॥

## १३२. तुझ्यावांचून मला कोणी नाहीं

कोण आहे रामा ! तुजविण मज । घेईरे सहज जवळीं वा ॥ १ ॥
जवळीं अंतरीं प्रेम भक्ति भाव । भेटरे राघव ! लवलाही ॥ २ ॥
लवलाही येई, भेट मज रामा । दावी सीतारामा स्वस्वरूप ॥ ३ ॥
स्वस्वरूप ब्रह्म आत्माराम एक । भावाचा सेवक राम माझा ॥ ४ ॥

## १३३. रामाविण मला कोणी नाहीं

सीताराम ! तूजविण । जाऊं कोणा मी शरण ॥ १ ॥
तुजविण नाहीं कोणी । सखा मज त्रिभुवनीं ॥ २ ॥

देह विकलासे तुज । नाहीं आणीकाचें काज ॥ ३ ॥
सांठविला सीताराम । इर्दी सेवक श्रीराम ॥ ४ ॥

## १३४. रामाचें वेड

वेडे केलें मज श्रीरामें सर्वथा । दूर ठेवी आतां कासयासी ॥ १ ॥
कासयासी लग्न मजसि लाविलें । मन वेडावलें रामपायीं ॥ २ ॥
रामपायी मज ब्रह्मांड ठेंगणे । निद्रा भूक जाणे कांहीं नाहीं ॥ ३ ॥
कांहीं नाहीं ध्यान तुजवांचोनियां। रामावांचोनियां काय आहे!॥४॥
काय आहे रामा! वांचोनियां नीट। सेवकासी भेट वारंवार ॥ ५ ॥

## १३५. रामाच्या सन्निधानीं जगाचा विसर

आत्माराम माझा जिवींचा विसांवा। सदा जीवाभावा सन्निधानीं॥१॥
सन्निधानीं सीता-राम अंतरींचा। असतां जगाचा विसराचि ॥ २ ॥
विसराचि सर्व सन्निधानीं राम । सेवकां श्रीराम कल्याणचि ॥ ३ ॥

## १३६. रामानें मन हिरावून नेलें

येवोनी बैसला अंतरीं श्रीराम । हिरावुनी मम मन नेलें ॥ १ ॥
मन नेलें मम तनु धन सर्व । मान भीति गर्व लज्जा लोभ ॥ २ ॥
लज्जा लोभ काम श्रीराम संपूर्ण । नाहीं रूपवर्ण भक्तिभावा ॥ ३ ॥
भक्तिभावासाठीं धांवे सीताराम । सेवका विराम आत्माराम ॥ ४ ॥

## १३७. भक्ताला प्रपंचच परमार्थ होतो

लोकांचिये दृष्टी दिसतो प्रपंचीं । शुद्ध वृत्ति साची अंतरींची ॥ १ ॥
अंतरीं न हाव, वायां बडबड । कधीं न लबाड संभाषण ॥ २ ॥
संभाषण गोष्टी वाउग्या करीना । इष्ट मित्रीं जाणा मन नाहीं ॥ ३ ॥
मन नाहीं पुत्रस्त्रीधनावरी । संताचे अंतरीं राम ब्रह्म ॥ ४ ॥
राम ब्रह्म सर्व प्रपंच परमार्थ । सारिखा समर्थ सेवकासी ॥ ५ ॥

## १३८. रामभक्ताची धन्यता

सीताराम माझी माऊली साऊली । सर्वदा भेटली सर्व भावें ॥ १ ॥
सर्व भाव तूझा मज लडिवाळ । ढेंगणें सकळ देवादीक ॥ २ ॥
देवादीक पदीं लीन सर्वकाळ । भक्तांचा सांभाळ राम करी ॥ ३ ॥
राम,करी सर्व आपण होऊनी । जनीं जनार्दनीं सीताराम ॥ ४ ॥
सीताराम एक आनद संपूर्ण । सेवक कल्याण रामरूपें ॥ ५ ॥

## १३९. भक्तच देव होतो

रामाचा सेवक रामचि स्वरूप । गेलें पुण्य पाप हारपोनी ॥ १ ॥
हारपोनि गेलें मी-तूपण साचें । देव भक्त कैचें दुजेपण ॥ २ ॥
, दुजेपण नाहीं श्रीराम हृदयीं । देव भक्त पाही एकरूप ॥ ३ ॥
, एकरूप खरा दास श्रीरामाचा । धनी स्वानदाचा रामरूपें ॥ ४ ॥
रामरूपें राम सेवक कल्याण । जनीं वनीं पूर्ण राम मनीं ॥ ५ ॥

## १४०. रामसेवक हनुमान

वजरगबली समर्थ माऊली । कृपेची साऊली भक्तावरी ॥ १ ॥
भक्तावरी साच सपूर्ण कल्याण । वर्षा स्वात्मधन स्वात्मानद ॥ २ ॥
स्वात्मानंदसुख राम सेवकासी । सेवक रामासी भेद नाहीं ॥ ३ ॥

## १४१. अनन्यभक्त रामच होतो

सीताराम दास सीताराम खास । नाहीं आशापाश आणिकाची ॥ १ ॥
आणिकाची आशा कदा नये मना । कामना भावना सीताराम ॥ २ ॥
सीताराम मायबाप गुरुदेव । स्वयभु स्वभाव आत्माराम ॥ ३ ॥
आत्मारामीं मन लागलें सर्वदा । दूर हो आपदा भवबध ॥ ४ ॥
भवबध सरे श्रीराम सेवतां । सेवक तत्त्वतां कल्याणचि ॥ ५ ॥

## १४२. रामाचा दास स्वानंदपूर्ण ब्रह्म

श्रीरामाचा दास उदास मी खास । नाहीं मायापाश संसारीं या ॥ १ ॥
संसारीं असोनी स्वात्माराम पूर्ण । स्वानंद प्रपूर्ण परब्रह्म ॥ २ ॥
परब्रह्म साक्षाद् अनुभव जनीं । व्यक्त वनीं मनीं स्वयभाव ॥ ३ ॥
स्वयंभू स्वतंत्र सर्वत्र श्रीराम । सच्चित्सुख धाम सेवकाचें ॥ ४ ॥

## १४३. साधूच्या स्नानानें गंगा पवित्र

स्नाना गंगा जातां चिन्मय जीवन । लोपलें जीवन गंगा अंग ॥ १ ॥
अंग संग होतां अंगत्व मुकलें । सोवळें बनलें तीर्थगंगा ॥ २ ॥
गंगातीर्थ रामसेवक कल्याण । सकळ पावन झालीं तीर्थें ॥ ३ ॥

## १४४. आपलीच आपण पूजा करणार

देव मीच भक्त मीच । माझी पूजा करी मीच ॥ १ ॥
उपासना उपचार । मीच समग्र साचार ॥ २ ॥
आसन मी अर्घ्य पाद्य । पंचामृत स्नान सद्य ॥ ३ ॥
गंगा गोदा कृष्णा सिंधु । यमुना मी स्नानसिंधु ॥ ४ ॥
वस्त्र यज्ञोपवीत मी । गंध पुष्प अक्षता मी ॥ ५ ॥
धूप दीप नैवेद्य मी । फल विडा दक्षिणा मी ॥ ६ ॥
सर्व माझेंच स्वरूप । ब्रह्मसेवक अमाप ॥ ७ ॥

## १४५. सर्वात्मभाव झाल्यावर पूजा अशक्य

सर्व मीच माझी कैसी करूं सेवा । पुष्पादि मी देवा मला वाहूं ॥ १ ॥
वाहूं मला गंध मी स्वरूप माझें । परिमळ साजें आत्मानंद ॥ २ ॥
आत्मानंद मज मीच धूप दीप । नैवेद्य अमूप माझा मीच ॥ ३ ॥
मीच माझा देव कर्म धर्म पूजा । नाहीं राम दूजा सेवक हो ॥ ४ ॥

## पाकळी ७. देवभक्ताचें नातें (अभग १४६ ते १६९)

### १४६. देव भावाचा भुकेला

तात्काळ श्रीहरी म्हणे ऐका साच। सुवर्ण स्थालीच आणा आधीं॥१॥
आणी स्थाली तदा मृत्पात्रचि खास। शकुनी मामास दु ख भारी॥२॥
दु ख भारी हरी आनदलहरी। कृष्ण दया करी भाव पाहे॥३॥
भाव पाहे देव अतरीचा ठेवा। सेवकासी मेवा कल्याणचि॥४॥

### १४७ भक्तवत्सल राम

भक्तिप्रेम भाव भक्ताचा स्वभाव। सदा वासुदव जनीं मनीं॥ध्रु०॥
जनीं मनीं ध्याना राम भाववळें। वेष्णवाच्या मेळें आनदतो॥१॥
आनद भाविका रामनामप्रम। राम सुखधाम कृपा करी॥२॥
करी कृपा राम भाविक भक्तासी। श्रीराम हाकसी उभा ठाके॥३॥
उभा ठाके राम मार्गे पुढें पूण। सवक कल्याण भक्ति भावें॥४॥

### १४८. भक्तवत्सल राम

प्रेमाचा कल्लोळ भक्तिचा सुकाळ। विषम विटाळ काय होय॥१॥
होयचि श्रीराम स्नेहाळ कृपाळ। सतुष्ट सकळ जीव होती॥२॥
होती निर्विकार आपपर नाहीं। भक्ति भाव पाही अतरींचा॥३॥
अतरी बसोनी सर्वचि चालवी। हासवी बोलवी राम माय॥४॥
राममाय जनीं वनीं ध्यानीं मनीं। सेवक कीर्तनीं रगतसे॥५॥

### १४९ देव भक्ताचा कैवारी

वासुदेव हरि सकट निवारी। चौऱ्याशींची फेरी चूकवी तो॥१॥
ज्यासी जेसा भाव त्यासीं तेसा देव। सकटा पाडव रक्षीयेले॥२॥
गजेन्द्राकारणें धाविन्नला कैसा। अनन्यासी खासा मोक्ष देतो॥३॥

प्रल्हादाचे भावा स्तंभीं प्रगटला । नरसिंह झाला भक्तकाजा ॥ ४ ॥
आजवरी बहु भक्त उद्धरिले । चरण धरिले सेवकानें ॥ ५ ॥

## १५०. रामकृपेवांचून यश नाहीं

पौरुष प्रयत्नें लौकिक दृष्टान्ते । पाहुं जातां येतें अनुभवा ॥ १ ॥
अनुभव सर्वां देवांचा निर्बंध । प्रयत्न संबंध काय चाले ॥ २ ॥
काय चाले यत्न जरी नाहीं देव । म्हणोनियां देवकृपा व्हावी ॥ ३ ॥
कृपा व्हावी जरी देवाची आपणा । रामकृष्ण म्हणा रात्रंदिन ॥ ४ ॥
रात्रंदिन काळ सार्थकीं लावावा । श्रीराम भजावा जनीं वनीं ॥ ५ ॥
जनीं वनीं राम सर्वत्र भरला । हृदयीं लपला सर्वांमाजीं ॥ ६ ॥
सर्वांमाजीं राम राजी राखा पूर्ण । सेवक कल्याण सर्व राम ॥ ७ ॥

## १५१. संकटमोचन आत्माराम

धांवला पावला रघुवीर राम । सर्वां सुख धाम अंतर्यामीं ॥ १ ॥
अंतर्यामीं राम कृपाळू श्रीहरी । संकट निवारी आत्मपणें ॥ २ ॥
आत्मपणें पूर्ण सेवक कल्याण । सच्चित्सुखघन रामराय ॥ ३ ॥

## १५२. एक ईश्वरच खरा दाता

काय उणे भक्ता सांग । मागें पुढें पांडुरंग ॥ १ ॥
मानव तो देई काय । स्वपद दे रामराय ॥ २ ॥
नाहीं मागणें बाधक । भक्ति माऊली साधक ॥ ३ ॥
कल्याणाचा हा सेवक । वस्तु - मात्री राम देख ॥ ४ ॥

## १५३. रामाविण सुख नाहीं

प्रत्येक जीवाला सुख हवें असें । दुःख नको असें वाटतसें ॥ १ ॥
वाटतसे तैसा यत्न अहर्निश । करीतसे खास सुख नाहीं ॥ २ ॥

सूख नाहीं कदा रामरूपेवीण । स्वात्मानंद पूर्ण आत्मज्ञानें ॥ ३ ॥
आत्मज्ञानें सूख आत्मस्वरूपचि । सेवक रामचि सूखरूप ॥ ४ ॥

## १५४. अंतींचा सोयरा एक रामच

माता पिता कांता कन्या पुत्र भ्राता । अंतीं सोडवीता नाहीं कोणी ॥१॥
सोयरे धायरे न च कामा येती । राम सीतापती सोडवीतो ॥ २ ॥
राम मनीं धरा जिवलग खरा । अंतींचा सोयरा तोचि एक ॥ ३ ॥
शरण राघवा जावें भावें एका । स्वामीनें सेवका सांभाळावें ॥ ४ ॥

## १५५. भक्तवत्सल आनंदस्वरूप राम

श्रीराम आनंद स्वरूप आपण । सच्चित्सुखपूर्ण सीताराम ॥ १ ॥
सीताराम माझा सखासोयरा हा । मायबाप पहा बंधु मित्र ॥ २ ॥
बंधुमित्र राम सर्वच भरला । सीताराम भला दयाळ बा ॥ ३ ॥
दयाळू मायाळू कृपाळ स्नेहाळू । सदा भक्तपाळ स्वानंदेसी ॥ ४ ॥
स्वानंद श्रीराम सीताराम पूर्ण । सेवक कल्याण रामरूपें ॥ ५ ॥

## १५६. भक्तरक्षक राम

संपूर्ण व्यापक संतुष्ट सर्वदा । भक्ताच्या आपदा वारीतसे ॥ १ ॥
वारीत संकटें सांकडें लिगाड । मायामोह वड मोडीतसे ॥ २ ॥
मोडीतसे ताठा अहंकार गर्व । राम स्वय सर्व करीतसे ॥ ३ ॥
करीत पालन मागें पुढें राहे । सेवकासी पाहे कृपा दृष्टी ॥ ४ ॥

## १५७. सेवकाला राम रक्षितो ( प्रल्हाद. )

शस्त्रमार भारी घाण्यामध्यें घाली । अग्निमाजीं जाळी प्रल्हादासी ॥१॥
सिंधूत बुडवी बांधोनी पाषाण । आपो नारायण वांचवी त्या ॥ २ ॥
मत्त गजापुढें ठेवी बाळकाला । सिंहरूपा भ्याला गज पळे ॥ ३ ॥
सेवका रक्षिता मागें पुढें राम । अपायीं आराम पावतसे ॥ ४ ॥

## १५८. देवच भक्ताचा सेवक होतो

देव देवपण विसरे आपण । भक्ताचें कल्याण करीतसे ॥ १ ॥
करीतसे सेवा देवचि भक्ताची । वासना भक्ताची पूरवीतो ॥ २॥
पुरवीतो ळळा भक्त देहीं वसे । सदा अर्पितसे आत्मरूप ॥ ३ ॥
आत्मरूपें नीच सेवाहि करीतो । दळितो कांडितो भक्तासवें ॥ ४ ॥
भक्तासवें देव देवासवें भक्त । व्यक्ताव्यक्त मुक्त सेवकहो ॥ ५ ॥

## १५९. देव भक्तांचा संबंध

प्रेमळ भजन भक्ताचा स्वभाव । उपजवी देव भाव भक्ति ॥ १ ॥
भाव भक्ति भक्ता पोटीं देव झाला । वडील शोभला भक्त देवा ॥ २ ॥
भक्त देवा बाप धाकुटा तो देव । बापाचा तो जीव मुलावरी ॥ ३ ॥
मुलावरी प्रेम बापाचें अधीक । आत्मरूप देव म्हणोनियां ॥ ४ ॥
म्हणोनियां देव भक्तचि साचार । एकरूप सार पूर्ण ब्रह्म ॥ ५ ॥
पूर्ण ब्रह्म देव भक्त स्वस्वरूप । कल्याण अमूप सेवकाचें ॥ ६ ॥

## १६०. देव व भक्त म्हणजे गूळ व गोडीप्रमाणें अभिन्न

देव भक्त अंकीं एकमेकां वैसे । परस्परें ऐसें मिळताती ॥ १ ॥
मिळती तरंग समुद्रीं स्वयंभ । अलंकार लाभ सुवर्णानें ॥ २ ॥
सुवर्ण सुवास पुष्पीं पूर्ण वसे । देव भक्त तैसे एकरूप ॥ ३ ॥
एकरूप गूळ गोडी नव्हे भिन्न । सेवक कल्याण स्वात्मरूप ॥ ४ ॥

## १६१. रामकृपेनें मायानाश

श्रीराम माऊली कृपादृष्टीमात्रें । प्रपंचाचीं क्षेत्रें सर्व वारी ॥ १ ॥
वारी सर्व काम क्रोध मोहपाश । भव-लिगाडास तोडियेलें ॥ २ ॥
तोडियेलें मी-तूं अहंता ममता । दाविला तत्त्वतां परमार्थ ॥ ३ ॥
परमार्थ गोड अवीट विटेना । सेवक कल्याणा पावलासे ॥ ४ ॥

## १६२. गुरुकृपेनें देहींच रामदर्शन

आश्चर्य दाटलें सांगतां नयेचि । माझा राम याचि देहीं वसे ॥ १ ॥
वसे देहीं राम हृदयसंपुटीं । नाहीं आटाआटी साधनाची ॥ २ ॥
साधन कासया गुरुरूपें राम । सेवक आराम कल्याणचि ॥ ३ ॥

## १६३. रामकृपेनें मीच राम

सर्व भावें दास माझा मीच खास । तोडी मायापाश रामकृपा ॥ १ ॥
रामरूपा राम कृष्ण हरि वाचें । नाम मुखीं साचें वसतसे ॥ २ ॥
वसत श्रीराम मी सर्वान्तर्यामीं । साच रामनामीं ब्रह्मात्मता ॥ ३ ॥
ब्रह्मात्मता, मम 'मी' न, पूर्ण काम । सेवक आराम रामरूपें ॥ ४ ॥

## १६४. रामकृपेनें अभेद-दर्शन

भक्तिप्रेम भाव पीक परिपूर्ण । कैसी सांठवण होय कोठें ॥ १ ॥
कोठें होय नभ अल्पत थोडकें । सद्गुरु नेटकें कृपामूर्ति ॥ २ ॥
कृपामूर्ति राम सहज समर्थ । दाविती यथार्थ आत्मवस्तु ॥ ३ ॥
आत्मवस्तु ब्रह्म समचि सर्वत्र । अत्र परत्र भान नाहीं ॥ ४ ॥
नाहीं भान मी-तूं देव भक्त भेद । सेवक स्वानंद राम ब्रह्म ॥ ५ ॥

## १६५. रामकृपेनें सर्वत्र आत्मदर्शन

श्रीरामें दाविलें आत्मस्वरूपास । अहं सोहं वास मावळला ॥ १ ॥
मावळे प्रपंच मी-तूं पण भेद । स्वात्मादित्य मोद झळकतो ॥ २ ॥
झळकतो राम सच्चित्सुखघन । उदो अस्तावीण परीपूर्ण ॥ ३ ॥
परिपूर्ण देहीं गेहीं जनीं वनीं । स्वसंवेद्य मनीं भरलासे ॥ ४ ॥
भरला सर्वत्र पुरोनी उरला । सेवक पावला राम ब्रह्म ॥ ५ ॥

## १६६. रामकृपें कृतार्थता

शक्ति युक्ति भक्ति भुक्ति मुक्ति प्राप्ती । रामकृपें शांति सहजचि ॥ १ ॥
सहजचि लाभे फुकाचें ठेवणें । यज्ञ तप दानें शीण वायां ॥ २ ॥
वायां तीर्थाटन अष्टांगसाधन । रामाविण ज्ञान काय असे ॥ ३ ॥
असें शुद्धचित्तीं श्रीराम सदैव । सेवक सुदेव राम ब्रह्म ॥ ४ ॥

## १६७. रामकृपेनें स्वानंद

उघडलें बोधभांडार श्रीरामें । दाउनियां वर्मे स्वानंदाचीं ॥ १ ॥
स्वानंद संपूर्ण हृदयमंदीरीं । रामकृष्ण हरि नांदतसे ॥ २ ॥
नांदतसे परब्रह्म स्वयंज्योती । भवदु:ख भीति पळालीसे ॥ ३ ॥
पळाली अविद्या माया मोहपाश। लिगाड सायास कांहीं नाहीं ॥ ४ ॥
नाहीं कांहीं भेद एक राम पूर्ण । सेवक कल्याण जनीं वनीं ॥ ५ ॥

## १६८. रामच आनंदमय मोक्षदाता

भरलासे हरि चराचरामाजीं । अन्य नसे गाजी तिन्ही लोकीं ॥ १ ॥
लोकीं माता पिता कांता सहोदर । उदार अपार तूंचि रामा ॥ २ ॥
राम निजधन भवपार नेई । आनंद प्रवाहीं बूडविसी ॥ ३ ॥
बुडविसी सर्व जन मन संग । सेवक श्रीरंग-रंगीं दंग ॥ ४ ॥

## १६९. रामकृपेनें कैवल्य, आनंद

मुक्ति मोक्ष शांति कैवल्य निर्वाण । हृद्ग्रंथिभेदन स्वात्मानंद ॥ १ ॥
स्वात्मानंद नित्य जन्ममृत्युहीन । स्वातंत्र्य प्रपूर्ण मायातीत ॥ २ ॥
मायातीत ब्रह्म पूर्ण समाधान । सेवक कल्याण रामकृपें ॥ ३ ॥

# पाकळी ८. साधनमार्ग (अभग १७० ते १९४)

## १७०. परमार्थपथ

या या या या झडकरी या । श्रीरामातें आळवूं या ॥
नरजन्माचें सार्थक करुनी । परधाम सद् गाठू या ॥ ध्रु० ॥
रघुपति राघव राजाराम । पतितपावन सीताराम ॥
रामनाम हें सदा गाउनी । विश्वीं सर्वचि पाहू राम ॥ १ ॥
ज्ञानाग्नाचा एक एक घास । पचउनी साधा राम खास ॥
अभ्यासानें सदा सर्वदा । समर्थ वनतो रामदास ॥ २ ॥
विषयासक्ती सर्व त्यागुनी । सच्चित्सुखघन राम मनीं ॥
ध्याउनि सेवक पूर्ण साचाचि । कल्याण पावे जनीं वनीं ॥ ३ ॥

## १७१. साधनमार्ग

सच्छास्त्र श्रवण सद्गुरुमुखानें । सत्सग कीर्तनें रामनाम ॥ १ ॥
रामनामें यम – लोक ओस पडे । भुक्ति मुक्ति जोडे रामकृपें ॥ २ ॥
रामकृपें भक्ति ब्रह्माशीं मीलन । मायेचें चलन अनामचि ॥ ३ ॥
अनामचि राम सेवक कल्याण । रामनाम पूर्ण रामरूप ॥ ४ ॥

## १७२. साधनसोपान

निष्काम कर्मानें चित्तशुद्धी होते । वासना जळतें रामनामें ॥ १ ॥
रामनामें काम क्रोध पळे दुरी । दु खद ससारीं सुख लाभे ॥ २ ॥
सुख लाभे रामकृपें भक्तजना । जनीं जनार्दना भेट होय ॥ ३ ॥
भेट होय पूर्ण स्वानद उसळे । अहकार गळे सहजचि ॥ ४ ॥
सहज श्रीराम सर्वत्र भरला । सेवक लाधला रामकृपा ॥ ५ ॥

## १७३. नामरूपातीत वस्तु चर्मचक्षूस दिसत नाहीं

गूळ दिसे परी गोडी काय दिसे । वेगळी ती नसे गुळाहून ॥ १ ॥
तैसा सर्वाठायीं भरला श्रीराम । सर्व दिसे राम दिसेनाचि ॥ २ ॥

कापुरा सुवास दिसे कां उघडा । नयन उघडा आत्मदृष्टीं ॥ ३ ॥
राम पहावया सांडी अभिमान । नाम रूप मन बाह्याकार ॥ ४ ॥
अंतर्बाह्य पूर्ण भूषणें सुवर्ण । सेवक कल्याण राम ब्रह्म ॥ ५ ॥

## १७४. साधनानेंच साक्षात्कार

काय करूं म्हणे शिष्य सद्गुरूसीं । साक्षात्कार मसी हो सद्गुरु ॥ १ ॥
सद्गुरु सांगती साधकां साधन । करणें प्रयत्न परमार्थी ॥ २ ॥
परमार्थी नित्य साधन करावें । तरीच वरावे साक्षात्कार ॥ ३ ॥
साक्षात्कार झाला तरी धीर धरा । मुक्तताचि वरा पूर्णपणें ॥ ४ ॥
पूर्णपणें आत्मा असिजे आपण । सेवक कल्याण साक्षात्कार ॥ ५ ॥

## १७५. साधनानें क्रमशः साक्षात्कार

अनन्य भावानें साधन करणें । इंद्रियें जिंकणें मनबुद्धि ॥ १ ॥
मन बुद्धि जिंका आत्मप्रचितीसी । साक्षात्कार त्यासी होत असे ॥ २ ॥
होत असे साक्षात्कार क्रमें क्रमें । गुरुकृपा वर्में पूर्णता ये ॥ ३ ॥
पूर्णता ये स्वयंसिद्ध ब्रह्म पूर्ण । सेवक कल्याण परीपूर्ण ॥ ४ ॥

## १७६. इच्छा – निश्चय – कर्म – फल

काम अभिलाषें निश्चय करितो । कर्मासी वरितो निश्चयानें ॥ १ ॥
निश्चय हो जेसा कर्म होय तैसे । प्राप्त होय तैसें फल साचें ॥ २ ॥
फल साचें सुख वाटे जरी व्हावें । रामनाम गावें सर्व काळ ॥ ३ ॥
सर्वकाळ मनीं रामकृष्ण हरी । सेवक उद्धरी रामरूपें ॥ ४ ॥

## १७७ अनासक्तीनें मनोजय

होय निर्मुलचि अंतर्दोष सारे । वैराग्य बा खरें बाणे जरी ॥ १ ॥
जरी अनासक्ति विषयीं विरक्ती । हीच एक युक्ति मनोजया ॥ २ ॥
मनोजय काय अभ्यासें होईल । तरू हा फुटेल तासल्यानें ॥ ३ ॥
तासल्यानें काय सेवक कल्याण । वाढे परी जाण मनोवृत्ति ॥ ४ ॥

## १७८. भक्तांच मुख्य कर्तव्य – संघटना गौण

भक्ताची भूमिका भक्तिच प्रमुख । चित्तशुद्धि देख साधीतसे ॥ १ ॥
साधी संघटना सहज जरी हो । हव्यास नको हो संघटना ॥ २ ॥
संघटणें होतो विचारसंकोच । अनासक्त साच भक्तनेता ॥ ३ ॥
नेता भक्त करी संघटण मोडी । परि धोका जोडी न साधतां ॥ ४ ॥
साधी अनासक्ति संघटना पूर्ण । सेवका कल्याण रामकृपा ॥ ५ ॥

## १७९. प्रेमपूर्ण सेवा

दया कृपा स्नेह उत्कट ओलावा ॥ उत्तम सेवावा सर्वोत्तम ॥ १ ॥
सर्वोत्तम राम सर्वाधार सर्व । शिव - विष्णु पूर्व परिपूर्ण ॥ २ ॥
परिपूर्ण परब्रह्म पारावार । कल्याण अपार मेवा सेवा ॥ ३ ॥
सेवा मेवा राम आनंद प्रपूर्ण । सेवक कल्याण रामकृपें ॥ ४ ॥

## १८०. विवेकच सद्गुरु

विवेक सद्गुरु आपणा आपण । चित्त शिष्य जाण परीक्षून ॥ १ ॥
परीक्षणें आत्म - स्वरूप जाणावें । चित्तासी काढावें सोलोनियां ॥ २ ॥
सोलून तकार बाजूस देवावा । सच्चित्सुख ठेवा साधतसे ॥ ३ ॥
साधतसे आत्मविजय सायासें । याचि देहीं वसे समाधान ॥ ४ ॥
समाधान राम स्वरूप आनंद । आनंदी आनंद सेवक हो ॥ ५ ॥

## १८१. नित्यानित्यविवेकानें रामप्राप्ति

रामाविण नित्य दुजें कांहीं नाहीं । संचलासे पाही आत्मानात्म ॥१॥
आत्मानात्म जेणें विवेकासी केलें । सारासार भले विचारिती ॥ २ ॥
विचारणें होय प्रकृति - संहार । रामराया थोर ठाई पडे ॥ ३ ॥
ठाई पडे गूज वेदशास्त्रसार । सेवका अपार लाभ होय ॥ ४ ॥

## १८२. गाया पर बूझा नहि

रामभक्ति नोहे गायन वादन । नर्तन स्मरण नाममात्र ॥ १ ॥
टाळी वाजवणें हासणें रडणें । नाचणें लोळणें बाह्याकार ॥ २ ॥
नाटक करोनी फसणूक होये । माया दूर जाये कैसी बापा ॥ ३ ॥
सर्वभूतमात्रीं पाही रामराया । सर्व साडोनियां गुणदोष ॥ ४ ॥
प्राणिमात्र सेवा करी मनोभावें । सदा विसरावें मी तूं पण ॥ ५ ॥
करावें कल्याण सेवक आपण । सर्व राम जाण परिपूर्ण ॥ ६ ॥

## १८३. रामध्यानानें दुर्गुणांचा नाश

राम माझा एक साधका आधार । भवसिंधु पार नेत असे ॥ १ ॥
नेत असे सर्व अहंकार दूर ॥ वाचे निरंतर नाम येतां ॥ २ ॥
नाम येतां राम न च बाधे काम । क्रोधादिकीं धाम सोडिलेंसें ॥ ३ ॥
सोडिलेसे जेणें अहंता ममता । बाणे निर्भयता रामकृपें ॥ ४ ॥
रामकृपा सोपी दक्ष प्रज्ञावंता । यत्न अनन्यता जयापाशीं ॥ ५ ॥
जयानें केलासे अभिमान अंत । तया वस्तु प्राप्त सहजचि ॥ ६ ॥
सहजचि राम सर्वत्र संचला । सेवकें पाहिला स्वात्मपणें ॥ ७ ॥

## १८४. श्रवणभक्ति

नरदेहाचें सार्थक । जोडा सीताराम एक ॥ ध्रु० ॥
करा अध्यात्मश्रवण । निदिध्यासन संधान ॥ १ ॥
नाहीं श्रवणापरतें । थोर साधन कोणतें ॥ २ ॥
मार्ग हाचि विहंगम । लाभे समाधान वर्म ॥ ३ ॥
आत्मा द्रष्टव्यः श्रोतव्यः । मन्तव्यो निदिध्यासितव्यः ॥ ४ ॥
ऐसे श्रुति गर्जतसे । तेचि सेवकासी पिसें ॥ ५ ॥

## १८५. सगुणकीर्तनमाहात्म्य

सगुण कीर्तनें होय चित्त शुद्ध । निरसुनी भेद जाय सर्व ॥ १ ॥
जाय सर्व काम क्रोध पळे दुरी । महापाप तरी जळतसे ॥ २ ॥

जळतसे पूर्ण दुःखाचें अरण्य । पशुपक्षी वन्य पावन हो ॥ ३ ॥
पावन श्रीराम कीर्तन गजर । भवनदी पार उतराया ॥ ४ ॥
उतराया साच कीर्तन उपाय । सेवकाची सोय रामनाम ॥ ५ ॥

## १८६. कीर्तनश्रवणमाहात्म्य

प्रेमळ कीर्तन श्रवण करून । पापाचें क्षालन अंतरींच्या ॥ १ ॥
अंतरीं पवित्र कथा श्रवणेंचि । श्रोता वक्ता होचि आनंदित ॥ २ ॥
आनंद श्रीराम कीर्तन आनंद । प्रल्हाद नारद गातां तरे ॥ ३ ॥
तरे गातां नाम सेवक कल्याण । वंदिती चरण सुर सर्व ॥ ४ ॥

## १८७. कीर्तनानें देव वेडा होतो

कीर्तनाचें वेड देवा । सर्व सांडे घाली धांवा ॥ १ ॥
मागें पुढें नाचतसे । पाठी पोटीं रक्षीतसे ॥ २ ॥
सुख देउनी आपुलें । दुःख भोगितसे भलें ॥ ३ ॥
भक्ता भोळ्या भाविकासी । हरिदासा मुक्तवीसी ॥ ४ ॥
कथा कीर्तनीं तत्पर । सदा सेवक सादर ॥ ५ ॥

## १८८. श्रवण-मननाचा निश्चय

पतितपावना जानकीजीवना । श्रवण मनना न च सोडी ॥ १ ॥
न च सोडी मी हें साधन वा थोर । साधनाचें सार ब्रह्माभ्यास ॥ २ ॥
ब्रह्माभ्यास ह्याचें चिंतन तयाचें । प्रबोधन साचें तयाचेंचि ॥ ३ ॥
तयाचेंचि पूर्ण व्यापकत्व पाहे । सेवकासी लाहे निजरूप ॥ ४ ॥

## १८९. सर्व इंद्रियांना देवाचें काम

डोळ्यांनीं पहावें श्रीरामस्वरूप । वाचेनें अमूप गावें रामा ॥ १ ॥
रामा गावें टाळी वाजवोनी करें । मनीं ध्यान बरें सच्चिद्रूप ॥ २ ॥
सच्चिद्रूप राम सुधा कान पीतो । पायानें नाचतो प्रेमानंदें ॥ ३ ॥
प्रेमानंद लूट श्रीराम स्वरूप । कल्याण अमाप सेवकासी ॥ ४ ॥

## १९०. शरणागति

कांहीं करी रामा माझें । धरीलें मीं पद तूझें ॥ १ ॥
रामपदीं नाहीं च्युती । गर्जतसे शास्त्र श्रुती ॥ २ ॥
पादसेवा घडे ज्यासी । तोचि थोर पुण्यराशी ॥ ३ ॥
सेवेलागीं संगत्याग । होत असे यथासांग ॥ ४ ॥
निवेदन विदेहता । विज्ञानता अलिप्तता ॥ ५ ॥
तुरे जननमरण । दृढ धरितां चरण ॥ ६ ॥
सेवकासी सेवा गोड । पूर्ण करी राम कोड ॥ ७ ॥

## १९१. वृत्तींच्या संधींत स्वरूप

वृत्ति ही निमतां दुजी नुद्भवतां । संधीसी पहातां पूर्ण ब्रह्म ॥ १ ॥
लय-विक्षेपाचें मध्यें स्वयंसिद्ध । वस्तु सुप्रसिद्ध प्रकाशते ॥ २ ॥
संधी साधियेली उन्मनी अवस्था । परिपूर्ण आस्था स्वात्मरूपीं ॥ ३ ॥
ज्याची त्यास प्राप्ती सद्गुरुकृपेनें । वृत्तिलीनतेनें विराजते ॥ ४ ॥
कल्याण सेवक स्वात्मानंदयुक्त । नित्य शुद्ध मुक्त सहजचि ॥ ५ ॥

## १९२. सर्वत्र एकच देव हें ज्ञानदृष्टीनें पहा

सगुण निर्गुण मूर्त नी:अमूर्त । अव्यक्तचि व्यक्त देव पूर्ण ॥ १ ॥
देव पूर्ण एक अनेक नामाचा । विविधरूपाचा रामकृष्ण ॥ २ ॥
रामकृष्ण हरि गोविंद मुरारी । विठ्ठल पंढरीं नाना क्षेत्रीं ॥ ३ ॥
नानाक्षेत्रीं तीर्थीं अणुरेणूंमाजीं । व्यापुनी सहजीं उरलासे ॥ ४ ॥
उरला भरला श्रीहरि दिसेना । उघडा नयना ज्ञानांजनें ॥ ५ ॥
ज्ञानांजन रामरुपादृष्टी पाहे । राम सर्व आहे सांदोसांदीं ॥ ६ ॥
सांदोसांदीं देव रामकृष्ण हरी । हृदयमंदीरीं पांडुरंग ॥ ७ ॥
पांडुरंग पूर्ण सगुण निर्गुण । विटेवरीं एण प्रत्यक्षचि ॥ ८ ॥
प्रत्यक्ष प्रमाण सेवक कल्याण । रामनारायण कृपासिंधू ॥ ९ ॥

## १९३. सर्वव्यापी देव पाहून शांत राहा

वेद प्रतिपाद्य देव स्वसंवेद्य । स्वानुभव ह्य सच्चिद्घन ॥ १ ॥
सच्चिद्घन रामकृष्ण हरी पूर्ण । वेदादि प्रमाण शास्त्रें सर्व ॥ २ ॥
शास्त्रें सर्व साधु संत ऋषीमुनी । श्रीहरि जाणोनी शांत राहे ॥ ३ ॥
शांत राहे मन जाणोनी स्वरूप । देवस्वस्वरूप सर्वाभूतीं ॥ ४ ॥
सर्वाभूतीं राम देव परिपूर्ण । सेवक कल्याण रामरूपें ॥ ५ ॥

## १९४. स्वस्वरूपांत स्नान केल्यानें ईश्वरत्व

स्वयंज्योतितीर्थ गंगास्नान केलें । माया मोह गेले मल सर्व ॥ १ ॥
सर्व मल मी तूं अहंता ममता । निपटुनी जातां नित्य शुद्ध ॥ २ ॥
नित्य शुद्ध बुद्ध त्रिपुंड्र विभूती । भूतदया मुक्ति अंगीं त्याला ॥ ३ ॥
त्याला अंगीं सत्य चिदंबर पूर्ण । श्रीराम संपूर्ण ओळलासे ॥ ४ ॥
ओळला स्वयंभ स्वयं आत्माराम । सेवका आराम स्नानसंध्या ॥ ५ ॥

# पाकळी ९. सद्गुरु ( अभंग १९५ ते २१६ )

## १९५. परमार्थात एक सद्गुरूच साह्य

माता पिता कांता पुत्र कन्या भ्राता । आप्त इष्ट भर्ता साह्य नोहे ॥१॥
साह्य नोहे कोणी साधाया परमार्थ । सद्गुरु समर्थ साह्य सदा ॥२॥
सदा साह्य राम सद्गुरु प्रपूर्ण । सेवक कल्याण रामरूपें ॥ ३ ॥

## १९६. तीर्थीं धोंडा पाणी – गुरुचरणाश्रयानें शुद्धता

अयोध्या पंढरी काशी रामेश्वर । कासया अपार तीर्थयात्रा ॥ १ ॥
तिर्थयाचीं सर्व विपर्यीं भुलला । वृत्तिनें लागला संसारासी ॥ २ ॥
संसारीं भावार्थ मानसीक पापें । मनाचीं अमूपें स्वच्छ करी ॥ ३ ॥
स्वच्छ करी मन सद्गुरुचरण । सेवका कल्याण गुरुरूपें ॥ ४ ॥

## १९७. अज्ञेय आत्मा गुरुकृपेनें प्राप्त होतो

आत्मा हा समजे अग्राह्य अचिंत्य । अलक्षण सत्य ज्ञानानंत ॥ १ ॥
एकात्मप्रत्यय सार घनानंद । सद्गुरुप्रसाद प्राप्त जाला ॥ २ ॥
प्रपंचोपशम शांत शिवाद्वैत । विलक्षण मात-स्पर्श नाहीं ॥ ३ ॥
व्याप्य ना व्यापक कार्य ना कारण । सर्वातीत पूर्ण रामकृष्ण ॥ ४ ॥
कल्याण सेवक रामकृष्णीं लीन । नामरूप भान उमजेना ॥ ५ ॥

## १९८. गुरुकृपेनें विरक्ति, सद्गुण, भक्ति, ज्ञान

विपर्यी विरक्ति इंद्रियदमन । गुरुकृपेंवीण कांहीं नाहीं ॥ १ ॥
नाहीं गती जना पडिले प्रवाहीं । भक्तिज्ञान नाहीं समाधान ॥ २ ॥
समाधान शांती क्षमा दया सोय । मोक्षाचा उपाय गुरुकृपें ॥ ३ ॥
गुरुकृपाज्योती सेवका कल्याण । सच्चित्सुखघन राम ब्रह्म ॥ ४ ॥

## १९९. सद्गुरूंना शरण गेल्यास ज्ञान

संतां सर्वभावें भजोनी हो ज्ञान । सेवाधर्म जाण दुर्लभचि ॥ १ ॥
दुर्लभ योगियां तनुमनजीवें । चरणीं लागावें सद्गुरूच्या ॥ २ ॥
सद्गुरु दास्यत्व मनो भावें करी । मीपणा निवारी दंभ दर्प ॥ ३ ॥
दंभ दर्प गर्व सोडोनि गुरूसी । भजतां मनेसी ज्ञान होय ॥ ४ ॥
होय ज्ञान गुरु कृपाबळें पूर्ण । सेवक कल्याण रामकृपें ॥ ५ ॥

## २००. गुरुसेवा व रामभक्ति यांशिवाय ज्ञान नाहीं

ज्ञान बाजारांत नाहीं । मिठाई मिळेशी कांहीं ॥ १ ॥
जातां जातां मार्गी कांहीं । ज्ञान मिळत हो नाहीं ॥ २ ॥
बहिरठाच्या कानीं कांहीं । ज्ञान पडतचि नाहीं ॥ ३ ॥
पेरण्याच्या पूर्वी शेत । नांगरण खास होत ॥ ४ ॥
मननाचा निदिध्यास । मनाचा सद्भाव खास ॥ ५ ॥
गुरुसेवातत्परास । रामप्रभू सर्व खास ॥ ६ ॥
श्रीरामचरणभक्ति । सेवक कल्याण मुक्ति ॥ ७ ॥

## २०१ आत्मज्ञान सांगणारा अधिकारी विरळा

नित्य शुद्ध बुद्ध आत्मयाचें ज्ञान । सांगणारा कोण एकादाच ॥ १ ॥
अपरोक्ष साक्षात् ज्ञानयुक्त कोण । स्वानुभवपूर्ण क्वचितचि ॥ २ ॥
आनंद सहज समाधींत धुंद । डोले आत्मानंद वृत्ति सदा ॥ ३ ॥
दयाघन गुरुरुपेंचि संपूर्ण । सेवक कल्याण ब्रह्मपद ॥ ४ ॥

## २०२. सत्यसंकल्पानें सद्गुरुदर्शन

विना साधुदर्शन अन्न सेविना मी । रती रामनामीं भाव भरें ॥ १ ॥
भाव भरें तीन दिन निराहार । सद्गुरु साचार पातलेसे ॥ २ ॥
पातलेसे जयजयकार श्रीरामाचा । उच्चार हो साचा आनंदेसी ॥ ३ ॥
आनंदेसी घाली लोटांगण पदीं । सेवक संपादी कल्याणचि ॥ ४ ॥

## २०३. गुरुलक्षण

गुरु परमात्मा परात्परपूर्ण । श्रीराम संपूर्ण दृढ भाव ॥ १ ॥
दृढभावें देव सद्रूप चिद्रूप । राम सुखरूप संचलासे ॥ २ ॥
संचला श्रीराम अंतर्बाह्य पूर्ण । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ३ ॥

## २०४. गुरुलक्षण

सद्गुरुचरण वेदशास्त्र जाण । यथार्थ प्रमाण स्वानुभव ॥ १ ॥
स्वानुभव नित्य शुद्ध बुद्ध मुक्त । अव्यक्तचि व्यक्त गुरुरुपें ॥ २ ॥
गुरुरूप पूर्ण सच्चित्सुखघन । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ३ ॥

## २०५. सद्गुरुलक्षण

कल्पतरु गुरु कामधेनु पूर्ण । चिंतामणी जाण गुरु ब्रह्म ॥ १ ॥
गुरु ब्रह्मवस्तु त्रिदेवाचा देव । जीव शिव भाव शब्द नाहीं ॥ २ ॥
नाहीं शब्द गेला आहे तो मुरला । विरोनी उरला स्वात्मपणें ॥ ३ ॥
स्वात्मरूप स्वयं स्वानुभूत स्वेन । सेवक कल्याण स्वस्मिन्पूर्ण ॥ ४ ॥

## २०६. सद्गुरुमहिमा

गुरु संत राजाराम प्राण माझा । गुरुविण दूजा देव नाहीं ॥ १ ॥
सुखाचा सागर प्रेमाचें आगर । भवभयपार करीतसे ॥ २ ॥
वैराग्याचें मूळ ब्रह्मचि केवळ । करिती तात्काळ ग्रंथीं भेद ॥ ३ ॥
घाली ज्ञानांजन दाखवी निधान । सेवका कल्याण तात्काळचि ॥ ४ ॥

## २०७. सद्गुरुमहिमा

चालतें बोलतें परब्रह्म गुरु । बुद्धीचा निर्धारु दृढ व्हावा ॥ १ ॥
व्हावा दृढ भाव सद्गुरुचि एक । देवासी अधीक पूर्णपणें ॥ २ ॥
पूर्णपणे एक सद्गुरु सामर्थ्य । इतर सामर्थ्य मायारूप ॥ ३ ॥
मायारूप पळे स्वरूपीं विगळे । वेदशास्त्र लुळे देवादिक ॥ ४ ॥
देवादिक सान सद्गुरुस्वरूपीं । सच्चिद्घनरूपीं कोण श्रेष्ठ ॥ ५ ॥
श्रेष्ठ कोण एका सद्गुरुवांचोनी । 'नेति नेति' वाणी श्रुतिमाय ॥ ६ ॥
श्रुतिमाय काय करीलचि शब्द । कल्याण निःशब्द सेवकचि ॥ ७ ॥

## २०८. गुरुभक्ति

नित्य गुरुसेवा करितो आवडी । नाहीं अर्ध घडी विराम हो ॥ १ ॥
विराम आराम आत्माराम पूर्ण । जनीं जनार्दन सेवेलागी ॥ २ ॥
सेवेलागी भूक तहान न जाणें । निद्रा ध्यान नेणें सेवाब्रह्म ॥ ३ ॥
ब्रह्मसेवा सर्व कर्मभक्ति ज्ञान । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ४ ॥

## २०९. सद्गुरुवचनच वेद

सद्गुरु मुखींचे शब्द वाक्य मात्र । पूर्ण वेदशास्त्र महामंत्र ॥ १ ॥
महामंत्र साच श्रीराम जय राम । जय जय राम कृष्ण हरी ॥ २ ॥
हरी भेदभाव सद्गुरुचरण । सेवक कल्याण रामकृष्ण ॥ ३ ॥

## २१० सद्गुरु ह्याच खरा सोयरा

सद्गुरुसारिखा नसेचि सोयरा । नेई पैलपारा ऐसा जगीं ॥ १ ॥

इतर सोयरे काय कामा येती । दुःख होतां जाती निघोनियां ॥ २ ॥
जेथें शितें तेथें धांवतील भूतें । पैशियाच्या हातें काय प्राप्त ॥ ३ ॥
म्हणोनियां सर्व सोडावा हो स्वार्थ । धरी परमार्थ मार्ग बरा ॥ ४ ॥
मार्ग हा सुलभ सर्वांसीच आहे । संत सोय लाहे जया तया ॥ ५ ॥
सावध साक्षेपी विचारी नी दक्ष । तया सिद्ध मोक्ष गुरुकृपें ॥ ६ ॥
गुरुकृपा सोपी कल्याण सेवका । धरितां विवेका अहर्निश ॥ ७ ॥

## २११. गुरूला पंचांगनमन

दोन बाहु दोन जानू । तया 'नमो नमो' म्हणूं ॥ १ ॥
सद्गुरूसी अवलोकून । साधूं पचांगनमन ॥ २ ॥
सर्व पूजेमाजि श्रेष्ठ । पंचांग प्रणाम इष्ट ॥ ३ ॥
साधुसंत गुरुदेव । राम सेवक स्वभाव ॥ ४ ॥

## २१२. गुरूला साष्टांग नमन

सद्गुरूसी भावें पूर्ण । दंडवत हो नमन ॥ १ ॥
देव मायबाप राम । करी साष्टांग प्रणाम ॥ २ ॥
दोन पाय दोन कर । दोन जानु उर शीर ॥ ३ ॥
दृष्टि वचन नी मन । हेंचि साष्टांग वंदन ॥ ४ ॥
भावें वंदूं गुरुदेव । हाचि सेवक स्वभाव ॥ ५ ॥

## २१३. गुरुध्यानाची महता

सद्गुरूचें ध्यान ब्रह्ममात्र पूर्ण । विष्णु ब्रह्मेशान सेविताती ॥ १ ॥
सेविती सदैव सुर मुनि थोर । मनाचा व्यापार थंडावतो ॥ २ ॥
थंडावतो मी-तूं भाव परिपूर्ण । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ३ ॥

## २१४. ईश्वरस्वरूप सद्गुरूंच्या कृपेनें स्वानंद

भगवद्भाव सदा परिशुद्ध साचा । सहवास त्याचा आमोदा दे ॥ १ ॥
आमोद चंदन तरु सर्वांसी दे । संपूर्ण स्वानंद गुरुकृपा ॥ २ ॥

गुरुरूपें ब्रह्म अपरोक्ष साक्षात् । कल्याणचि साक्षात् स्वयंसिद्ध ॥ ३ ॥
स्वयंसिद्ध राम सर्वत्र भरला । सेवका भेटला जनीं वनीं ॥ ४ ॥

## २१५. गुरुकृपेनें कृतार्थता

गुरुकृपें पूर्ण इच्छिलें पावलों । होउनियां ठेलों ब्रह्मरूप ॥ १ ॥
ब्रह्मरूप सर्व पाहे कोंदाटलें । कर्तव्य सरलें क्रिया कर्म ॥ २ ॥
क्रिया कर्म योग ज्ञान जप तप । स्वधर्म स्वरूप स्वयंसिद्ध ॥ ३ ॥
स्वयंसिद्ध सर्वाभूतीं नारायण । अभिन्न कल्याण रामराय ॥ ४ ॥
रामराय माझे मज भेटलेसे । नित्य पाहतसे आत्मरूप ॥ ५ ॥
आत्मरूपीं बाह्याभ्यंतरीं सेवक । कल्याण व्यापक सर्वातीत ॥ ६ ॥

## २१६. सद्गुरुकृपेनें ब्रह्मानंद

सद्गुरुकृपेनें ब्रह्मानंद सोपा । ताप पाप खेपा मावळल्या ॥ १ ॥
मावळल्या जन्म मृत्यु परंपरा । भेट परात्परा निरवधी ॥ २ ॥
निरवधी नित्य शुद्ध बुद्ध मुक्त । स्वभावसंयुक्त पूर्ण केलें ॥ ३ ॥
केलें पूर्ण ब्रह्म स्वात्मपददानें । सेवका कल्याणें दीनानाथें ॥ ४ ॥

# पाकळी १०. नाम (अभंग २१७ ते २६०)

## २१७. नामें मोक्ष जोडे

हरि नाम हरी सर्व पाप दूरी । आत्मसाक्षात्कारी रामनाम ॥ १ ॥
रामनाम ब्रह्म पापपुण्य सारी । भावभक्ति तारी सर्व जनां ॥ २ ॥
सर्वजनां सोपें सुलभ साधन । सेवक कल्याण रामनामें ॥ ३ ॥

## २१८. नामच सुलभ साधन

नको योग याग देह कष्टविणें । नको तीर्थाटणें अनुष्ठानें ॥ १ ॥
कलियुगीं नामसंकीर्तन श्रेष्ठ । नाहीं नाहीं कष्ट साधनाचे ॥ २ ॥

सर्वांसी सुलभ नामचि साचार । पापराशी पार नष्ट होती ॥ ३ ॥
मुखीं नाम हातीं वाजतसे टाळी । मनीं वनमाळी ध्यान सदा ॥४॥
रामकृष्ण हरि गोविंद मुरारी । वाचें निरंतरीं सेवकाच्या ॥५ ॥

## २१९. नाम हें सोपें साधन

नाम घ्यारे राघोबाचें । फेरे चुके चोर्‍यांशीचे ॥ १ ॥
नाहीं दंडण देहासी । खर्च नको वा नामासी ॥ २॥
सोपें सुगम साधन । सर्व अधिकारी जन ॥ ३ ॥
जड मूढ सान थोर । सर्वा नामाचा आधार ॥ ४ ॥
उफराट्या नामासाठीं । तरला तो उद्याउठीं ॥ ५ ॥
ऋषीवर्य झाला जाणां । रचीं मुख्य रामायणा ॥ ६ ॥
अहोरात्र राम राम । स्मरे सेवक निष्काम ॥ ७ ॥

## २२०. नामापरतें साधन नाहीं

ज्ञान-सूर्य तेज रामकृष्ण नामें । योग याग कर्में नोहे मुक्ती ॥ १ ॥
नोहे मुक्ति नाना साधन कचाटें । रामनाम नेटें भक्त गाती ॥ २ ॥
गाती भक्त ज्ञानदेव एकनाथ । तुकाराम संत रामकृष्ण ॥ ३ ॥
रामकृष्ण नामें उन्मनी स्वानंद । भक्ता नामछंद सर्वकाळ ॥ ४ ॥
सर्वकाळ सर्व राममय पाहे । सेवकासी लाहे परमानंद ॥ ५ ॥

## २२१. सर्व साधनांत नामस्मरण श्रेष्ठ

योग याग भोग कर्म सोडावेना । रामनाम मनामाजीं वसो ॥ १ ॥
इंद्रिया कोंडावें विषया सोडावें । न लगे घ्या भावें रामनाम ॥ २ ॥
अज्ञानी स्त्री बाल ज्ञानी वृद्ध सर्वां । रामनाम मेवा सुलभचि ॥ ३ ॥
जाती कुल गोत्र सोवळें ओवळें । जपा हें आगळें रामनाम ॥ ४ ॥
शक्ति युक्ति भुक्ति भक्ति मुक्ति प्राप्ती । रामनाम प्रीतीं सर्व लाभे ॥ ५ ॥

विवेक वैराग्य ज्ञानाचा वाजार । नको थ्या साचार रामनाम ॥ ६ ॥
शंकर वाल्मीक मारुती सेवक । रामनाम एक हृदयीं हो ॥ ७ ॥

## २२२. नामाविण साधन नाहीं

नामाचा महिमा जाणती न योगी । जे कां भवरोगी नामावीण ॥ १ ॥
नामाविण तरे कोण कलियुगीं । वेदशास्त्र उगी राहताती ॥ २ ॥
राहताती सिद्ध तत्पर नामाशीं । मारुती शिवासी नामवेड ॥ ३ ॥
नामवेड राम प्रल्हाद नारदा । संसार आपदा नाहीं नाहीं ॥ ४ ॥
नाहीं नाहीं कष्ट कर्म उठाठेव । नामें भवभेव दूर सरे ॥ ५ ॥
दूर सरे जन्म मृत्यु भवभ्रम । मुखीं रामनाम सदोदित ॥ ६ ॥
सदोदित वाचें रामनाम भावें । सेवक स्वभावें नित्य गाय ॥ ७ ॥

## २२३. नामस्मरण हीच भक्ति

स्नान संध्या पूजा भक्ति भाव प्रेम । मुखीं मनीं रामनाम सदा ॥ १ ॥
सदा नाम रामकृष्ण हरि ब्रह्म । सच्चित्सुखधाम उपासना ॥ २ ॥
उपासना कर्म विधियुक्त सांग । राम पांडुरंग भावें भजा ॥ ३ ॥
भजा भावें रामनाम जातां येतां । सगुण तत्त्वतां पूर्ण ब्रह्म ॥ ४ ॥
ब्रह्म पूर्ण राम अणुरेणू जन । सेवक कल्याण सच्चिन्मय ॥ ५ ॥

## २२४. रामनामानें प्रपंच परमार्थ दोन्ही साधतात

एकरूप स्वार्थ परमार्थ पूर्ण । रामनामीं मन रत ज्याचें ॥ १ ॥
रतला श्रीरामीं प्रपंच साधला । जगीं धन्य झाला वंद्य सर्वां ॥ २ ॥
सर्वां वंद्य पूज्य श्रीराम नामेंचि । अपवाद येचि जनतेचे ॥ ३ ॥
जनता अज्ञान नेणे परमार्थ । प्रपंच यथार्थ साधेनाचि ॥ ४ ॥
साधे परमार्थ प्रपंच लौकिका । चाड भीड देखा मायीक न ॥ ५ ॥
मायीक म्हणोनि भीड चाड गेली । सेवका पावली राममय ॥ ६ ॥

## २२५. नाम–सार

साराचेंही सार नाम राघोबाचें । सर्व साधनाचें काम सरे ॥ १ ॥
काम सरे नाम राम वाचें घेतां । मोक्ष हा तत्त्वतां नामें पूर्ण ॥ २ ॥
नामें पूर्ण वेद शास्त्रें नी पुराणें । व्रत पारायणें नामें पूर्ण ॥ ३ ॥
नामें पूर्ण ब्रह्म श्रीराम माउली । सेवक साउली रामकृपा ॥ ४ ॥

## २२६. नाम–माहात्म्य

रामकृष्ण हरि वाचें । नाम घ्यारे विठोबाचें ॥ १ ॥
नित्य नेम प्रातःकाळीं । नाम गावें सर्व काळीं ॥ २ ॥
नामें सर्व दोष जाती । जोडतसे रमापती ॥ ३ ॥
नामें तरले बहूत । नाम श्रेष्ठ साधनांत ॥ ४ ॥
सेवकासी नाम गोड । गुरुकृपें पुरे कोड ॥ ५ ॥

## २२७. नाम–माहात्म्य

नामाचें माहात्म्य अगाध अपार । मुक्ति जोडे चार क्षणभरें ॥ १ ॥
क्षणभर नाम उच्चारितां हरि । जिव्हे वेग करी नित्यनेमें ॥ २ ॥
नित्यनेमें सर्वे अखंड आवडी । रामकृष्ण जोडी सहजचि ॥ ३ ॥
सहज सुलभ सुगम साधन । सेवक कल्याण रामनामें ॥ ४ ॥

## २२८. नामस्मरणाचें माहात्म्य

धन्य तो संसारीं रामनाम वदे । नामानंद छंदें रंगतसे ॥ १ ॥
रंग पांडुरंग श्रीरंग बजरंग । रामकृष्णयोग सुखदुःखीं ॥ २ ॥
सुखदुःख-भान रामनामीं नसे । आनंद विलसे सर्वकाळ ॥ ३ ॥
सर्वकाळ ध्याहो श्रीराम नामाचा । सेवक हो साचा रामीं लीन ॥ ४ ॥

## २२९. नामाची महती

विश्वदुःख नष्ट होतें । रामनाम मुखीं येतें ॥ १ ॥
जावें वैकुंठ कैलासा । बहु साधनें सायासा ॥ २ ॥

नामें विष्णु शिव येय। वसे भक्त हृद्यांत ॥ ३ ॥
रामकृष्ण हरि विष्णु। नाम काम - क्रोध - जिष्णु ॥ ४ ॥
रामकृष्ण हरि नाम। सेवकासी सुखधाम ॥ ५ ॥

## २३०. हरिनामच परब्रह्म

मुक्ति मोक्ष शांति कैवल्य निर्वाण। स्वातंत्र्य कल्याण अद्वयता ॥ १ ॥
अद्वयता ब्रह्मभूत निःसंगता। परमानंदता ग्रंथीभेद ॥ २ ॥
ग्रंथिभेद दुःखनाश आत्यंतिक। सायुज्यता देख स्वस्वरूप ॥ ३ ॥
स्वस्वरूप स्वयं स्वेन स्वानुभूत। स्वसंवेद्यवृत्त परब्रह्म ॥ ४ ॥
परब्रह्म राम कृष्ण हरि नाम। सेवक स्वधाम एकमेव ॥ ५ ॥

## २३१. नामानें ज्ञान, ज्ञानानें कैवल्य

सूर्याचे प्रकाशें अंधकार नाश। अज्ञानाचा नाश ज्ञानें होय ॥ १ ॥
ज्ञानें होय मोक्ष रामनामें कैसा। रज्जु सर्प भासा जपतप ॥ २ ॥
जपतप मंत्रें वाजंत्री गजरें। सर्प काय सरे अणुमात्र ॥ ३ ॥
अणुमात्र स्पर्श प्रकाश येतांचि। तुरे सहजचि मावळतो ॥ ४ ॥
मावळे अज्ञान तम अंधकार। ज्ञानसूर्यकर प्रभावेंचि ॥ ५ ॥
प्रभाव नामाचा ब्रह्म परिपूर्ण। सेवक कल्याण रामनामें ॥ ६ ॥

## २३२. वेदांतहि नामच सांगितलें आहे

मनामहे चारु देवस्य नाम। वंदमानो नाम भुरि दधाति ॥ १ ॥
नमस्यानि वंद्या नामानि सदैव। नामहि उपास्य, नाम ब्रह्म ॥ २ ॥
ऋग्वेदादि सांगे नामेंचि निर्वाण। सेवक कल्याण रामनामें ॥ ३ ॥

## २३३. वेद अनंत बोलिला – सार नाम

वेद श्रुति स्मृति शास्त्रादि पुराणें। भाष्यें सूत्रें काव्यें गाती रामा ॥ १ ॥
गाती रामनाम संस्कृत प्राकृत। ग्रंथकार संत स्वानुभवें ॥ २ ॥

स्वानुभवें आद्य शंकराचार्यांनीं । गोविंदभजनीं लावियेलें ॥ ३ ॥
लावियले जन नामसंकीर्तनीं । श्रीहरी भजनीं राम ब्रह्म ॥ ४ ॥
राम कृष्ण हरि अच्युत केशव । श्रीधर माधव नारायण ॥ ५ ॥
नारायण राम जानकीजीवन । सेवक कल्याण रामनामें ॥ ६ ॥

## २३४. वेदादि सर्व ग्रंथांत नाम साधन

वेदामध्यें स्पष्ट नामस्मरणाचा । उल्लेख हा साचा नाना ठायीं ॥ १ ॥
नाना ठायीं गीता भक्तियोग सांगे । पुराणीं उमगे रामनाम ॥ २ ॥
रामनाम गावें निजनिष्ठे भावें । शरण रिघावें सद्गुरुसी ॥ ३ ॥
सद्गुरुरूपेनें पूर्ण समाधान । सेवक कल्याण रामनामें ॥ ४ ॥

## २३५. अठरा पुराणांच्या पोटीं । नामाविण नाहीं गोष्टी ॥

चार वेद सहा शास्त्रें स्मृति गाती । अठरा वर्णिती रामनाम ॥ १ ॥
रामनाम कीर्ति ब्रह्म मोक्ष प्राप्ति । नामेंचि सद्गती सर्वजनां ॥ २ ॥
सर्वजनां सोपें सुगम साधन । रामनाम जाण परीपूर्ण ॥ ३ ॥
परिपूर्ण ब्रह्म रामनाम घेतां । सेवक तत्त्वतां रामरूपा ॥ ४ ॥

## २३६. सर्वत्र नामाचीच प्रशस्ती

श्रीहरि हरण दुःखाचें करिती । हरिः ॐ म्हणती वेदारंभीं ॥ १ ॥
वेदारंभीं हरि ब्रह्म परिपूर्ण । हरे रामकृष्ण नाम शुद्ध ॥ २ ॥
नाम घे नारद नारायण सदा । माधव गोविंदा गात असे ॥ ३ ॥
गात असे रामकृष्ण हरि वाचें । सर्व पंढरीचे वारकरी ॥ ४ ॥
वारकरी नाम भवरोग नाश । सुख अहर्निश रामनामें ॥ ५ ॥
रामनामें रामकृपा परिपूर्ण । सेवक कल्याण हरि म्हणे ॥ ६ ॥

## २३७. नामानें पूर्ण समाधान

सुख प्राप्ति, दुःख निवृत्ति उपाय । अलौकिक सोय सांगे वेद ॥ १ ॥
वेद अगोचर धर्म ब्रह्म सांगे । म्हणोनियां उगे सर्व मानी ॥ २ ॥
सर्व मानी राम वेद श्रुति स्मृति । पुराण विभूति राम ब्रह्म ॥ ३ ॥
राम ब्रह्म राम नाम पूर्ण घोष । आगम विशेष रामनाम ॥ ४ ॥
रामनामें राम पूर्ण समाधान । सेवक कल्याण रामरूपें ॥ ५ ॥

## २३८. सर्व संत नामानेंच उद्धरिले

ज्ञानेश्वर नामदेव एकनाथ । तुकाराम संत रामदास ॥ १ ॥
रामदास राम नाम गाती सदा । करी कामधंदा मुखीं राम ॥ २ ॥
मुखीं नाम जनी मिरा मुक्ताबाई । चोखा गोरा घेई रामनाम ॥ ३ ॥
रामकृष्ण हरि संत मुखांतरीं । हृदयमंदिरीं रामब्रह्म ॥ ४ ॥
ब्रह्म रामनाम पूर्ण समाधान । सेवक कल्याण रामनामें ॥ ५ ॥

## २३९. नामस्मरणावरील आक्षेप खोटे

रामस्मरण नोहे वेदोक्त साधन । वैदिक विद्वान म्हणताती ॥ १ ॥
म्हणती पंडित शास्त्री सर्वजन । स्त्री शूद्रां साधन नामस्मरण ॥ २ ॥
नामस्मरण पूर्ण वेदोक्त साधन । सेवक कल्याण रामनामें ॥ ३ ॥

## २४०. नामस्मरणानें अलभ्य लाभ

वदारे सदैव श्रीराम जयराम । जय जय रामकृष्ण हरि ॥ १ ॥
रामकृष्ण हरि वदे जो वैखरी । ताप पाप दूरी पळतसे ॥ २ ॥
पळे माया मोह नाम घोषें पूर्ण । नामचि संपूर्ण परब्रह्म ॥ ३ ॥
परब्रह्म नाम रामकृष्ण हरि । सेवक उद्धरी हेळामात्रें ॥ ४ ॥

## २४१. वासनाक्षय कसा होईल ?

आजवरी कोणा कामाचा न अंत । पुढें तरी प्राप्त कैसा होय ॥ १ ॥
कैसा होय काम संकल्पमूलक । संकल्पनाशक यत्न करी ॥ २ ॥
यत्न करी नर सुखाच्या कारणें । परि काम गुणें दुःख होय ॥ ३ ॥
दुःख होय ऐसी कामना कासया । समूल नाशाया धैर्य धरी ॥ ४ ॥
धैर्य धरी रामनामाच्या आधारें । कल्याण हो खरें सेवकाचें ॥ ५ ॥

## २४२. नामानें पापनाश

प्रायश्चित्त काय करी । जेथें उभा नामें हरि ॥ १ ॥
नामें पापाचें विढार । मुळासह होय चूर ॥ २ ॥
यमलोक खुंटलासे । मुखीं नाम सदा वसे ॥ ३ ॥
तीर्थें ओस पडलींसे । नामें राम जोडलासे ॥ ४ ॥
नामें दुःख नाश पूर्ण । सदा सेवका कल्याण ॥ ५ ॥

## २४३. नामस्मरणानें कामाचा नाश

ज्याचे मुखीं रामनाम । न च बाधे त्यासी काम ॥ १ ॥
कोणी देखिता कामिनी । सीतेसमान ती मानी ॥ २ ॥
नेत्रीं न च पाहे स्त्रीतें । मनीं नाणी लावण्यातें ॥ ३ ॥
रामरूप देखतसे । लागलेसें रामापिसें ॥ ४ ॥
रामेविण कांहीं नाहीं । भुलूं नको मिथ्या कांहीं ॥ ५ ॥
राम राम गर्जो वाणी । मनीं रामरूप आणी ॥ ६ ॥
सेवकाचें गुंतलेसें । रामपदीं मन खासें ॥ ७ ॥

## २४४. रामनामानें अहंकार नाश

सेवा अगम्य योग्यासी । केंवी साधे इतरासी ॥ १ ॥
सेवा रामाची जो करी । त्यासी खास मुक्ति वरी ॥ ध्रु० ॥
सेवेलागीं बुद्धी आडे । अहंकार येतो पुढें ॥ २ ॥

रामनामें टाहो फोडी । अहंकार त्राण सोडी ॥ ३ ॥
मुखीं राम ध्यानीं मूर्ति । गात सदा रामकीर्ति ॥ ४ ॥
त्याचा अहंकार गळे । राम देखताचि डोळें ॥ ५ ॥
सेवकासी राम जोडे । दिसतसे चाहोकडे ॥ ६ ॥

## २४५. नामानें दुःखनाश

चिंताग्रस्त कां बसला । कोण संकटीं पडला ॥ १ ॥
काय आपत्ती पातली । कदा दुष्ट धाड आली ॥ २ ॥
दुःख जाय सुख होय । जरी भावें नाम गाय ॥ ३ ॥
दास म्हणे राम वदा । सेवकासी सौख्य सदा ॥ ४ ॥

## २४६. पावन नामानें सुख

नामदेव एकनाथ । तुकाराम नाम संत ॥ १ ॥
रामनाम गाती सदा । नामसंकीर्तन धंदा ॥ २ ॥
गातां श्रीराम महिमा । मन चढे सुखधामा ॥ ३ ॥
कंटाळाचि नये कदा । नाचे गात नाम मोदा ॥ ४ ॥
वक्ता श्रोता पूत जाण । राम सेवका कल्याण ॥ ५ ॥

## २४७. मुखीं नामानें पापनाश, ईशप्राप्ति

सर्वां तारी राम तूंचि मायबाप । उरे नेदी पाप कृपादृष्टीं ॥ १ ॥
कृपादृष्टीं पाही ज्याचे मुखीं राम । नच बाधे काम क्रोध वैरी ॥ २ ॥
वैरी सहा गेले राम घरां आले । हृदयीं पूजिलें सर्व भावें ॥ ३ ॥
सर्व भावें राम हृदीं स्थिरावला । सेवक पावला स्वात्मानंद ॥ ४ ॥

## २४८. प्रेमयुक्त नामस्मरणानें राम कृपेनें दर्शन देईल

दर्शनाची आस पुरविल राम । चिंतेचें न काम कांहीं एक ॥ १ ॥
कांहीं एक धांवा मनामाजि चाले । तेणें लडिवाळें राममाय ॥ २ ॥
राममाय बोधग्रास भरवील । संशय वारील अंतरींचा ॥ ३ ॥

अंतरींची ज्योत सदा पाजळावी । काजळी झाडावी रामनामें ॥ ४ ॥
रामनाम सोपें सदा घेत जावें । आनंदा लुटावें अहर्निश ॥ ५ ॥
अहर्निश राम हृदीं करी वास ॥ वाउगे सायास कासयासी ॥ ६ ॥
कासयासी चिंता रामनाम घेतां । सेवक तत्त्वतां कल्याणचि ॥ ७ ॥

## २४९. रामनामानें रामकृपा

परम पवित्र रामनाम ब्रह्म । स्वात्मानंद धाम भववैरी ॥ १ ॥
भवभय वैरी संसार-सांकडीं । प्रपंचाची वेडी तोडी राम ॥ २ ॥
राम तोडी बंध विबुध देवाचे । रामनाम वाचे सदा वसो ॥ ३ ॥
वसो रामनामीं प्रेम परिपूर्ण । सेवक कल्याण रामनामें ॥ ४ ॥

## २५०. नामानें ईशकृपा व साक्षात्कार

गीता शिकवण ईश साक्षात्कार । प्रत्यक्ष साचार अनुभव ॥ १ ॥
अनुभव पूर्ण स्वानंद स्वरूप । पदरीं घे माप ईशकृपें ॥ २ ॥
ईशकृपा सोपी नामें भक्तिभावें । जोडिजे स्वभावें स्वात्मधाम ॥ ३ ॥
स्वात्मधाम गीता साक्षादपरोक्ष । येतसे प्रत्यक्ष स्वानुभव ॥ ४ ॥
स्वानुभव स्वतां आपणाआपण । सेवक कल्याण स्वयंसिद्ध ॥ ५ ॥

## २५१. नामघोषानें रामदर्शन

नित्य रामनामें टाहो मी फोडितों । चरण दावितो सीताराम ॥ १ ॥
सीताराम नील मेघ घनश्याम । स्वरूप विराम संतवृंदा ॥ २ ॥
संतवृंद सदा सादर स्वरूपीं । आत्माराम रूपीं नित्यानंद ॥ ३ ॥
नित्यानंद राम योगी ज्ञानी धाम । भक्त निजवर्म रामराम ॥ ४ ॥
रामराम ध्यानीं मनी मुखीं पूर्ण । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ५ ॥

## २५२. रामनामानें विदेहावस्था

देहभान हरपलें । रामीं मन हें गुंतलें ॥ १ ॥
राम गातां सुख साचें । फेरे चुके चौर्यांशीचे ॥ २ ॥

मुखीं नाम हातीं टाळी । नित्य गात श्रीद्रावळी ॥ ३ ॥
नाचे डोले एकतानें । अर्पी तनु मन धनें ॥ ४ ॥
उन्मनीचा प्रांत खास । सेवें जोडे सेवकास ॥ ५ ॥

## २५३. रामनामानें मोक्ष जोडतो

नाम हेंचि शस्त्र षड्रिपु जिंकाया । मुख्यार्था साधाया मार्ग सोपा ॥ १ ॥
श्रुति स्मृति सर्व पुराणें गर्जती । आळवा श्रीपती एकाभावें ॥ २ ॥
एकाभावें गावें केशव वामन । राम नारायण पांडुरंग ॥ ३ ॥
नित्य शुद्ध बुद्ध मुक्त स्वभावाचा । विटेवरी साचा शांत उभा ॥ ४ ॥
उभा सर्व काळ भक्त रक्षण्यासी । व्यक्त अव्यक्तासी होणें लागे ॥ ५ ॥
स्वामीनें सेवका दावियेली वाट । मोक्ष हा चोखट नामें जोडे ॥ ६ ॥

## २५४. नामानें मोक्ष

रामनामें टाहो फोडी । जन्म मृत्यु न सांकडीं ॥ १ ॥
देहाध्यासें जन्ममृत्यु । रामध्यासें नसे किंतु ॥ २ ॥
वासनेच्या संगें जन्म । रामीं नसे पुनर्जन्म ॥ ३ ॥
जन्ममृत्यातीत मोक्ष । साधुसंत पहा साक्ष ॥ ४ ॥
नाम गाती संत थोर । तेंचि सेवका आधार ॥ ५ ॥

## २५५. रामनामानें भुक्ति, मुक्ति

लौकिकाकारितां नव्हे रामनाम । सच्चित्सुखधाम लाधलों मी ॥ १ ॥
लाधलीसे गोडी अवीट विटेना । राम नारायणा सेवितसे ॥ २ ॥
सेवितसे रामा सदा ध्यानीं मनीं । रूप न्यहाळुनि कल्याणचि ॥ ३ ॥
कल्याण लाभलें एका रामनामें । जाणोनियां वर्मे वेदशास्त्र ॥ ४ ॥
वेदशास्त्र उगे आत्मारामापुढें । मुक्ति भुक्ति जोडे रामनामें ॥ ५ ॥
रामनाम नेमें कल्याण चांगलें । भाग्य हें लाभलें सेवकाला ॥ ६ ॥

## २५६. रामनामानें कामधंदाकरितांहि रामसाक्षात्कार

संसारीं असोनी रामनाम सदा। मुखें कामधंदा करितांहि ॥ १ ॥
करितांहि सर्व प्रापंचिक कार्य। रामनाम सोय सर्वकाळ ॥ २ ॥
सर्वकाळ सर्वावस्था रामनाम। हरि सर्व काम वारितसे ॥ ३ ॥
वारितसे काम क्रोधाचें बिढार। रामचि साचार मागेंपुढें ॥ ४ ॥
मागेंपुढें राम अंतरीं बाहेरीं। सर्व चराचरीं जगीं नगीं ॥ ५ ॥
जगीं नगीं अणुरेणू राम पूर्ण। सेवक कल्याण रामरुपें ॥ ६ ॥

## २५७. नामापुढे इतर साधनें बापुडीं

परमपुण्यप्रद रामनाम एक। साधनें अनेक व्यर्थ होय ॥ १ ॥
व्यर्थ होय सारें यज्ञयाग दान। कर्माकर्म ज्ञान नामापुढें ॥ २ ॥
नामापुढें काय बापुडीं साधनें। भक्तिभावें वीण क्षीण मात्र ॥ ३ ॥
क्षीण मान सोडा रामनाम जोडा। मायाबंड मोडा रामप्रेमें ॥ ४ ॥
रामप्रेमें रामनाम ब्रह्मानंद। सेवक स्वानंद रामब्रह्म ॥ ५ ॥

## २५८. रामनामच ब्रह्म

रामनाम पुण्य परमपवित्र। अरच परब्र क्षय नाहीं ॥ १ ॥
क्षय नाहीं भोगें हेंचि ब्रह्म पुण्य। येरतें अपुण्य गतिरूप ॥ २ ॥
गतिरूप येजा नाहीं रामरूपा। मिळणी स्वरूपा रामरुपें ॥ ३ ॥
रामरुपें राम नाम ब्रह्म पूर्ण। सेवक कल्याण रामरुपें ॥ ४ ॥

## २५९. रामनामाविण पुण्य तेंचि पाप

भावभक्तिवीण पुण्य तेंचि पाप। जन्म मृत्यु खेप न चुकेचि ॥ १ ॥
चुकेनाचि दुःख यातना कठीण। निर्वाण कारण रामनाम ॥ २ ॥
रामनाम मुखीं सदा सर्व काळ। अंतरीं निर्मळ रामरूप ॥ ३ ॥
रामरूप मन जग नग पूर्ण। सेवक कल्याण रामरुपें ॥ ४ ॥

## २६०. नामांत नामीचें सामर्थ्य

पापातें संहारी सकळ श्रीहरि । आत्मसाक्षात्कारी रामनाम ॥ १ ॥
रामा काय वानूं नामरूपातीत । मायेचा हा प्रांत अलीकडे ॥ २ ॥
अलीकडे राम पलीकडे राम । मध्येंहि श्रीराम एकीएक ॥ ३ ॥
एकीएक राम सर्वंच संपूर्ण । सेवक कल्याण राम ब्रह्म ॥ ४ ॥

# पाकळी ११. सत्संग (अभंग २६१ ते २६९)

## २६१. सत्संगाची आवश्यकता

संत संगावीण नाम नये मुखीं । साधनें विमुखीं नानाविध ॥ १ ॥
नानाविध कष्ट साधिता साधनें । संसार साधणें कांतेवीण ॥ २ ॥
कांतेवीण सर्व संसार निर्फळ । मानव निर्मळ संतसगें ॥ ३ ॥
संतसगें शुद्ध मन बुद्धि होय । संसाराचें जाय भानमात्र ॥ ४ ॥
भानमात्र सदा रामकृष्णहरि । सेवक उद्धरी रामनाम ॥ ५ ॥

## २६२. सत्संगाचे लाभ

सतसंगें जोडे हरि । मिथ्या माया पळे दूरी ॥ १ ॥
घडे इंद्रियदमन । आणि षड्रिपुभजन ॥ २ ॥
फेडी ससार सांकडें । करी ब्रह्मचि रोकडें ॥ ३ ॥
सदा श्रवण मनन । निदिध्यासन साधन ॥ ४ ॥
शांति दांति समाधान । सेवकाचें मनोन्मन ॥ ५ ॥

## २६३. संतलक्षण

ज्ञान ध्यान मूळ सत साधुजन । त्रिपुटीविहीन ब्रह्म पूर्ण ॥ १ ॥
पूर्ण ब्रह्म राम सर्वगत सम । आगम निगम विपम न ॥ २ ॥

विषम विषय माया मोह मिथ्या । नित्य मुक्त सत्या लांचावलें ॥ ३ ॥
लाचावलें मन स्वात्मानंद धामा । सेवक श्रीरामा पदीं लीन ॥ ४ ॥

## २६४. संतसमागमानें देव जोडतो

संतपायीं दृढ धरितां विश्वास । नाहीं कीं सायास सांडी मांडी ॥१॥
सांडी मांडी नाहीं साधन वळसे । साधुकृपा वसे नित्यकाळ ॥ २ ॥
नित्यकाळ रामकृपा रामनामें । संत समागमें लाभ झाला ॥ ३ ॥
झाला लाभ राम जनीं वनीं पूर्ण । सेवक कल्याण राम ब्रह्म ॥ ४ ॥

## २६५. संतांचें महिमान अगाध

साधु महिमान न कळे कोणासी । त्रिविध काळासी जाणतील ॥ १ ॥
जाणतीं विषयज्ञान अपरंपार । साधु निर्विकार ब्रह्ममूर्ति ॥ २ ॥
ब्रह्ममूर्ति साच साधुसंत पूर्ण । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ३ ॥

## २६६. संतदर्शनाचा महिमा

साधुच्या दर्शनें भवबंध तुटे । स्वात्मानंद भेटे राममय ॥ १ ॥
राममय संत सच्चित्सुखघन । करिती वंदन तीर्थें सारीं ॥ २ ॥
सारीं तीर्थें शुद्ध संतसमागमें । आगम दुर्गमें शास्त्र कळे ॥ ३ ॥
कळे शास्त्र शुद्ध संतांचें हृदय । सद्गुरु सदय पूर्ण ब्रह्म ॥ ४ ॥
ब्रह्म पूर्ण राम गुरु साधुसंत । सेवक प्रतीत कल्याण हो ॥ ५ ॥

## २६७. संतभेट दुर्लभ

सिंधु तरवेल रवि धरवेल । नभ गवसेल हेळामात्रें ॥ १ ॥
हेळामात्रें साधु भेट न होईल । ब्रह्मिष्ठ साधेल रामब्रह्म ॥ २ ॥
ब्रह्म राम संत त्रिपुटीरहित । भेटतां निश्चित बंध तुटे ॥ ३ ॥
तुटे बंध भव, जीव-शिव ऐक्य । आनंद अतर्क्य वर्णवेना ॥ ४ ॥
वर्णवेना स्वात्मानंद स्वानुभव । सेवक स्वभाव कल्याण हो ॥ ५ ॥

## २६८. ब्रह्मस्वरूप संतांचें दर्शन दुर्लभ

ब्रह्म जाणे संत ब्रह्मचि होईजे । ऐसेनि भेटिजे ब्रह्मनिष्ठ ॥ १ ॥
ब्रह्मनिष्ठ काय बाजारांत मिळे । माया ब्रह्म गिळे एकादाच ॥२॥
एकादा अनेक कोटिमध्यें पूर्ण । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ३ ॥

## २६९. रामकृपा असेल तरच संतभेट

वर्तमान भूत भविष्य कळेल । संताचा लागेल अंत काय ॥ १ ॥
अंत काय कळे ब्रह्मवस्तु संत । साधन अनंत करवेल ॥ २ ॥
करवेल यज्ञ याग जप तप । ध्यान योग रूप साधवेल ॥ ३ ॥
साधिती साधनें अनेकपरींचीं । परि भेट साची संत नोहे ॥४॥
नोहे संत भेट रामकृपेंवीण । सेवक कल्याण रामकृपें ॥ ५ ॥

# पाकळी १२. भक्ति (अभंग २७० ते ३०५)

## २७०. भक्तिमार्ग सर्व शास्त्रांनीं प्रतिपादित

पाहुनियां शास्त्रें एकचि निश्चय । झाला सांगूं काय रामनाम ॥ १ ॥
हरि एक सदा ध्यात गात जावा । हृदयीं केशवा साठवावें ॥ २ ॥
रूप मनोहर गुणा नाहीं पार । उभा विटेवर पांडुरंग ॥ ३ ॥
चंद्रभागे स्नान विठ्ठल दर्शन । सत्संग कीर्तन गुरुरूपें ॥ ४ ॥
वास पंढरीचा गजर नामाचा । सेवकासी साचा घडलासे ॥५॥

## २७१. रामभक्तीशिवाय वासनानाश नाहीं

सर्व कामनाचा अंत हो न कधीं । सदा इच्छा वृद्धि वाढतसे ॥ १ ॥
वाढतसे काम कामना सकल्प । निवृत्त हो अल्प कधीं काळीं ॥ २ ॥
कधीं काळीं मन शांत होय कैसें । रामकृष्ण पिसें लागे जरी ॥ ३ ॥
लागे जरी मन श्रीरामचरणीं । कामना विरोनी स्वयें जाय ॥ ४ ॥

स्वयें जाय काम क्रोध लोभ मद । श्रीराम स्वानंद कृपा करी ॥ ५ ॥
कृपा करी राम नामधारकासी । वासनेला फांशीं देत असे ॥ ६ ॥
देत असे राम स्वानंद साम्राज्य । सेवका सुराज्य रामनामें ॥ ७ ॥

## २७२. सगुण भक्तीविना वंचना

सदेहानें नेलें स्वरूप निर्गुण । ज्ञानानें सगुण ओस केलें ॥ १ ॥
ओस केलें दोन्हीकडे अभिमानें । सगुणा तोडणें बुद्धिबळें ॥ २ ॥
बुद्धिबळें वायां ब्रह्म गवसेना । अद्वैतें लाभेना समाधान ॥ ३ ॥
समाधान सोपें सगुण साधका । श्रीराम सेवका कल्याण हो ॥ ४ ॥

## २७३. भक्तीनेंच ईश्वरप्राप्ति

आंतरिक भक्तिभावानें देवाचें । दर्शन हो साचें भक्तिवंता ॥ १ ॥
भक्तिवंत नोहे देह पीडनेनें । कायिक तपानें दर्शन न ॥ २ ॥
दर्शन देवाचें आंतरिक भक्ता । इतरांचा लेखा नाहीं कांहीं ॥ ३ ॥
नाहीं कांहीं भक्तिभाव परिपूर्ण । देवाचें दर्शन तया कैसें ॥ ४ ॥
तया कैचें ज्ञान भक्ति भावाविण । सेवक कल्याण भक्तिभावें ॥ ५ ॥

## २७४. भक्तीनें खरें ज्ञान व मोक्ष

आत्मा पूर्ण एक सर्वत्र भरला । तेथें मी वेगळा अज्ञानचि ॥ १ ॥
अज्ञाननाशक ज्ञानचि केवळ । ज्ञानियासी खूळ अभिमान ॥ २ ॥
अभिमानयुक्त ज्ञान व पांडित्य । कामा नये, सत्य रामनाम ॥ ३ ॥
रामनाम भक्तिभाव मुख्य ज्ञाना । कारण अज्ञाना नाशावया ॥ ४ ॥
नाशावया माया मोह महाजाल । भक्तिच केवल सर्वाधार ॥ ५ ॥
सर्वाधार सत्य रामकृपा पूर्ण । सेवक कल्याण रामनामें ॥ ६ ॥

## २७५. भक्तीविना मुक्ति नाहीं

भक्तिमाता कन्या मुक्ताबाई जाण । वाढवी आपण मातृप्रेम ॥ १ ॥
मातृप्रेम पूर्ण भक्ति सोडूनियां । मुक्ति काय वायां गवसते ॥ २ ॥

गवसत नाहीं गोडी गुळावीण । भाव धरा पूर्ण रामपायीं ॥ ३ ॥
रामपायीं भाव भक्तिप्रेम साधा । नाहक विवादा करूं नका ॥ ४ ॥
करूं नका खोडी श्रीरामरायाची । राम माता साची सेवकाची ॥ ५ ॥

## २७६. भक्तीविणें मुक्ति नाहीं

जल्पती साधन कचाटा कित्येक । मुक्ति चुके देख भक्तिवीण ॥ १ ॥
भक्तिभावेंवीण मोक्ष नये हातां । श्रीराम वदतां चारी मुक्ति ॥ २ ॥
चारी मुक्ति जोडे रामकृष्ण गातां । अद्वय तत्त्वतां स्वात्मानंद ॥ ३ ॥
स्वात्मानंद-स्वाद सायुज्य स्वरूप । सेवक अमूप कल्याण हो ॥ ४ ॥

## २७७. सकाम भजनानें फल, निष्कामानें राम

फलासक्त नर अभिलाषी फल । कर्मचि करील तैसें योग्य ॥ १ ॥
तैसें योग्य फल कर्माचें पावतो । निष्काम वरितो हरिकृपा ॥ २ ॥
हरिकृपा जोडा निष्काम भजनें । रामकृष्ण म्हणे अहर्निश ॥ ३ ॥
अहर्निश मन श्रीरामचरणीं । कल्याणाचा धनी सेवक हो ॥ ४ ॥

## २७८. भक्तिसाधनानें जन्माचें सार्थक

कांहीं करावें साधन । जेणें जोडे नारायण ॥ १ ॥
भावें धरा एक देव । न च उरे मिथ्या भव ॥ २ ॥
जप तप संतसंग । सारासार संगत्याग ॥ ३ ॥
कर्म उपासना ज्ञान । करा श्रवण मनन ॥ ४ ॥
निदिध्यासें साक्षात्कार । भेटतसे रमावर ॥ ५ ॥
होय जन्माचें सार्थक । राम तारितो सेवक ॥ ६ ॥

## २७९. रामभक्तीनें सर्वत्र रामदर्शन

रामीं मन रंगे रामचि होऊनी । अंतर्बाह्य मनीं रामरूप ॥ १ ॥
रामरूप चित्त तकाररहित । चैतन्य अमीत भरलेंसें ॥ २ ॥
भरलें स्वरूप अणुरेणूं राम । सेवक आराम आत्माराम ॥ ३ ॥

## २८०. भक्ति व ज्ञान एकच तें सोडल्यानें बंध

सर्वांभूतीं वासुदेव । हाचि पूर्ण भक्तिभाव ॥ १ ॥
पूर्ण भक्ति शुद्ध ज्ञान । विवेकादि पूर्ण जाण ॥ २ ॥
सांडुनियां ऐसी भक्ति । विषयासी सक्त होती ॥ ३ ॥
हेंचि अज्ञान मानवा । पडतसे बंध जीवा ॥ ४ ॥
स्मरतसे परब्रह्म । मनीं नये भवभ्रम ॥ ५ ॥
जेणे स्मरण विसर । जाणे राम ब्रह्म सार ॥ ६ ॥
अंतर्बाह्य हा सेवक । परमानंद पाहे देख ॥ ७ ॥

## २८१. रामभक्तीनें उद्धार

गुण गाई वाचें सदा राघोबाचे । रूप ध्याई साचें हातीं टाळी ॥ १ ॥
वाल्मीक तरला उफराट्या नामें । ह्रदीं वलभीमें सांठविला ॥ २ ॥
शिवध्यानीं राम रामध्यानीं शिव । नाहीं भेदभाव देवभक्ता ॥ ३ ॥
विभक्त नव्हे जो भक्तचि वानावा । सर्वत्र जाणावा रामराणा ॥ ४ ॥
'वासुदेवः सर्व' असे गीता सांगे । सेवका उमगे राम गावा ॥ ५ ॥

## २८२. रामभक्तीनेंच परागति

मंत्र तंत्र यंत्र योग याग विधी । सर्व ही उपाधी मायाजाळ ॥ १ ॥
मायाजाळ भवसिंधु तरावया । सत्य देवराया कर्णधार ॥ २ ॥
कर्णधार राम पाय घट्ट धरा । नेई पैलपारा सर्वत्रासी ॥ ३ ॥
सर्व त्रास चुके जन्ममरणाचा । पूर्णानंद साचा प्राप्त होय ॥ ४ ॥
प्राप्त होय नित्य साक्षादपरोक्ष । सेवक प्रत्यक्ष कल्याणचि ॥ ५ ॥

## २८३ माया टाकून रामाचे पाय धरावे

श्रीरामाचे धरी पाया । न च देह जाय वाया ॥ १ ॥
नको धन सुत जाया । फुका वाढवीती माया ॥ २ ॥
कोणी नव्हे कोणाचें ते । सर्व मतलबी होते ॥ ३ ॥

सत्य सनातन राम । जेथें नुरे मुळी काम ॥ ४ ॥
भेदाभेद नसे जेथें । तेथें सेवक हा गुंते ॥ ५ ॥

## २८४. अखंड अनुसंधानानें अखंड सुख

जाऊं नेदी क्षण पलार्धहि एक । ब्रह्ममय देख वृत्ति सदा ॥ १ ॥
सदा वृत्ति लीन श्रीरामचरणीं । राम कृपाघनी सांभाळितो ॥ २ ॥
सांभाळितो पाठी पोटीं सर्वकाळ । सच्चित्सुखमुळीं बुडवी तो ॥ ३ ॥
बुडवितो जग नग मी तूंपण । उगाचि आपण स्वयंसिद्ध ॥ ४ ॥
स्वयंसिद्ध आत्मा सेवक कल्याण ॥ निर्वाण निर्गुण नित्यमुक्त ॥ ५ ॥

## २८५. प्रेमभाव विरळाच दिसतो

प्रेम नये बोला नयेचि दावितां । नये ते लिहितां निश्चयेसी ॥ १ ॥
जैसा एक मुका शर्करा भक्षिता । गोडी न सांगतां स्वस्थ बैसे ॥ २ ॥
ऐसें प्रेम नाहीं सर्वत्र दिसत । पात्रीं प्रकाशत कोठें तरी ॥ ३ ॥
नाहीं त्याला गुण नाहीं हो कामना । होय वर्धमाना क्षणोक्षणीं ॥ ४ ॥
निरंतर प्रेम वाढतचि जाये । सूक्ष्मतर पाहे अनुभव ॥ ५ ॥
अनुभव पाहे श्रीराम प्रेमाचा । राम होय साचा आपणचि ॥ ६ ॥
रामभक्त एक नाममात्र भिन्न । भक्त तो अभिन्न खास पहा ॥ ७ ॥
सेवकें विशुद्ध रामीं प्रेम केलें । कधीं न तुटलें ऐसें आहे ॥ ८ ॥

## २८६. अखंड प्रेम

पूर्वजन्म कर्म फळे । गुरु पायीं चित्त मिळे ॥ १ ॥
सोडविता सुटेनाचि । रामनाम गोडी साची ॥ २ ॥
प्रेमतंतू अंतरींचा । तुटेनाचि श्रीरामाचा ॥ ३ ॥
दुःखें आढळती जरी । राम सोडेनाचि तरी ॥ ४ ॥
जनीं श्रीराम संपूर्ण । होय सेवक कल्याण ॥ ५ ॥

## २८७. अनन्यभक्ति

हृदयकमळीं श्रीराम विमल । चरणकमल संस्थापिलें ॥ १ ॥
सस्थापो सद्गुरु माऊली सोज्वळ । वाहिलें सकळ तनु मन ॥ २ ॥
तनु मन धन चिद्ळ चिगुण । अर्पिलें सगुण स्वात्मलिंगा ॥ ३ ॥
स्वात्मलिंग सच्चित्सुखघन धाम । सेवका विराम सीताराम ॥ ४ ॥

## २८८ अनन्यभक्ति

*दु खें होती वारवार । शीघ्र करी प्रतिकार ॥ १ ॥*
गुरुचरण विश्राम । पुण्य स्थान रामनाम ॥ २ ॥
तनु मन धन सर्व । रामपायीं जीव भाव ॥ ३ ॥
*मुखीं नाम मनीं ध्यान । राम सेवक कल्याण ॥ ४ ॥*

## २८९. अनन्यभाव

राम माता राम पिता । राम भ्राता राम भर्ता ॥ १ ॥
राम मित्र राम पुत्र । राम प्रेमास्पद पात्र ॥ २ ॥
राम नग राम जग । राम योग याग साग ॥ ३ ॥
राम कर्ता राम धर्ता । राम हर्ता राम दाता ॥ ४ ॥
राम सार मायापर । राम भक्ता देई वर ॥ ५ ॥
राम ज्ञान राम भक्ति । राम गुरु राम मुक्ति ॥ ६ ॥
राम सुख रामनामीं । राम सेवकाचा स्वामी ॥ ७ ॥

## २९०. शरणागतीविना साक्षात्कार नाहीं

शरणागतिवीण ऐक्य नोहे काहीं । जीवभाव होई पूर्ण नष्ट ॥ १ ॥
पूर्णपणें नष्ट जीवभाव झाला । तरीच लाधला साक्षात्कार ॥ २ ॥
साक्षात्कार देव भक्त एकरूप । स्वतन्त्र स्वरूप भक्त नाहीं ॥ ३ ॥
नाहीं भक्ता पाप पुण्य नीति धर्म । सर्व ईश कर्म स्वरूपचि ॥ ४ ॥
स्वरूप सेवक कल्याण यथार्थ । जीवभाव स्वार्थ नष्ट झाला ॥ ५ ॥

## २९१. एक कृपासागर रामालाच शरण जावें

जाऊं शरण कोणाला । रामावांचोनी अन्याला ॥ १ ॥
ब्रीद पतितपावन । कृपें उद्धरितो जन ॥ २ ॥
संकटीं घालितो उडी । भक्तकाज परवडी ॥ ३ ॥
अनन्य शरण तया । जावें सेवकें स्वामिया ॥ ४ ॥

## २९२. राम सखा केला त्याला परमानंद

राम ज्यानें केला आपुलासा सखा । नाहीं त्याच्या सुखा पार जगीं ॥ १ ॥
आनंद विज्ञान अमृत ब्रह्म तो । अचल भेटतो एकरूपीं ॥ २ ॥
सत्य ज्ञानानंत श्रुति बोलतसे । निरोपम असे आत्माराम ॥ ३ ॥
एकमेव ब्रह्म नेह नाना अस्ति । बहुविध श्रुति गाती रामा ॥ ४ ॥
भावाभावातीत राम सत्य एक । कल्याण सेवक धरी पद ॥ ५ ॥

## २९३. आत्मसमर्पण

समर्था मी तुझा लडिवाळ बाळ । नेई तळमळ सर्व लया ॥ १ ॥
सर्व लया नेसी अहंता ममता । देतसे तत्त्वतां नित्यानित्य ॥ २ ॥
विवेक करोनी आत्मनात्म थोर । प्रकृति संहार सारासारें ॥ ३ ॥
सारासार सदा शुद्ध विचारणा । देत गुरुराणा हेंचि दान ॥ ४ ॥
हेंचि दान देत विसर न तुझा । वाहिलासे माझा देह पायीं ॥ ५ ॥
देह पायीं वाहे स्वामीच्या सेवक । कल्याणचि एक करी राम ॥ ६ ॥

## २९४. आध्यात्मिक सीतास्वयंवर

कौसल्येचा बाळ राम परमात्मा । जनकाची आत्मा जानकी ही ॥ १ ॥
जानकी ही बाला आत्मशक्ति माया । स्वयंवरा या या भक्त ज्ञानी ॥ २ ॥
ज्ञानी भक्ति पत्नी श्रद्धा विवेकाची । शुद्धमति साची विरागाची ॥ ३ ॥
विराग वहीण तितिक्षा सुशांति । बोधपुत्र हातीं धरोनी या ॥ ४ ॥
धरोनियां राम चित्तांत प्रपूर्ण । सेवक कल्याण आत्माराम ॥ ५ ॥

## २९५. रामभक्तीनें सर्वत्र रामदर्शन

श्रीराम सेवका राम चोहोंकडे । दशदिशा जोडे राम एक ॥ १ ॥
राम एक नाम हरी सर्व चिंता । नाहींच तत्त्वतां गर्भवास ॥ २ ॥
गर्भवास घडे वासना संगानें । तीच हो अंगानें रामरूप ॥ ३ ॥
रामरूप ध्यानीं जनीं वनीं मनीं । अणुरेणू मानी सर्व ब्रह्म ॥ ४ ॥
सर्व ब्रह्म राम सेवक कल्याण । सच्चित्सुखघन सर्वांतरीं ॥ ५ ॥

## २९६. रामस्वरूप होणें हीच पराभक्ति

अद्वैतीं भजन भक्तिभाव नाहीं । म्हणतसे पाहीं विभक्तचि ॥ १ ॥
विभक्त न, भक्त ब्रह्मरूप पूर्ण । अद्वैतीं क्रिया न पराभक्ति ॥ २ ॥
पराभक्ति पूर्ण स्वरूप स्वभाव । अद्वैतानुभव साक्षाद् राम ॥ ३ ॥
राम साक्षात् परब्रह्म देवभक्त । नित्य शुद्ध मुक्त सेवक हो ॥ ४ ॥

## २९७. रामध्यानानें विदेहावस्था

सीताराम ध्यानीं जनीं वनीं मनीं । गेलों विसरूनी आपणासी ॥ १ ॥
आपणा विसरे भूक तहान सरे । निद्रा ही ओसरे ऐसें केलें ॥ २ ॥
ऐसें केलें एक सीताराम छंदें । ब्रह्मांड आनंदें कोंदलेसें ॥ ३ ॥
कोंदलें सकळ अणुरेणू पूर्ण । सेवक कल्याण रामरूपें ॥ ४ ॥

## २९८. भाव तेथें देव—आनंद

प्रेम प्रीति भाव भक्ति उपासना । सेवा निष्ठा मना श्रद्धापूर्ण ॥ १ ॥
पूर्ण श्रद्धे सुख स्वरूप आनंद । कल्याण अभेद आत्माराम ॥ २ ॥
आत्मारामीं मन संतुष्ट सर्वदा । प्रसन्न प्रमोदा पार नाहीं ॥ ३ ॥
पार नाहीं पर ब्रह्म परिपूर्ण । सेवक कल्याण वस्तुधर्म ॥ ४ ॥

## २९९. रामकृपेनें स्वानंद

स्वानंद – समुद्रा स्वानुभव दाटे । उसळती लाटेवर लाटा ॥ १ ॥
लाटा आटा पिटा घन गर्ज नाद । उन्मनी उन्माद स्वानंदाचा ॥ २ ॥
स्वानंदाचा धनी श्रीराम समर्थ । सेवक यथार्थ कल्याण हो ॥ ३ ॥

## ३००. आध्यात्मिक काशी

काया वाराणसी आत्मा विश्वनाथ । श्रीराम समर्थ वाचें सदा ॥ १ ॥
सदा वाचे राम उदारांचा राणा । ज्ञानगंगा आणा रामनाम ॥ २ ॥
रामनामें ओस यमलोक पडे । सदा प्रेम जडे रामरूपीं ॥ ३ ॥
रामरूपीं धाले साधुसंत सारे । आनंद हा भरे सेवकासी ॥ ४ ॥

## ३०१. आत्मप्रेमानें मायानाश

देहानें घडावें विहिताचरण । अद्वैतींच मन सदा रंगो ॥ १ ॥
रंगो मन माति एका आत्मप्रीति । तेणें भवभीति बंध तुटे ॥ २ ॥
तुटे मूळमाया राम नाम घेतां । कल्याण तत्त्वतां सेवकाचे ॥ ३ ॥

## ३०२. शिवो भूत्वा शिवं यजेत

रामाचें भजन रामचि करितो । देव भक्त होतो आपणचि ॥ १ ॥
आपण एकटा अभेद भजन । भेदाभेदहीन देवभक्त ॥ २ ॥
देव भक्तपण हरपलें पूर्ण । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३०३. ज्ञानोत्तर भक्तीच खरी

खरी भक्ति साक्षात्कारानंतरचि । उपजे साचचि जीवन्मुक्त ॥ १ ॥
जीवन्मुक्त भक्त ज्ञानी योगी पूर्ण । सर्वांचें कल्याण साधतसे ॥ २ ॥
साधतसे हित जन जनार्दन । जाणोनी संपूर्ण राम ब्रह्म ॥ ३ ॥
राम ब्रह्म नित्य सत्य ज्ञानानंत । यथार्थ वेदांत भक्त जाणे ॥ ४ ॥
भक्त जाणे अणुरेणू पूर्ण राम । रामकृष्ण नाम सदा वाचें ॥ ५ ॥
वाचे सदा भक्त मारोनी मरण । सेवक कल्याण रामभक्ति ॥ ६ ॥

## ३०४. ईश्वरभक्तीनें ईश्वरत्व

मन रामीं रंगें राम होय अंगें । रामनाम-गंगें स्नान करी ॥ १ ॥
करी स्नान शुद्ध मन होरे निर्मळ । श्रीराम सोज्ज्वळ स्वयंपूर्ण ॥ २ ॥
स्वयंपूर्ण सचित् चित्त हारपलें । विश्व मावळलें रामरूपीं ॥ ३ ॥

राम भक्ति कर्म भक्ति ज्ञानयोग। शांति मुक्ति भोग कल्याणचि ॥४॥
कल्याण श्रीराम सेवक-प्रपूर्ण। अणुरेणू पूर्ण ब्रह्म राम ॥ ५ ॥

## ३०५. भावभक्तीनें सायुज्यता

भाव भक्ति प्रीति सद्भक्त वांछिती। पुरवी श्रीपती मोक्षानंद ॥ १ ॥
मोक्षानंद रामनामें पूर्ण होय। ज्ञाता ज्ञान ज्ञेय हारपलें ॥ २ ॥
हारपलें मन मी-तूं पण रामीं। नामेंचि अनामीं मिठी पडे ॥ ३ ॥
पडे मिठी ब्रह्म जीव शिव ऐक्य। म्हणती सायुज्य जीवन्मुक्त ॥४॥
जीवन्मुक्त राम कृष्ण हरि नाम। वदे, लाभे धाम कल्याणचि ॥५॥
कल्याण केवल रामरूपें साच। रामनाम ध्याच सेवक हो ॥ ६ ॥

# पाकळी १३. कृपायाचन (अभंग ३०६ ते ३२२)

## ३०६. मनाची प्रबल चंचलता

काय करूं रामा मन आवरेना। करितें कल्पना नानापरी ॥ १ ॥
संकल्प विकल्प क्षणोक्षणीं येती। धांवतसे मति चोहोंकडे ॥ २ ॥
निश्चय घेतसे आंदोलनें फार। कृपेनें साचार स्थिर करी ॥ ३ ॥
साधनीं सेवका व्यासचि करावें। हृदयाचें मोडावें भानमात्र ॥ ४

## ३०७. देवा! पतितपावन हें ब्रीद खरें करा

दीन दयाघन करुणासागर। भक्त कृपाकर सीताराम ॥ १ ॥
पतितपावन दुष्ट निर्दाळण। सुजन पाळण रावणारी ॥ २ ॥
नरतनुधारी सुरसाह्यकारी। भवभय हारी धनुर्धारी ॥ ३ ॥
ज्ञानप्रकाशक षड्रिपुनाशक। स्वपददायक रघुवीर ॥४॥
बहु ब्रीदावळी श्रीरामरायाची। सेवक ही साची गात असे ॥५॥

## ३०८. देवा ! मला पतिताला तार !

कोण मी कोठील कैचा येथें आलों । मिथ्या कीं बुडालों मायाडोहीं ॥ १ ॥
विचार पूर्वीचा कधीं नाहीं केला । देहभावनेला दृढाविलें ॥ २ ॥
ऐसा हा करंटा पडिला वेगळा । तारावें दयाळा रामराया ॥ ३ ॥
दिनाचा दयाळू मनाचा मवाळू । स्नेहाळू कृपाळू रामचंद्र ॥ ४ ॥
पतितपावना पतितासी तारी । सेवकासी करीं धरी त्वरें ॥ ५ ॥

## ३०९. भेटीची तळमळ

येरे सीतारामा भेट दे सत्वरी । सदैव अंतरीं तळमळ ॥ १ ॥
तळमळे प्राण रामावीण सदा । नको रे आपदा द्वैतभाव ॥ २ ॥
द्वैतभाव कैचा श्रीरामाजवळीं । आनंद-कल्लोळीं सन्निधानीं ॥ ३ ॥
सन्निधानीं ब्रह्म राम सुखपूर्ण । करील वर्णन कोण कैचा ॥ ४ ॥
कोण कैचा वर्णे स्वानुभव साचा । श्रीराम सुखाचा अंकितचि ॥ ५ ॥
अंकितचि सीताराम परिपूर्ण । सेवक कल्याण राम ब्रह्म ॥ ६ ॥

## ३१०. भेटीची तळमळ

धांव सीताराम ! एकादशी आली । उन्मनी पातली भेट देगा ॥ १ ॥
भेट दे रामाई ! लडिवाळ बाळा । अंतरीं जिव्हाळा काय सांगूं ॥ २ ॥
काय सांगूं रामा शब्दचि थोकडे । दाखवी रोकडें स्वरूपचि ॥ ३ ॥
स्वरूपचि राम सगुण साजिरें । आनंदचि भरे सेवकासी ॥ ४ ॥

## ३११. तळमळ

भितोसी कोणासी सर्व तुझी सत्ता । रामा ! कां रे आतां दूर ठेवी ॥ १ ॥
दूर ठेवी मज कासया राघवा । पहा माझ्या भावा अंतरींच्या ॥ २ ॥
अंतरीचा सखा श्रीराम सर्वस्व । कोणाचें वर्चस्व कांहीं नाहीं ॥ ३ ॥
कांहीं नाहीं मज आधार श्रीराम । दावी पदपद्म रामराया ॥ ४ ॥
रामराया धरी करीं सेवकासी । रहा अहर्निशी सन्निधानीं ॥ ५ ॥

## ३१२. दर्शनाची उत्कंठा

येई येई रामा येई । दर्शन वा देई देई ॥ १ ॥
तुझी पाहातों मी वाट । श्रीरामा मजला भेट ॥ २ ॥
मिथ्या माया लया नेई । परब्रह्म पडो ठाई ॥ ३ ॥
सर्वा सर्वत्र भरला । राम कळो आला मला ॥ ४ ॥
रामापर कांहीं नाहीं । रामपायीं सर्व कांही ॥ ५ ॥
ध्येय ध्यान ध्याता राम । सेवकाचें सुखधाम ॥ ६ ॥

## ३१३. रामदर्शनाची उत्कंठा

जन्माचें देईन मोल ॥ एकदां श्रीरामा बोल ॥ ध्रु० ॥
श्रवणीं पडो श्रीराम । नयनीं देखो श्रीराम ॥ १ ॥
चरणें श्रीरामा जावें । हस्तें श्रीरामा पुजावें ॥ २ ॥
निर्माल्य घ्राणें जिघ्रावा । माथां चरणीं ठेवावा ॥ ३ ॥
मुखीं नाम हातीं टाळी । नाचो गात ग्रीदावळी ॥ ४ ॥
रघुराज धनुर्धारी । सेवकासी स्राच तारी ॥ ५ ॥

## ३१४. आवाहन

श्रीरामा ! येई येई । हृदयांत ठाण देई ॥ १ ॥
करी गुजगोष्टी नित्य । राम रुपावंत सत्य ॥ २ ॥
दुःख वार्ता सर्व जाई । सच्चित्सुख नित्य होई ॥ ३ ॥
सीताराम ध्यानीं मनीं । जनीं वनीं हो उन्मनी ॥ ४ ॥
हृदयींचा राम सखा । सेवकासी हो सारिखा ॥ ५ ॥

## ३१५. रामा ! दर्शन दे

करीं धरिलेसें धनु । दुष्ट संहारण तनु ॥ १ ॥
शिष्ट परि पालनासी । युगें युगें संभवासी ॥ २ ॥
ऐसी राम ग्रीदावळी । का न येसी तूं जवळी ॥ ३ ॥
थोडी काय धर्मा ग्लानी । आली आहे पहा मनीं ॥ ४ ॥

धनुर्बाण घेई येई। नको पाहू अंत कांहीं ॥ ५ ॥
तळमळ ही सेवका। कृपादृष्टी जरा फेकां ॥ ६ ॥

## ३१६. देवाची काकुळती

एकवार प्रभु दरसन देई। पैलपार नेई उतरून ॥ ध्रु० ॥
भवाचा या वीट बहुताचि आला। केले उपायाला सुरासाटी ॥ १ ॥
सुख नाहीं दुःख अती मी भोगिलें। कितेक घेतले जन्मांतर ॥ २ ॥
जन्मोजन्मीं राम दुरावत गेला। सेवक दयाळा विनवितो ॥ ३ ॥

## ३१७. करुणा

प्रकृति विकृति बहुताचि झाली। श्रीराम माऊली भेट आतां ॥ १ ॥
भेट आतां त्वरें डोकें ना ठिकाणीं। म्हणे कांहीं कोणीं रामा मज ॥ २ ॥
मज रामा! काय निष्ठुर झालासी। पुन्हां भेट देसी सेवकासी ॥ ३ ॥

## ३१८. दर्शनाचा टाहो

धांव पाव सीतारामा। मनमोहन श्रीरामा ॥ १ ॥
लावली तूं मज गोडी। नको करूं आतां खोडी ॥ २ ॥
दर्शनाची भारी आस। कासयासी सावकाश ॥ ३ ॥
नको लोक लाज कांहीं। राम! भक्ताकडे पाही ॥ ४ ॥
ऐकसीना माझी हांक। विनवितो हा सेवक ॥ ५ ॥

## ३१९. दर्शनाची तळमळ

सीतारामा! भेट देना। काय करावें सुचेना ॥ १ ॥
जीव वाहूं तव पायीं। धांव पाव राम पाही ॥ २ ॥
अंतरींचा राम साक्ष। सीताराम पदीं लक्ष ॥ ३ ॥
तळमळ मानसीची। सीताराम जाणे साची ॥ ४ ॥
रामदर्शना सेवक। तळमळतो हा देख ॥ ५ ॥

## ३२०. धांवा केला असतां राम पावतो

श्रीरामा ! निष्ठुर कासया झालासी । मी कां परदेशी धांव पाव ॥१॥
धांव पाव आतां उशीर करिसी । मज मोकलीसी ऐसें कैसें ॥ २ ॥
कैसें काय मन अतर जाणसी । धांवोनी त्वरेंसी रामा येईं ॥ ३ ॥
त्वरें येई राम नर - नारीरूपें । प्रकट स्वरूपें दाखवीसी ॥ ४ ॥
दाखवी विराट स्वरूप सेवका । विश्वास अनेका उपजतो ॥ ५ ॥

## ३२१. भक्तविघ्नहारक रामाचा धांवा

रामा धांव आतां पावरे त्वकरी । संकटचि भारी पडलेंसें ॥ १ ॥
पडले आडवे नर नारी सर्वे । कासयासी गर्व मनामाजीं ॥ २ ॥
मनामाजीं धांवा केवारी आमुचा । निवारीच साचा सर्व विघ्न ॥३ ॥
विघ्नें काय रामा पाहतां राहती । देशोधडी जाती पळोनियां ॥ ४ ॥
पळोनि सेवक जाय कोठें दूर । श्रीराम आधार जनीं वनीं ॥ ५ ॥

## ३२२. धांवा ऐकून राम आला

श्रीराम दर्शन देई वा सत्वर । करी उपकार आतां राम ॥ १ ॥
राम राम कठ शोषला म्हणून । आतां मम प्राण जाईल हो ॥ २ ॥
जाईल जाणार राम मी अच्युत । धरिला अनंत सीताराम ॥ ३ ॥
सीताराम धांवा ऐकोनी पावला । सेवका भेटला आत्माराम ॥ ४ ॥

# पाकळी १४. साक्षात्कार ( अभंग ३२३ ते ३३७ )

## ३२३. हृदयीं रामदर्शन

हृदयमंदिरीं श्रीराम देखिला । नवल भेटला स्वानंदेंसी ॥ १ ॥
स्वानंद स्वरूप गुरुरूपें भेट । सर्वच प्रगट भरलासे ॥ २ ॥
भरला श्रीराम साधन कासया । आटाआटी न या सेवकासी ॥ ३ ॥

## ३२४. उन्मनीच्या शेवटीं आनंदमय रामाची भेट

एकादशी मन उन्मनीचा प्रांत । श्रीराम एकांत भेटतसे ॥ १ ॥
भेटतसे माझा जिवलग सखा । सदैव सारिखा सीताराम ॥ २ ॥
सीताराम एक आनंदाची खाण । सेवका कल्याण रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३२५. स्वयंज्योतीच्या प्रकाशानें सर्वत्र रामदर्शन

स्वयंज्योति राम सूर्याच्या प्रकाशें । रावणचि नाशे अहंकार ॥ १ ॥
अहंकार माया सीता लीन जाली । रामीं विनटली शुद्ध प्रेमें ॥ २ ॥
शुद्ध प्रेम सर्व विश्वव्यापी आहे । आत्माराम पाहे अणुरेणू ॥ ३ ॥
अणुरेणू पूर्ण आत्मसाक्षात्कार । जगाचा विसर सहजचि ॥ ४ ॥
सहजचि राम सर्वत्र भरला । सेवक रतला रामपदीं ॥ ५ ॥

## ३२६. सर्वत्र तदीक्षण

भेटला श्रीराम जगीं नगीं पूर्ण । मागें पुढें जाण चोहींकडे ॥ १ ॥
चोहींकडे एक व्यापक श्रीराम । शिवमुनी धाम सर्वाभूतीं ॥ २ ॥
सर्वाभूतीं सदा अभिन्न श्रीराम । सर्वांसी विश्राम निरालंबी ॥३॥
निरालंबीं नित्य स्वानुभव गोडी । वेदासी बोबडी नेति नेति ॥ ४ ॥
नेति नेति श्रुति वेदशास्त्रा मौन । सेवक कल्याण मौन्यगर्भा ॥ ५ ॥

## ३२७. सर्वत्र तदीक्षण

नाहीं नाहीं येणें जाणें । नसे जनन मरणें ॥ १ ॥
रामदर्शनें पळालें । द्वैत भय दूर गेलें ॥ २ ॥
राम सर्वत्र भरला । ऐसें कळों आलें मला ॥ ३ ॥
जेथें जावें तेथें राम । मागें पुढें घनशाम ॥ ४ ॥
प्रापणीय प्राप्त झालें । रामें सेवका तारिलें ॥ ५ ॥

## ३२८. सर्वत्र तदीक्षण

कोहं गेलें, अहं सोहं हे आटलें । स्वानंद दाटलें पूर्ण ब्रह्म ॥ १ ॥
पूर्ण ब्रह्म राम भक्ताची माऊली । कृपेची साउली जनीं वनीं ॥ २ ॥

पूज्य पूजक नी पूजा । एक राम नाहीं दुजा ॥ ५ ॥
नमाह्न परिपूर्ण । मीच करी मत्पूजन ॥ ६ ॥
माझा मीच देव पूर्ण । राम सेवक कल्याण ॥ ७ ॥

## ३३३. अहं ब्रह्मास्मि

जय जय राम पूर्ण कृपाघन । सर्वासि दे ज्ञान निर्मलचि ॥ १ ॥
येणें जाणें आतां नाहीं कोठे कांहीं । व्यापक मी पाहीं नमाह्न ॥ २ ॥
सच्चित्सुखघन पूर्ण स्वयं साक्षात् । स्वानुभव हें मत् स्वरूपचि ॥ ३ ॥
नित्य शुद्ध बुद्ध मुक्त स्वभाव हा । सत्य ज्ञान पहा वाचातीत ॥ ४ ॥
सेवक कल्याण रामब्रह्म पूर्ण । निर्गुण निर्वाण सदोदित ॥ ५ ॥

## ३३४. सर्वच ब्रह्म ।

मागें पुढें राम चालतो बोलतो । खातो पितो घेतो राम देतो ॥ १ ॥
राम देतो जना राम पाहे जनां । राम मनीं वनीं ध्यानीं राम ॥ २ ॥
राम सर्व जग राम सर्व नग । राम योग याग रामब्रह्म ॥ ३ ॥
राम ब्रह्म नित्य रामपूर्ण सत्य । राम सत्यासत्य अतीत हो ॥ ४ ॥
अतीत प्रतीत राम स्वयसिद्ध । सेवक विशुद्ध रामसर्व ॥ ५ ॥

## ३३५. सर्व खलु इदं ब्रह्म

त्यागूं काय मागूं काय । सर्व ब्रह्म राममय ॥ १ ॥
माझा स्वामी गुरुदेव । दिला शुद्ध अनुभव ॥ २ ॥
येणें जाणें गेलें सारें । निजरंगीं रंगलोरे ॥ ३ ॥
आत्माराम ध्यानीं मनीं । पूर्ण दिसे जनीं वनीं ॥ ४ ॥
गुरुकृपायोगें जाण । राम सेवक कल्याण ॥ ५ ॥

## ३३६. द्वंद्वातीत ब्रह्मावस्था

अहं सोहं गेलें ब्रह्मास्मि विराले । स्वानुभवे जाले सर्व ब्रह्म ॥ १ ॥
सर्वातीत परी सर्वाधार खास । उपाधी सायास नाहीं नाहीं ॥ २ ॥

जनी वनी द्वेत अद्वेत मावळे । गुरुकृपावळें स्वानुभव ॥ ३ ॥
स्वानुभव साक्षादपरोक्ष-पूर्ण । सेवक कल्याण स्वात्माराम ॥ ४ ॥

## ३२९ सर्वावस्थांत रामदर्शन

रामावीण नाही जाणत मी काहीं । अंतर्बाह्य पाही पूर्ण राम ॥ १ ॥
राम पूर्ण जनीं वनीं मनीं ध्यानीं । जागृति नी स्वप्नीं समाधींत ॥ २ ॥
समाधी सहज बोलता चालतां । सेवक तत्त्वतां राम ब्रह्म ॥ ३ ॥

## ३३०. सर्व इंद्रियानें ब्रह्मानुभव म्हणजे उन्मनी अवस्था

देव भक्तासवें जातो । ध्यानरूपें एक होतो ॥ १ ॥
ध्येय ध्यान आणि ध्याता । सर्व रामचि तत्त्वतां ॥ २ ॥
ऐसी स्थिति लाहे ज्यासी । उन्मनीचा प्रांत त्यासी ॥ ३ ॥
दृष्टी देखे परब्रह्म । कर्णी ऐके परब्रह्म ॥ ४ ॥
जिव्हा सेवी ब्रह्मरस । त्वचा स्पर्शी ब्रह्म खास ॥ ५ ॥
मना मनन मौन्याचें । अनिर्वाच्य ब्रह्म साचें ॥ ६ ॥
सेवकासी सेवा ब्रह्म । सर्वां सर्व परब्रह्म ॥ ७ ॥

## ३३१. आध्यात्मिक विवाह

जातां नये तूज मजवाचोनियां । अहो तव माया लीन जाली ॥ १ ॥
कासयासी लग्न केलें त्वां मजसी । ब्रह्मात्मैक्य खाशी प्राप्ति जाली ॥ २ ॥
लग्नोत्तर पुत्र मोक्ष एक झाला । जगन्नाश केला शीघ्र तेणें ॥ ३ ॥
कैवल्य कल्याण परिपूर्ण एक । सेव्य ना सेवक वृत्तीहीन ॥ ४ ॥

## ३३२. मीच राम

रामकृष्ण मत्स्वरूप । अणुरेणू आत्मरूप ॥ १ ॥
पूजूं जातां पूर्ण भावां । घडे मज माझी सेवा ॥ २ ॥
वेल तुळसी सुमनें । सत्य माझेंचेनि गुणें ॥ ३ ॥
वस्त्र गंध धूप दीप । सर्व माझेंचि स्वरूप ॥ ४ ॥

पूज्य पूजक नी पूजा । एक राम नाहीं दुजा ॥ ५ ॥
नभाहून परिपूर्ण । मीच करी मत्पूजन ॥ ६ ॥
माझा मीच देव पूर्ण । राम सेवक कल्याण ॥ ७ ॥

## ३३३. अहं ब्रह्मास्मि

जय जय राम पूर्ण कृपाघन । सर्वांसि दे ज्ञान निर्मळचि ॥ १ ॥
येणें जाणें जातां नाहीं कोठें कांहीं । व्यापक मी पाही नभाहून ॥ २ ॥
सच्चित्सुखघन पूर्ण स्वयं साक्षात् । स्वानुभव हें मत् स्वरूपचि ॥३॥
नित्य शुद्ध बुद्ध मुक्त स्वभाव हा । सत्य ज्ञान पहा वाचातीत ॥ ४ ॥
सेवक कल्याण रामब्रह्म पूर्ण । निर्गुण निर्वाण सदोदित ॥ ५ ॥

## ३३४. सर्वच ब्रह्म ।

मागें पुढें राम चालतो बोलतो । खातो पितो घेतो राम देतो ॥ १ ॥
राम देतो जना राम पाहे जनां । राम मनीं वनीं ध्यानीं राम ॥ २ ॥
राम सर्व जग राम सर्व नग । राम योग याग रामब्रह्म ॥ ३ ॥
राम ब्रह्म नित्य रामपूर्ण सत्य । राम सत्यासत्य अतीत हो ॥ ४ ॥
अतीत प्रतीत राम स्वयंसिद्ध । सेवक विशुद्ध रामसर्व ॥ ५ ॥

## ३३५. सर्व खलु इदं ब्रह्म

त्यागूं काय भोगूं काय । सर्व ब्रह्म राममय ॥ १ ॥
माझा स्वामी गुरुदेव । दिला शुद्ध अनुभव ॥ २ ॥
येणें जाणें गेलें सारें । निजरंगीं रंगलोरे ॥ ३ ॥
आत्माराम ध्यानीं मनीं । पूर्ण दिसे जनीं वनीं ॥ ४ ॥
गुरुकृपायोगे जाण । राम सेवक कल्याण ॥ ५ ॥

## ३३६. द्वंद्वातीत ब्रह्मावस्था

अहं सोहं गेलें ब्रह्मास्मि विरालें । स्वानुभवें जालें सर्व ब्रह्म ॥ १ ॥
सर्वातीत परी सर्वाधार खास । उपाधी सायास नाहीं नाहीं ॥ २ ॥

नाही नाही गेलें, आहेपण ढेलें। शब्दें न वर्णिलें जाय कदा ॥ ३ ॥
ब्रह्म सर्व जग नग अंतर्बाह्य । अच्युत अव्यय सर्वातीत ॥ ४ ॥
कदा जाय कोठें कैसें काय कोण । निर्वाण निर्गुण निराकार ॥ ५ ॥
निराकार आत्मा ब्रह्म सच्चिद्घन । सेवक कल्याण गुरुकृपें ॥ ६ ॥

## ३३७. साक्षात्कारी – योगी

ज्ञानेश्वर ज्ञानदेव । वटेश्वर चांगदेव ॥ १ ॥
ज्ञानेश्वर योगेश्वर । वटेश्वर योगेश्वर ॥ २ ॥
ज्ञानदेव ज्ञानवृद्ध । चांगदेव वयोवृद्ध ॥ ३ ॥
ज्ञानदेव पांडुरंग । वटेश्वर योगरंग ॥ ४ ॥
ज्ञानदेव ब्रह्म पूर्ण । चांगदेव योग पूर्ण ॥ ५ ॥
ज्ञानेश्वर परिपूर्ण । वटेश्वर कोरा जाण ॥ ६ ॥
उपदेशी वटेश्वर । मुक्ताबाई ज्ञानेश्वर ॥ ७ ॥
ज्ञानेश्वर मुक्त पूर्ण । सेवा सेवक कल्याण ॥ ८ ॥

# पाकळी १५. साक्षात्काराचे परिणाम

## ( अभंग ३३८ ते ३७३ )

## ३३८. अष्ट सात्त्विक भाव

प्रेम अंतरींचें दाटे । डोळ्यावाटे नीर लोटे ॥ १ ॥
नाम गाऊं नित्य वाचें । पांडुरंग विठोबाचें ॥ ध्रु० ॥
दरारून घाम सुटे । गातां गातां कंठ दाटे ॥ २ ॥
हात पाय कांपताती । केश केसे थरारिती ॥ ३ ॥
मुखचिन्ह पालटतें । जगद्भान विसरतें ॥ ४ ॥
गुरु कृपें नाम ध्यास । जोडलासे सेवकास ॥ ५ ॥

## ३३९ राम भेटीनें दुःखाचा नाश

सर्व कांहीं एक ब्रह्म राम पाही । अतरींची ग्वाही सीताराम ॥ १ ॥
सीताराम माझा जिवलग सखा । असतो सारिखा संनिधानीं ॥ २ ॥

संनिधानीं रामा सुखा पार नाहीं । मायामय पाहीं दुःख शोक ॥ ३ ॥
दुःखशोक कैचें श्रीराम भेटतां । सेवक तत्वतां राम ब्रह्म ॥ ४ ॥

## ३४०. सगुण निर्गुण एकच

राम ब्रह्म एक नाम मात्र भिन्न । सहज अभिन्न सीताराम ॥ १ ॥
सीताराम माता पिता भ्राता कांता । भर्ता मुक्तिदाता श्रीरामचि ॥ २ ॥
श्रीरामचि सर्व सर्वाधार माझा । कल्याण कलिजा राम ब्रह्म ॥ ३ ॥
राम ब्रह्म एक, नेंह नाना सत्य । आत्माराम नित्य सेवक हा ॥ ४ ॥

## ३४१. रामदर्शनानें भूतदयादि सद्गुण

विवेक विराग सुख आत्मतृप्ति । सत्य क्षमा शांति भूतदया ॥ १ ॥
भूतदया दुःखी कष्टी जना साह्य । राम अंतर्बाह्य पाही बापा ॥ २ ॥
पाही बापा राम सर्वत्र भरला । सोडोनियां याला रानभरी ॥ ३ ॥
रानभरी कां बा उगाचि कष्टतां । श्रीराम जनता-जनार्दन ॥ ४ ॥
जनार्दन जन जाणोनि सेविजे । सेवका जोडिजे कल्याणचि ॥ ५ ॥

## ३४२. स्वरूपानुभवानें मायानाश

आत्मादित्य तेजें माया तम गेलें । परब्रह्म आलें स्वानुभवा ॥ १ ॥
स्वानुभव स्वस्थ स्वयं स्वेन स्वस्मिन् । पूर्णपणें अस्मिन् सच्चित्सुख ॥ २ ॥
सच्चित्सुख घन श्रीराम संपूर्ण । सेवक कल्याण रामकृपें ॥ ३ ॥

## ३४३. रामदर्शनानें सर्व भेदांचा अस्त

प्रातः सायं नाहीं मध्यान्ह् नि अस्त । आत्मा प्रकाशत सर्व काळ ॥ १ ॥
सर्वकाळ एक दिशा नाहीं दुजी । पूर्वोत्तर काजीं देश नाहीं ॥ २ ॥
नाहीं देश काळ कर्म कर्ता सर्व । हारपला गर्व धर्माधर्म ॥ ३ ॥
धर्माधर्म अस्त मायामोह पाश । सेवक सर्वेश राम सूर्य ॥ ४ ॥

## ३४४. जीवन्मुक्ताचें समत्व

जन्म जरा मृत्यु साम्राज्य दारिद्र्य । सर्व भोगी रम्य जीवन्मुक्त ॥१॥
जीवन्मुक्त स्वच्छ समबुद्धि सदा । भय चिंता कदा नातळते ॥ २ ॥
नातळते शंका इच्छा द्वेष कला । निश्चय हा भला पूर्ण ब्रह्म ॥ ३ ॥
पूर्ण ब्रह्म स्वयं साक्षादपरोक्ष । द्वैताद्वैत पक्ष नसे कांहीं ॥ ४ ॥
कांहीं नसे भेद, अभेद प्रपूर्ण । सेवक कल्याण आत्माराम ॥ ५ ॥

## ३४५. जीवनमुक्ताची द्वंद्वातीतता

तप करी परी हेतु कांहीं नाहीं । भोग न रुचेहि जीवन्मुक्ता ॥ १ ॥
जीवन्मुक्ता जरी सुख दुःख प्राप्त । हर्ष शोक होत नाहीं तया ॥ २ ॥
तया नाहीं काम क्रोध लोभ मोह । सहा रिपु नेह, निर्वासन ॥ ३ ॥
निर्वासन मन ध्यान न मनन । अहंकारहीन जीवन्मुक्त ॥ ४ ॥
जीवन्मुक्त ब्रह्म स्वयंसिद्ध पूर्ण । सेवक कल्याण स्वात्मानंद ॥ ५ ॥

## ३४६. अपरोक्ष साक्षात्कारानें भेदांचा लोप

अपरोक्ष पूर्ण साक्षात्कार होता । बद्धता मुक्तता नाम नाहीं ॥ १ ॥
नाहीं नाम 'माझा' अनुभव होता । कल्पना तत्वतां मूळ माया ॥२॥
माया मूळ माझे चरण देखता । संसार सर्वथा उरे कोठें ॥ ३ ॥
कोठें उरे दोष गुण, माझी भक्ति । करितां सुयुक्ति ठायीं सर्वां ॥ ४ ॥
सर्वां ठायीं माझा वास निरंतर । मज आपपर भेद नाहीं ॥ ५ ॥
नाहीं भेदाभेद आत्मा सर्व विश्व । ब्रह्म अनुभव आत्माराम ॥ ६ ॥
राम आत्मा ब्रह्म वस्तु मी हा पूर्ण । सेवक कल्याण स्वयंसिद्ध ॥ ७ ॥

## ३४७. सर्वत्र रामदर्शनानें नैष्कर्म्य

जिकडे तिकडे आत्मसूर्य तेज । अस्तोदय चोज अस्त झाला ॥ १ ॥
अस्त झाला कर्मा अकर्मा विकर्मा । धर्माधर्म वर्मा वाव नाहीं ॥ २ ॥
वाव नाहीं भेद अभेद उदयां । माया शब्द लयो पूर्ण रामीं ॥ ३ ॥
रामीं पूर्ण एक स्वात्मानंद सत्य । सम ब्रह्म नित्य सेवक हो ॥ ४ ॥

## ३४८. रामदर्शनानें विदेहावस्था

देहशुद्धि माझी विसरोनी गेली । श्रीराम माऊली देखतांचि ॥ १ ॥
देखतां स्वरूप नेत्रीं जलधारा । येतांचि अपारा वारीतसे ॥ २ ॥
वारीत श्रीराम संसार बंधन । घेऊन चुंबन आश्वासीत ॥ ३ ॥
आश्वासी सदैव तव हृदीं वास । करीन मी खास यावज्जीव ॥ ४ ॥
यावद्देहोपाधी शोक मोह माया । न च तूज वायां, पूर्णरूपा ॥ ५ ॥
पूर्णरूप तुझें तूज सांपडलें । सर्वत्र भरलें कल्याणचि ॥ ६ ॥
कल्याण सेवका आनंदी आनंद । सच्चिद्घनानंद राम दाता ॥ ७ ॥

## ३४९. अखंड रामाचा समागम

आतां कोठें जासी देवा । मजवांचोनी राघवा ॥ १ ॥
त्वत्पद हृदयीं मम । सांठविलें त्वांचि राम ॥ २ ॥
येणें जाणें कांहीं नोहे । भव-भय दूर राहे ॥ ३ ॥
सेवक कल्याण जालें । राम-पद सांपडलें ॥ ४ ॥

## ३५०. थेंबुटा सागरीं बुडाला

एकीएक बोल शब्दचि हा फोल । अनुभव-ओल खोल आहे ॥ १ ॥
आहे खोल ज्ञान-विज्ञान-सागर । न लगेचि पार अंत कोणा ॥ २ ॥
कोणा अंत पार लागे तो बुडाला । स्वानंद-रत्नाला सोडीनाचि ॥ ३ ॥
सोडिना स्वयंभू आपणा आपण । सेवक कल्याण ध्रुवपद ॥ ४ ॥

## ३५१. जीवन्मुक्ताची विदेहावस्था

इच्छाऽनिच्छा नाहीं गाढ निद्रा जैसी। जाग्रती ही तैसी जीवन्मुक्ता ॥ १ ॥
जीवन्मुक्ता आत्मरति सदाकाळ । आत्मक्रीडें वेळ जाई सर्व ॥ २ ॥
सर्व जाई स्नेह ममता अहंता । विश्रांती तत्त्वतां ब्रह्मानंदीं ॥ ३ ॥
ब्रह्मानंदीं मग्न, देह गेह भान । नाहीं नाहीं जाण मायीकता ॥ ४ ॥
मायिक संबंध तुटला संपूर्ण । सेवक कल्याण सच्चिद्घन ॥ ५ ॥

## ३५२. स्वानंदांत देहभाव बुडाला

गेलें मी-तू पण जीव-शिवभाव। स्वानंदानुभव सर्वकाळ ॥ १ ॥
सर्वकाळ ब्रह्माकार वृत्ति पूर्ण। सगुण निर्गुण रामब्रह्म ॥ २ ॥
ब्रह्म राम सृष्टि व्यष्टि नी समष्टी। गुरुरुपा दृष्टी एकमेव ॥ ३ ॥
एकमेव ब्रह्म अद्वितीय राम। संकल्पा विराम सहजचि ॥ ४ ॥
सहजचि नित्य शुद्ध बुद्ध मुक्त। स्वभाव संयुक्त सेवक हा ॥ ५ ॥

## ३५३. ईश्वरोन्मादानें देहाची विस्मृति

रामपदीं मन वेडावलें सदा। शरीर आपदा कोण जाणें ॥ १ ॥
जाणें कोण चित्तवृत्ति नाहीं कांहीं। स्वात्मानंद पाही सहजचि ॥ २ ॥
सहजचि नित्य शुद्ध बुद्ध मुक्त। एकी एक व्यक्त राम ब्रह्म ॥ ३ ॥
ब्रह्म राम पूर्ण सेवक कल्याण। वर्णवेना मौन अंतर्बाह्य ॥ ४ ॥

## ३५४. सर्वातीत रामाच्या दर्शनानें मायातरण

सच्चित्सुखानंद धाम। पहा माझा रघुराम ॥ १ ॥
झालों सर्वस्वें मोकळा। जाणोनियां रामकळा ॥ ध्रु० ॥
जेथें तेथें राम दिसे। नाहीं नानाकार पिसें ॥ २ ॥
नाम आकार मायिक। वस्तु असे सत्य एक ॥ ३ ॥
अस्ति भाति प्रिय देख। सर्वी श्रीराम व्यापक ॥ ४ ॥
व्याप्य व्यापक हा कैचा। सर्वापर राम साचा ॥ ५ ॥
पैल पैल ऐसा बोल। कैसा रामासी साजेल ॥ ६ ॥
अनुर्वाच्य ऐसी बोली। तेहि शब्दाचिये फोली ॥ ७ ॥
ब्रह्म निःशब्द हे श्रुति। आणि दुजी नेति नेति ॥ ८ ॥
ऐसा राम जाणोनियां। गेलों ओलांडूनि माया ॥ ९ ॥
रामसेवा फळा आली। सेवकासी भेटी झाली ॥ १० ॥

## ३५५. रामदर्शनानें धन्यता

जीवीचें जीवन माझा राम पूर्ण। पहातां उन्मन झालें मन ॥ १ ॥
मन धालें राम सांवळा देखून। नेणतां साधन धांवा केला ॥ २ ॥
केला धांवा भावें जीवींचा जिव्हाळा। राम सूर्य कळा प्रकाशली ॥ ३ ॥
प्रकाश संपूर्ण दादला सर्वत्र। अरत्र परत्र नाम नाहीं ॥ ४ ॥
नाहीं नाम राम ब्रह्मचि सेवक। राम माझा एक सर्वांतरीं ॥ ५ ॥

## ३५६. ब्रह्मदर्शनानें द्रष्टाच उरत नाहीं

ब्रह्मांडावरुतें बैसलें असतां। आकाश पहातां भकास तें ॥ १ ॥
चंचळाच्या नांवें होये शून्याकार। व्यापकता केर नाहीं नाहीं ॥ २ ॥
व्याप्य-व्यापकता भाव कैसा राहे। व्याप्य काय आहे सांगा पाहूं ॥ ३ ॥
सांगावया कोण शिल्लक रहातो। मुरोनियां जातो जेथें तेथें ॥ ४ ॥
रामीं दास आणि कल्याणहि आहे। अनिर्वाच्य भेदे सेवकाला ॥ ५ ॥

## ३५७. ब्रह्माकार, आनंदपूर्णवृत्ति म्हणजे निर्विकल्पता

गुरुरूपें ब्रह्माकार वृत्ति पूर्ण। हारपलें मन मनपणा ॥ १ ॥
मनपण वृत्ति संकल्प विकल्प। त्यजोनियां अल्प तन्मय हो ॥ २ ॥
तन्मय हो चित्त तकाररहित। विषयरहित चैतन्यचि ॥ ३ ॥
चैतन्य स्वरूप सदानंद पूर्ण। सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ४ ॥

## ३५८. अहं ब्रह्मास्मि।

अच्युत मी अनंत मी। अखंड मी अचल मी ॥ १ ॥
अचिंत्य मी अव्यक्त मी। अग्राह्य मी अद्वैत मी ॥ २ ॥
अनादि मी अरूप मी। अनाम मी असंग मी ॥ ३ ॥
ब्रह्म आत्मा केवल मी। कल्याणचि सेवक मी ॥ ४ ॥

## ३५९. एकमेवाद्वितीयम्

नाहीं नाहीं मज द्वैताचा संबंध । जाला शुद्ध बोध परतत्त्वाचा ॥ १ ॥
वाचा अगोचर मना अगोचर । निराकार पर ब्रह्म सत्य ॥ २ ॥
नाम रूप मिथ्या अधिष्ठान सत्य । करी नित्यानित्य विचारणा ॥ ३ ॥
निर्गुण निःसंग निष्काम निर्मल । निर्लेप निश्चल निरंतर ॥ ४ ॥
ऐसा आत्मा सार अपार अतर्क । जाणतो सेवक रामरूपें ॥ ५ ॥

## ३६०. एकमेवाद्वितीयम् ।

राम एक दाता आहे काय चिंता । मी माझें ममता दूर गेली ॥ १ ॥
दूर गेली माया काया वाया छाया । स्वरूप साधाया एकी एक ॥ २ ॥
एक एकीं वार्ता नाहीं कीं प्रमाता । सर्व तुझी सत्ता नामरूप ॥ ३ ॥
रूप न अनामीं नाम न अरूपीं । नाहीं स्वस्वरूपीं शब्द ब्रह्म ॥ ४ ॥
ब्रह्म शब्द नाहीं वस्तु आत्मा कांहीं । द्रष्टा साक्षी पाही काय कोठें ॥ ५ ॥
कोठें काय कैसें दुजें मन भास । ध्रुव अविनाश मी कल्याण ॥ ६ ॥
कल्याण सेवक अनेक ना एक । करावा विवेक राम एक ॥ ७ ॥

## ३६१. एकमेवाद्वितीयम् ।

काहीं नाहीं राम एकलाचि असे । नसे द्वैतपिसें विचारतां ॥ १ ॥
आत्मानात्मा करी विचारणा थोर । सारासार पार पाववीतें ॥ २ ॥
दृश्य नाशिवंत भास तैसा जाण । सर्वांतीत खूण गाठ बांपा ॥ ३ ॥
उन्मनी विज्ञान आनंदा न पार । होय निर्विकार सेवकचि ॥ ४ ॥

## ३६२. सर्वं खलु इदं ब्रह्म हा अनुभव

सर्व कांहीं पाहे परि ब्रह्मरूप । ऐके शब्दरूप ब्रह्ममात्र ॥ १ ॥
ब्रह्ममात्र स्वयं जीवन्मुक्त सदा । कदा न आपदा द्वैतरूप ॥ २ ॥
द्वैतरूप राग द्वेष सुखदुःख । धर्माधर्म देख फलाफल ॥ ३ ॥
फलाफलपेक्षा नसे जीवन्मुक्ता । सच्चित्सुखभोक्ता सर्वकाळ ॥ ४ ॥
सर्वकाळ सर्व ब्रह्मचि केवळ । सेवका विमल नित्यानंद ॥ ५ ॥

## ३६३. सर्व ब्रह्म

आनंदी आनंद परम – आनंद । सुखानंद कंद भरलासे ॥ १ ॥
भरलासे परि अनुभवा नये । त्रिपुटीसी पाहे ओलांडूनी ॥ २ ॥
ओलांडूनी काय ऐलाड पैलाड । तेंचि एक वाड दिसतसें ॥ ३ ॥
दिसतसें खरें दाखवितां नये । होऊनियां राहे निश्चळचि ॥ ४ ॥
निश्चळ स्वरूपीं काय आहे सांगे । सांगणें ते उगें राहणें हो ॥ ५ ॥
राहणें ते उगें आणि निरूपणें । स्वरूपीं तों उणें कांहीं नाहीं ॥ ६ ॥
नाहीं कांहीं याचा करूनियां छेद । तेंचि तूं निर्द्वंद्व परब्रह्म ॥ ७ ॥
परब्रह्म राम परब्रम्ह दास । परब्रह्म खास कल्याण हो ॥ ८ ॥
कल्याण - सेवक काय ब्रह्म नोहे । विचारूनी पाहे निश्चयेंसी ॥ ९ ॥

## ३६४. जीवन्मुक्त लक्षणें

कार्य करी सर्व निरिच्छ सर्वदा । स्वानंद – संपदा सर्वकाळ ॥ १ ॥
सर्वकाळ सर्व सत्यज्ञानानंत । वासनारहित जीवन्मुक्त ॥ २ ॥
जीवन्मुक्ता सदा समदृष्टी पूर्ण । चांडाळ ब्राह्मण सच्चिद्रूप ॥ ३ ॥
सच्चिद्रूप श्वान गज अश्व गाय । उपाधिसमय नामरूप ॥ ४ ॥
नामरूप भ्रम, सच्चित्सुखभान । सेवक कल्याण स्वयंसिद्ध ॥ ५ ॥

## ३६५. आध्यात्मिक संसार ( मोक्ष )

झालें माझें लग्न । श्रीराम प्रभू - संलग्न ॥ ध्रु० ॥
गृहप्रवेशीं गृहिणी झाली । माझी सत्ता सारी गेली ॥
मालकीण श्रीरामचि बनली । विसरी माहेरा, होतसे सासरीं मग्न ॥१॥
माया कणिक तिंबुनी पोळी । ज्ञानाग्नीवरी भाजी सोळी ॥
विद्याविद्या मोठी जाळी । साधिला पाक, श्रीरामचि सुगरीण देख ॥२॥
सर्व सांडुनी वनीं गिरीं जा । माझ्या आर्यां तेथें समजा ॥
शंकर गिरिजा सदैव सहजा । सोडिना मातें, अणुरेणूं भरलें नातें ॥३॥
मी सोडी परि मज ना सोडी । संसाराची अखंड गोडी ॥

रामप्रभूची माझी जोडी। नको करूं खोडी, मन माया समूळचि तोडी ॥ ४ ॥
आनंदाला भरितें आलें। कोणी कोणा कांहीं न बोले ॥
वेदशास्त्र तें लटकें पडलें। द्वैत अद्वैत, नाम अनामचि होत ॥ ५ ॥
भोग त्याग ना विराग रंग। भवभ्रांतीचा नसेचि रोग ॥
समाधिसुख हें योगायोग। 'मी' च निःसंग, श्रीरामप्रभूशीं दंग ॥ ६ ॥
एकांतीं मन निमग्न होतां। माया लज्जा समूळ विरतां ॥
जिवाशिवाचें ऐक्य तत्त्वतां। सेवक नग्न, श्रीरामप्रभूशीं मग्न ॥ ७ ॥

## ३६६. तस्य कार्यं न विद्यते।

कार्यक्रम कांहीं नाहीं। एका रामाविण पाही ॥ १ ॥
पाही राम कृपाघन। जाणें येणें रामाधीन ॥ २ ॥
धी न अन्य रामाविण। देह प्रारब्धा आधीन ॥ ३ ॥
आधीं न कळे कोणासी। काय होईल कायेसी ॥ ४ ॥
कायेसीच येणें जाणें। कोठें कोण करी खाणें ॥ ५ ॥
खाणें पिणें निरूपणें। राम नाम कथा गाणें ॥ ६ ॥
गाणें रामीं लीन मन। सदा सेवक कल्याण ॥ ७ ॥

## ३६७. जगदुद्धार

जडजीवां नाम देऊनि उद्धार। करणें साचार कार्य आम्हां ॥ १ ॥
आम्हां कार्य राम नाम सदा घेणें। राम नाम देणें सर्व जनां ॥ २ ॥
जनां सर्व कळे परि न च वळे। अतरीं उसळे अहंभाव ॥ ३ ॥
अहंभाव वृथा कासया धरावा। यथार्थ वरावा रामकृष्ण ॥ ४ ॥
रामकृष्ण नाम – स्मरण करावें। कल्याण साधावें सेवकानें ॥ ५ ॥

## ३६८. ज्ञानी पुरुषाचें कार्य, जगदुद्धार

सर्व कर्म ब्रह्म भक्ति ब्रह्मज्ञान। सर्व ब्रह्म पूर्ण सांगायासी ॥ १ ॥
सांगाया ससारीं सर्व जना वेद -। ज्ञानाचा आमोद यावयासी ॥ २ ॥

यावया श्रीराम नाम सर्वी ह्यातीं । पातलों निश्चिती रामरुपें ॥ ३ ॥
रामरुपें रामनाम कार्य करी । सेवक करारी राम ब्रह्म ॥ ४ ॥

## ३६९. आतममुक्तीहून परमुक्ति – सेवा – श्रेष्ठ

प्रपंच सोडोनि गुहेंमाजीं राही । तप करी पाही मुनी जैसा ॥ १ ॥
मनोजययोग शक्तियुक्तिवंत । आतममुक्तिवंत झालेत हो ॥ २ ॥
आतममुक्तिहून परमुक्तिसाठीं । यत्न उठाउठी नरश्रेष्ठ ॥ ३ ॥
परमुक्तिसाठीं प्राणाची आहुती । तयार सदा ती सेवापर ॥ ४ ॥
सदाध्यानाहून सेवाधर्म श्रेष्ठ । रोगी - दुःखी - कष्ट घालविणें ॥ ५ ॥
भुकेल्यासी अन्न अनाथा आश्रय । देऊनियां सोय सर्व करी ॥ ६ ॥
सेवकासी सेवा हाचि धर्म बापा । तेणें रामकृपा कल्याणचि ॥ ७ ॥

## ३७०. धर्मसंस्थापनार्थाय

ब्रह्मस्थिती नाहीं ज्ञान भक्ति नाहीं । कर्माचा लेशाहि दिसेनाचि ॥१॥
दिसेना विश्वास संत साधू जनीं । जाती लोटांगणी साहेबासी ॥२॥
साहेब आचार सूट बूट हॅट । वर्तन वेछूट घरीं दारीं ॥ ३ ॥
घरीं दारीं अंडी ब्रडी पाव केक । सेवुनि अनेक धर्म निंदी ॥ ४ ॥
निंदी धर्म देव संत वेद स्मृति । उघडी फजीती काय सांगूं ॥ ५ ॥
काय सांगूं अज्ञ जन उद्धारार्थ । सेवक यथार्थ पातला हा ॥ ६ ॥

## ३७१. करूं पाषांड खंडण

कर्म भक्ति ज्ञान धर्म मार्ग नाहीं । नाना मतें पाही माजलेती ॥ १ ॥
माजलें पाखंड गलबला मतांचा । अभिमान साचा वावदूक ॥ २ ॥
वावदूक वाद विवादा पेटती । सज्जन निंदिती अट्टाहासें ॥ ३ ॥
अट्टाहास अज्ञ जनाचा तोडाया । धाडी रामराया सेवकासी ॥ ४ ॥

## ३७२. वाढवावें नाम

देवधर्म नाहीं आचार विचार । अधर्म तत्पर सर्व झाले ॥ १ ॥
झाले सर्व जन सुधारक म्हणे । म्हणोनियां येणें सेवकासी ॥ २ ॥

सेवका सर्वांना देऊनिया नाम । उद्धरणें काम जडजीवां ॥ ३ ॥
जडजीवां राम नाम हें तारक । उद्धरी अनेक निश्चयेंसी ॥ ४ ॥
निश्चयें संसारीं रामनाम घेतां । सेवक तत्त्वतां कल्याणचि ॥ ५ ॥

## ३७३. पिटूं भक्तीचा डांगोरा

संसारीं आम्हांसी येणें कां घडलें । रामनाम भलें वाढवाया ॥ १ ॥
वाढवाया भक्ति ज्ञानाची माऊली । बोधाची साऊली देऊनियां ॥२॥
देऊनी विश्वास सर्व जनां खास । करितों सायास सुधारण्या ॥ ३ ॥
सुधारण्या जन अपार विचार । रामनामीं भर उद्धारार्थ ॥ ४ ॥
उद्धार सर्वांचा करणेंचि कार्य । राम नाम आर्य सेवक हा ॥ ५ ॥

## पाकळी १६. परापूजा ( अभंग ३७४ ते ४०४. )

( रा ) षोडशोपाचार स्वात्मपूजा अभंग ३७४ ते ३९७,
( म ) " पूर्णपूजा " ३९८ ते ४०४.

## ३७४. हृदयस्थाचीच पूजा खरी

करितात पूजा ध्यानावाहनादि । पाषाण काष्ठादि धातुमूर्ति ॥ १ ॥
धातुमूर्ति पूजे षोडशोपचारें । स्तवेोनीं वांधिरे संवळींत ॥ २ ॥
संवळींत ठेवी वांधोनी देवासी । संसार कार्यासी निरतहो ॥ ३ ॥
निरत प्रपंचीं दारा पुत्र मोहीं । काय देव पाही हृदयस्थ ॥ ४ ॥
हृदयस्थ राम-सेवक व्हा पूर्ण । सच्चिद्घन जाण सुखधाम ॥ ५ ॥

## ३७५. ध्यान

सदा ध्यानध्यातृ ध्येय विवर्जित । वाङ्मनसातीत ब्रह्मवस्तु ॥ १ ॥
ब्रह्म मी केवळ सच्चित्सुख घन । स्वयंज्योति पूर्ण आत्मादित्य ॥ २ ॥
आत्मादित्य ध्यान माझा मीच पूर्ण । सेवक कल्याण राम ब्रह्म ॥ ३ ॥

## ३७६. आवाहन

पूर्णात्परिपूर्ण प्रत्यक्स्वरूप मी । परात्परतर मी ब्रह्म आत्मा ॥ १ ॥
ब्रह्म आत्मा चराचर व्यापक मी । मार्झेच करूं मी आवाहन ॥ २ ॥
आवाहन कैसें असतां स्वयंम । सेवका सुलभ रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३७७. आसन

अनेक पदार्थ मान नाहीं मज । विदेह सहज सच्चित्सुख ॥ १ ॥
सच्चित्सुख कार्य-कारण-विशून्य । ब्रह्मात्मा अनन्य सदानंद ॥ २ ॥
सदानंदा कैसें आसन विभिन्न । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३७८. पाद्य

पाय नाहीं मला पाद्य कैसें घ्यावें । काय समर्पावें विदेहासी ॥ १ ॥
विदेह संकल्प नाहीं अहंकार । काय सांगूं नीर तेंही नाहीं ॥ २ ॥
तेंही नाहीं मीच ब्रह्म परिपूर्ण । सेवक कल्याण राम ब्रह्म ॥ ३ ॥

## ३७९. अर्घ्य

अंतर्बाह्य भेद किमपि नसेंचि । स्वमात्र असेंचि सच्चित्सुख ॥ १ ॥
सच्चित्सुख ब्रह्म केवळ मी एक । अर्घ्य संकल्पक कोण होय ॥ २ ॥
कोण होय आत्मसम्राट् मी सदैव । सेवक सुदैव रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३८०. स्नान

गंगा गोदा कृष्णा शरयू यमुना । नदी नद नाना नाम नाहीं ॥ १ ॥
नाहीं नाम पूर्ण अरूप अखंड । स्नानाचें न बंड, विधी नाहीं ॥ २ ॥
विधी स्नान काय ब्रह्मानंदार्णवें । सेवक स्वभावें रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३८१. वस्त्र

दिगंबर वस्त्र मातें नसें कांहीं । दिशा मुळीं नाहीं सत्यरूप ॥ १ ॥
सत्य नित्य ब्रह्म मी हा साक्षाद्वस्तु । शब्द स्पर्श किंतु लेश नाहीं ॥ २ ॥
लेश नाहो मज द्वितीय भावना । वस्त्राची कल्पना कोण करी ॥ ३ ॥
कोण करी कर्ता करविता काय । सेवक हा होय रामब्रह्म ॥ ४ ॥

## ३८२. यज्ञोपवीत

आकाशाहून मी व्यापक प्रपूर्ण । जानवें वाहून पूजी कोण ॥ १ ॥
पूजी कोण सूत्र परमपद मातें । साक्षात् स्वरूपातें नित्यपूर्णा ॥ २ ॥
नित्य पूर्ण सत्य सच्चित् सुखघन । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३८३. गंधविलेपन

वासनारहित सत्य मी अच्युत । अव्यय अनंत सुखरूपा ॥ १ ॥
सुखरूपा कैसें गंधविलेपन । मायिक गंध न भेद मातें ॥ २ ॥
भेद मज नाहीं सच्चित्सुखघन । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३८४. पुष्प

ब्रह्मैक्य - मार्तंड - उदयें सुमन । हृत्पद्म फुलून सुगंधचि ॥ १ ॥
सुगंध दरवळे स्वात्मानंद पूर्ण । दुर्गंध विलीन मायेचाहो ॥ २ ॥
माया मोह मन मावळें मम मी । सेवक सुनामी रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३८५. पुष्पादि

निर्गुण निर्वाण नित्य निर्मल मी । काय फुलें नामी कल्पावीं तीं ॥ १ ॥
कल्पावीं चंपक गुलाब बकूल । तुलसीदल बेल नामोपाधी ॥ २ ॥
उपाधिरहित सच्चित् सुख पूर्ण । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३८६. धूप-दीप

चंदन - अगरु - मिश्र उदवत्ती । धूप दीप व्यक्ती मायीकचि ॥ १ ॥
मायिक विलय अद्वैताकांद्यें । उपाधीची सोये लौकीकचि ॥ २ ॥
लौकीक मायिक मजमाजीं नाही । सेवक हा पाही रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३८७. नैवेद्य

नैवेद्य जिलबी बासुंदी पक्वान्न । नाकास धरून दावी देवा ॥ १ ॥
दावी देवा अन्न रहातसे भिन्न । त्रैलोक्य गिळुन स्वयंपूर्ण ॥ २ ॥
स्वयंपूर्ण माते नैवेद्य सायास । सेवक हा खास रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३८८. तांबूल

तांबूल चर्वण लाल तोंड वाया । मीचि मज माया कार्य नाहीं ॥ १ ॥
नाहीं कार्य आहे कारण मी पूर्ण । ब्रह्मात्मा संपूर्ण वृत्ति-हीन ॥ २ ॥
हीन वृत्ति नाहीं ब्रह्मास्मि केवळ । सेवक निर्मळ रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३८९. दक्षिणा

सुवर्ण पुष्पाची दक्षिणा काय हो । भूमि कांचनें हो मढवावी ॥ १ ॥
मढविली तरी पूर्ण तृप्ति ना दें । स्वरूप अभेदें समाधान ॥ २ ॥
समाधान पूर्ण सच्चित्सुखघन । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३९०. फल-नारिकेल

नारळ अर्पोनी ऐहिक फलासी । मागती सुखासी नाशीवंत ॥ १ ॥
नाशीवंत लाभें अज्ञ रमताती । स्वरूप नेणती सच्चित्सुख ॥ २ ॥
सच्चित्सुख नित्य सत्य ज्ञानानंत । सेवक प्रतीत रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३९१. प्रदक्षिणा

निश्चल निरंश अरूप अनाम । नित्य निरूपम पूर्ण ब्रह्म ॥ १ ॥
पूर्ण ब्रह्म कोण घाली प्रदक्षिणा । मज सनातना एकरूपा ॥ २ ॥
एकरूप नित्य शुद्ध बुद्ध मुक्त । सेवक संयुक्त रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३९२. स्तोत्र

मनोमौन स्तोत्र वृत्तिशून्य पूर्ण । अर्चन पूजन सहजचि ॥ १ ॥
सहज उन्मनी सपूर्ण सुभक्ति । स्वात्मपूजा मुक्ति माझी मज ॥ २ ॥
माझी मज मुक्ति भक्ति भुक्ति पूर्ण । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३९३. नमन

नमन करावें कोणा ? नाही मन । न मन मन न साधा शोधा ॥ १ ॥
शोधा चित्तवृत्ति तकारा त्यागावें । ब्रह्मात्मा जोडावें स्वयसिद्ध ॥ २ ॥
स्वयसिद्ध पूर्ण मज मी न - मन । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३९४. तीर्थग्रहण - विसर्जन

घेऊनियां तीर्थ देव विसर्जन । करिती पूजन ग्राह्याग्राह्य ॥ १ ॥
ग्राह्याग्राह्य भेद मज न कांहींच । सर्व वस्तु साच मीच आत्मा ॥ २ ॥
आत्मा मीच पूर्ण सर्वत्र प्रत्यक्ष । सेवक सुलक्ष राम ब्रह्म ॥ ३ ॥

## ३९५. स्वात्मपूजा साधावी

सहज सुखाब्धि स्वानद सम्राट्। नाहीं आटापीट मायीकाची ॥ १ ॥
मायिक विलयें स्वात्मपूजा साधे । चित्तोपाधि शोधे परिपूर्ण ॥ २ ॥
परिपूर्ण पूजा माझा मी संपूर्ण । सेवक कल्याण राम ब्रह्म ॥ ३ ॥

## ३९६. स्वात्मपूजेस मुख्य चित्तशुद्धि

स्वात्मपूजा करी मन - न सर्वदा । मायिक आपदा नाहीं कांहीं ॥ १ ॥
कांहीं नाहीं काल स्थानादि अपेक्षा । तकार उपेक्षा साधा वरी ॥ २ ॥
वरी साधा चित्तशुद्धि मुख्य पूर्ण । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ३ ॥

## ३९७. माझी पूजा मीच करी

माझी मीच पूजा करी पूर्ण भावें । सहज स्वभावें एक आत्मा ॥ १ ॥
एक आत्मा राम ब्रह्म सच्चित्सुख । स्वयमेव देख सर्व ठांईं ॥ २ ॥

सर्व कांहीं मीच गंध धूप दीप । पूजा करी आप आपणचि ॥ ३ ॥
आपणाविण न जग - देव सत्य । ज्ञानानंत नित्य स्वयं ब्रह्म ॥ ४ ॥
स्वयं ब्रह्म साक्षादपरोक्ष पूर्ण । सेवक कल्याण स्वयंसिद्ध ॥ ५ ॥

## ३९८. षोडशोपचार ब्रह्मच

पूजक पूजन पूजा पूज्यभाव । पूर्ण मी हा देव ब्रह्म राम ॥ १ ॥
रामब्रह्म सर्व षोडशोपचार । पूजेचा प्रकार निर्विकल्प ॥ २ ॥
निर्विकल्प आत्मा राम मी संपूर्ण । सेवक कल्याण परब्रह्म ॥ ३ ॥

## ३९९. आवाहन

परब्रह्म पूजा - विधान विचार । विकल्प विकार कांहीं नाहीं ॥ १ ॥
नाही कांहीं, आहे सच्चित्सुखघन । अखंड प्रपूर्ण अद्वितीय ॥ २ ॥
अद्वितीय कोण आवाहन करी । आहे सर्वांतरीं मी हा सदा ॥ ३ ॥
सदा मी असोनी आवाहन काय । सेवक अमाय सर्वाधार ॥ ४ ॥

## ४००. आसनादि

सर्वाधारा मज आसन कोठलें । पाद्य अर्घ्य भलें कोण देई ॥ १ ॥
कोण देई स्वच्छ हातपायहीन । मज आचमन कैसें काय ॥ २ ॥
कैसें काय स्नान निर्मल विमला । वस्त्र नेसायला विश्वोदरा ॥ ३ ॥
विश्वोदरा मातें अगोत्रा अवर्णा । जानवें संपूर्णा कोण अर्पी ॥ ४ ॥
कोण अर्पी मज गंधादि निर्लेप । सेवक अमूप सच्चित्सुख ॥ ५ ॥

## ४०१. पुष्पादि

सच्चित्सुख मज पुष्पभूषा काय । अलंकार काय निराकारा ॥ १ ॥
निराकारा धूप दीप निरंजना । सर्व साक्षिपूर्णा निजानंदा ॥ २ ॥

निजानंदें तृप्त मजसी नैवेद्य । आगमा अवेद्य परंधाम ॥ ३ ॥
परंब्रह्म राम आनंद संपूर्ण । सेवक कल्याण स्वात्मानंद ॥ ४ ॥

## ४०२. तांबूलादि

स्वात्मानंदा विश्वा आनंददायक । तांबूल त्या देख काय होय ॥ १ ॥
काय होय स्वयंप्रकाश चिद्रूप । सूर्यादिका बाप भासक मी ॥ २ ॥
भासक अनंत अद्वय मी मज । प्रदक्षिणा काज काय आहे ॥ ३ ॥
काय आहे कैसें नमन कोणासी । वागगोचरासी स्तोत्र मौन ॥ ४ ॥
मौन हेंचि स्तोत्र मनाचें उन्मन । सेवक कल्याण स्वयंज्योती ॥ ५ ॥

## ४०३. आर्तिक्यादि

स्वयंज्योति पूर्ण आरती कशाची । तूप वात साची आहे काय ॥ १ ॥
आहे काय दुजें अंतर्बाह्य पूर्ण । कैसें विसर्जन मज देवा ॥ २ ॥
मज देवा पूजा सर्व काळ पूर्ण । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ३ ॥

## ४०४. सोज्वळ पूजा

रामब्रह्म आत्मा शरीर देऊळ । पूजा ही सोज्वळ नाना भोग ॥ १ ॥
नाना भोग देहा सुख दुःख नाहीं । समाधि सदाहि समाधान ॥२॥
समाधान सदा जातां येतां मनीं । जनीं वनीं ध्यानीं रामरूप ॥ ३ ॥
रामरूप सर्व अणुरेणू जाण । नर नारी पूर्ण विश्व सारें ॥ ४ ॥
विश्व सारें एक श्रीराम संपूर्ण । सेवक कल्याण पूर्ण पूजा ॥ ५ ॥

# भाग दुसरा संकीर्ण अभंग

## पाकळी १७. तत्त्वज्ञान (अभंग ४०५ ते ४५०)

### ४०५. चार्वाकमत

चार्वाकमतानें प्रत्यक्ष प्रमाण । भूतें चार जाण तींच तत्त्वें ॥ १ ॥
पृथ्वी आप तेज वायुच्या संयोगें । स्वभावाच्या योगें स्थूल देह ॥ २ ॥
चैतन्यविशिष्ट देह आत्मा साच । देहनाश हाच मोक्ष जाणा ॥ ३ ॥
पुन्हां जन्म कैचा परलोक नाहीं । कर्मफल नाहीं दान धर्म ॥ ४ ॥
बुद्धिहीन लोकें पोटास्तव सारे । कर्माचे डांगोरे कल्पिलेही ॥ ५ ॥
ऐहिक कर्माचें प्रमाणें फलासी । दाता राजा त्यासी ईश पूर्ण ॥ ६ ॥
म्हणोनियां येथें कांहींही करावें । सुखासी भोगावें स्थूल देहें ॥ ७ ॥
ऋण करोनेयां तूप खास प्यावें । चार्वाक जाणावें हेंचि मत ॥ ८ ॥
मनामाजीं साचा करावा विवेक । कल्याण सेवक सांगतसे ॥ ९ ॥

### ४०६. चार्वाकमत

चार्वाक दुसरे वदताती साचे । मृतदेहीं कैचें चेतन्य हो ॥ १ ॥
सर्व ज्ञानोदया चैतन्य इंद्रियें । म्हणोनि इंद्रियें ज्ञानरूप ॥ २ ॥
देह नव्हे आत्मा इंद्रियेंचि आत्मा । करी आत्मानात्मा विवेकासी ॥ ३ ॥
विवेकें कल्याण सेवका होईल । मोक्ष हा जोडेल पूर्णपणें ॥ ४ ॥

### ४०७. बौद्धमतें

इंद्रियें चैतन्य जरी म्हणशील । तरी फसशील अनुभवें ॥ १ ॥
डोळे गेल्यावरी रूपाचें स्मरण । होतें कोणा जाण अनुमानें ॥ २ ॥
अनुमानें नोहे आत्मा हीं इंद्रियें । बौद्ध सांगे सोये हांसोनिया ॥ ३ ॥

बौद्ध मतें तीन जाणा सूक्ष्म खूण । विचार करून त्याग करा ॥ ४ ॥
माध्यमिक योगाचार सौत्रांतीक । कल्याण सेवक सांगतसें ॥ ५ ॥

## ४०८. माध्यमिक बौद्धमत

माध्यमिक म्हणे शून्य हेंचि तत्त्व । व्यवहार सर्व आरोपण ॥ १ ॥
आरोपमूलक लोक व्यवहार । वेदांती साचार मानिताती ॥ २ ॥
अधिष्ठानावीण कैसा हो आरोप । अधिष्ठानरूप सत्य म्हणे ॥ ३ ॥
म्हणणें तें योग्य नव्हे कीं विचारें । अध्यस्त विचारें नांगीकारी ॥ ४ ॥
अर्धजरतीयें वेदांती वदती । कासयासी माति अधिष्ठान ॥ ५ ॥
म्हणोनियां शून्य तत्त्व एकमेव । मोक्षाचा स्वभाव शून्य शून्य ॥ ६ ॥
स्वप्नतुल्य सर्व व्यवहार देख । कल्याण सेवक शून्य शून्य ॥ ७ ॥

## ४०९. योगाचार बौद्धमत

योगाचार म्हणे विज्ञान हा आत्मा । जाणा दोन नामा विज्ञानाच्या ॥ १ ॥
आलय विज्ञान प्रवृत्ति विज्ञान । आकार ' मी ' जाण आलयाचा ॥ २ ॥
अनादिवासनें अनेकाकारानें । अहं मी भावनें भासतसें ॥ ३ ॥
त्या त्या आकारानें अवभासें जें जें । विज्ञान तें साजें प्रवृत्तीचें ॥ ४ ॥
क्षणिक विज्ञान अर्थ क्रियाकारी । सर्व क्षणभरी भाव करी ॥ ५ ॥
अखिल वासना विलय हो जरी । क्षणिक हो तरी विज्ञानचि ॥ ६ ॥
मोक्ष आत्मा शुद्ध विज्ञान क्षणिक । कल्याण सेवक क्षणिक न ॥ ७ ॥

## ४१०. सौत्रांतिक बौद्धमत

सौत्रांतिक म्हणे अंतर्मुख ज्ञान । बहिर्मुख जाण ज्ञेय पूर्ण ॥ १ ॥
सुखादिक जाण ज्ञानाहून भिन्न । विषय हे पूर्ण घटापरी ॥ २ ॥
पंचस्कंध तत्त्वें ग्राहक नी ग्राह्य । इंद्रिय विषय रूपस्कंध ॥ ३ ॥
आलय विज्ञान प्रवृत्ति विज्ञान । स्कंध हा विज्ञान जाण बापा ॥ ४ ॥
विज्ञान स्कंधाचें जन्य सुखदुःख । वेदना हा देख स्कंध तिजा ॥ ५ ॥
शब्दार्थ प्रत्ययें प्रवाह जो होय । संज्ञा स्कंध होय चोथा हाचि ॥ ६ ॥

वेदना स्कंधानें राग द्वेष भय । मद मान जय धर्माधर्म ॥ ७ ॥
होय हा संस्कारस्कंध पांचवाची । स्कंधाहून साची वस्तु नाहीं ॥ ८ ॥
स्कंधपंचक हें आत्मतत्त्व जाण । मुक्तिचें कारण तत्त्वज्ञान ॥ ९ ॥
दुःखसमुदायें निरोधनें ज्ञान । ज्ञानोदयें जाण मुक्ति होय ॥ १० ॥
भावनाबलानें होय तत्त्वज्ञान । सेवकां कल्याण न या मतें ॥ ११ ॥

## ४११. वैभाषिक बौद्धमत

वैभाषिक म्हणे निर्विकल्पज्ञान- । विषयचि जाण वस्तु सत्य ॥ १ ॥
विकल्पसहित ज्ञानाच्या विषयें । धर्मांश हा होयें कल्पितची ॥ २ ॥
कल्पनारहित ग्रहण प्रमाण । बाकी मत जाण सौत्रांतीक ॥ ३ ॥
सेवका कल्याण मतें सांडोनियां । वाया छाया माया, ब्रह्म पूर्ण ॥ ४ ॥

## ४१२. अर्हत् मत

अर्हत म्हणतो त्रैलोक्य पूजीत । सर्वज्ञ यथार्थ अर्हन् देव ॥ १ ॥
दर्शन उत्तम ज्ञानही उत्तम । चारित्र्य उत्तम निश्रेयासी ॥ २ ॥
विपरीत भाव - रहित दर्शन । उत्तम तें जाण अर्हदुक्त ॥ ३ ॥
मोहसंशयादि - रहित उत्तम । ज्ञान अवगम स्वभावानें ॥ ४ ॥
संसार - प्रपंच - जन्मपरंपरा । पाप - नाश करा चारित्र्यानें ॥ ५ ॥
अपरिग्रह व ब्रह्मचर्य सत्य । अहिंसा अस्तेय व्रतें पांच ॥ ६ ॥
दर्शन - चारित्र्यें उत्तम साधनें । मोक्ष हा साधणें विश्वासानें ॥ ७ ॥
अचिद्रूप त्याग करूनी चिद्रूप । विवेकें स्वरूप ज्ञानमार्गे ॥ ८ ॥
ज्ञानाहून भिन्न नाहीं आत्मा जाण । तोचि मोक्ष पूर्ण अर्हन्मतें ॥ ९ ॥
शरीरप्रमाण जीव भिन्नभिन्न । सेवकें ही खूण सांगितली ॥ १० ॥

## ४१३. रामानुजांचें विशिष्टाद्वैत

रामानुजमतें तीन हे पदार्थ । जीव वस्तु - जात ईश तिजा ॥ १ ॥
जीव भोक्ता आणि विषय हे भोग्य । ईश्वर हा योग्य नियामक ॥ २ ॥
भक्तवात्सल्यानें उपासका फला । ईश्वर स्वलीला देत असे ॥ ३ ॥

होवोनी पंचधा अर्चादि विभव । व्यूह सूक्ष्म नांव अंतर्यामी ॥ ४ ॥
कर्म – उपासना – समुच्चयज्ञानें । परम दयेनें दे स्वपद ॥ ५ ॥
पुनर्जन्मशून्य निरवधि–सुख । ईश्वर हा देव दाता थोर ॥ ६ ॥
जीव अणुमात्र ईश्वराचा दास । प्रपंच भेदास सत्य पाही ॥ ७ ॥
वेद हे प्रमाण सिद्धार्थ बोधक । कल्याण सेवक सांगतसे ॥ ८ ॥

## ४१४. मध्वाचार्यांचें शुद्धद्वैत

मध्वाचार्यमतें मुख्य तत्त्वें दोन । विष्णू भगवान स्वतंत्र हा ॥ १ ॥
अनंत कल्याण गुणपूर्ण खाण । अचिंत्य प्रपूर्ण शक्तिमान ॥ २ ॥
परतंत्र महालक्ष्म्यादि प्रपंच । द्विविध तो साच भावाभाव ॥ ३ ॥
भावरूप दोन चेतनाचेतन । चेतनाचें दोन रूप पाही ॥ ४ ॥
नित्यमुक्त आणि संसारयोगी । नित्यमुक्त-भोगी महालक्ष्मी ॥ ५ ॥
संसारसंयोगी मुक्तामुक्त दोन । ब्रह्मादीक जाण देव मुक्त ॥ ६ ॥
अमुक्त त्रिविध उत्तम मध्यम । आणि ते अधम जीव जाणा ॥ ७ ॥
उत्तम ते मुक्ति-योग्य देवऋषी । भगवंतापाशीं भक्तमाला ॥ ८ ॥
केवल कर्मठ नित्य संसारी ते । जाणा मध्यम ते इहलोकीं ॥ ९ ॥
अधम ते दैत्य राक्षस नरका । योग्य नित्य जे कां विष्णुद्वेषी ॥ १० ॥
अचेतन नित्यानित्य भेद एक । देशकालादीक नित्य जाण ॥ ११ ॥
कार्यजात सर्व अनित्य जाणावें । मध्वाचार्यें भावें सांगितलें ॥ १२ ॥
मुक्ति योग्य जीवा त्रिविध सेवनें । अंकनें भजनें नामकर्णें ॥ १३ ॥
पुनर्जन्महीन विष्णुलोक प्राप्ति । तीच जाण मुक्ति सेवकासी ॥ १४ ॥

## ४१५. न्याय वैशेषिक दर्शन

वैशेषिक गोतमीय न्यायमत । पदार्थ हे सात शास्त्र तर्क ॥ १ ॥
द्रव्य गुण कर्म सामान्य विशेष । अभाव अशेष समवाय ॥ २ ॥
ज्ञान इच्छा आदि आठ आत्मधर्म । दुःखध्वंस वर्म मोक्षाचें तें ॥ ३ ॥
नित्य ज्ञानादिकां आश्रय ईश्वर । हेंचि भिन्न सार गोतमाचें ॥ ४ ॥
न्यायशास्त्रें बुद्धि सूक्ष्म ग्राहक हो । आत्मज्ञानासि हो योग्य सूक्ष्म ॥ ५ ॥
सूक्ष्मात्सूक्ष्मतर परब्रह्म पूर्ण । सेवका कल्याण स्वस्वरूपीं ॥ ६ ॥

## ४१६. सांख्यदर्शन

सांख्यमतें जीव शुद्ध ज्ञानरूप । निर्लिप्त स्वरूप जाण बापा ॥ १ ॥
गुणात्मिका कर्त्री प्रकृति जगाची । महदादि साची बुद्धि भोक्त्री ॥ २ ॥
मोक्तृत्वरूपानें बद्धत्व प्रचार । आरोप - विचार पूर्ण होता ॥ ३ ॥
आरोपितां भावें आत्मा स्वस्वरूप । तेंचि मोक्षरूप पूर्णपणें ॥ ४ ॥
ईश्वर न कोणी सांख्यमतें जाण । सेवका कल्याण ब्रह्मराम ॥ ५ ॥

## ४१७. पूर्वमीमांसादर्शन

जैमिनीय मत वैशेषिकवत । बोधाबोधमूर्त जीव आत्मा ॥ १ ॥
धर्माधर्मवशें बद्धता पावती । क्रमानें विमुक्ति अधर्माची ॥ २ ॥
होता दुःखभिन्न सुखरूप स्वर्ग । अनतचि मर्ग लाभतसे ॥ ३ ॥
स्वर्ग तोचि मोक्ष यज्ञयागें जोडे । सेवका रोकडें स्वर्गसुख ॥ ४ ॥

## ४१८. योगदर्शन

योगीमत जाणा सांख्याचे प्रमाणें । फलदाता म्हणे ईश्वरचि ॥ १ ॥
प्राणायामें जय श्वासाचा करावा । कुंभक साधावा परिपूर्ण ॥ २ ॥
अष्टांग अभ्यासें समाधी साधावी । मुक्तिसी भोगावी सेवकानें ॥ ३ ॥

## ४१९. कैवलाद्वैतदर्शन

बहुत मताचें मोक्षाचें स्वरूप । थोडक्यांत रूप सांगितलें ॥ १ ॥
वेदान्तमतानें नित्य शुद्ध बुद्ध । मुक्त स्वयसिद्ध ब्रह्म एक ॥ २ ॥
सत्यज्ञानानंत निष्क्रिय निर्गुण । आनंदप्रपूर्ण एकमेव ॥ ३ ॥
अविद्याकल्पित ब्रह्मांड हें आहे । कदा सत्य नोहे नाशिवंत ॥ ४ ॥
असत्य म्हणावें तरी भासताहे । सदसद्वा नोहे विलक्षण ॥ ५ ॥
अनिर्वचनीय म्हणावें यास्तव । कल्पिताचा भाव ज्ञानें जाय ॥ ६ ॥
कल्पीत प्रपंच निवृत्त तो होये । मिथ्यात्व निश्चयें ऐंद्रजाल ॥ ७ ॥
सुख दुःख माया बंध हेतु जाय । मोक्ष प्राप्त होय ब्रह्मभाव ॥ ८ ॥
उपाधिविलयें अचल अनंत । कल्याण नित्यात सेवकासी ॥ ९ ॥

## ४२०. अजातवाद

कांहीं नाहीं रामावांचोनी दुसरें । नेई पैलतीरें भवाच्या या ॥ १ ॥
जालें नाहीं कांहीं कोठूनी हा भव । सांगा गुरुराव मजप्रती ॥ २ ॥
ऐक निष्टें बाळा जालें नाही कांहीं । अध्यारोप पाही वर्णियेला ॥ ३ ॥
दोरीवरी सांप नसतां मानिला । स्थाणुसी कल्पीला तस्कर तो ॥ ४ ॥
अजातवादाचें बोलणें खुंटलें । मन मौनावलें सेवकाचें ॥ ५ ॥

## ४२१. मिथ्या तेंचि झालें सत्य सत्य तेंचि झालें असत्य ( मायाविभास )

नाहीं तें धरून आहे तें सोडिलें । फेरेंचि फिरले चोऱ्यांशीचे ॥ १ ॥
रज्जूवरी सर्प नसतां कलिपला । हालवूं लागला फणा वाटे ॥ २ ॥
समुद्राचे कांठीं फिरत असतां । शिंपला दिसतां चांदी वाटे ॥ ३ ॥
किरणाचे भासें तोयचि वाटलें । धांवोचि लागले मृग पहा ॥ ४ ॥
सत्य वाटे मिथ्या मिथ्या वाटे सत्य। ऐसे पहा कृत्य अविद्येचें ॥ ५ ॥
अविद्या तोडावी विद्येनें समूळ । मायिकाचें खूळ दूर पळे ॥ ६ ॥
दूर पळे एका सद्गुरुकृपेनें । ज्ञानवैराग्यानें साक्षात्कार ॥ ७ ॥
साक्षात्कार सोपा कल्याण-सेवका । मुक्तिप्रदायिका गुरुकृपा ॥ ८ ॥

## ४२२. माया ब्रह्माधीन आहे

चराचर जग वास्तवीक नाहीं । परमात्मठायीं कलिपताचि ॥ १ ॥
कलिपत मायिक मायाहीन भिन्न । सच्चित्सुखघन परमात्मा ॥ २ ॥
परमात्मा ईश अधीन ही माया । स्वातंत्र्य न तया सोपाधिक ॥ ३ ॥
सोपाधिक माया अतीत कल्याण । सच्चित्सुख पूर्ण सेवक हो ॥ ४ ॥

## ४२३. नेह नानास्ति किंचन !

गुळा कैसें पाठ पोट । गोडी सर्वत्र प्रगट ॥ १ ॥
उपाधीनें भिन्न भासे । वस्तु एक पूर्ण असे ॥ २ ॥

नेह नाना असे कांहीं । परिपूर्ण ब्रह्म पाही ॥ ३ ॥
दृश्य द्रष्टा नी दर्शन । नुरे भेदाभेद जाण ॥ ४ ॥
जें जें दिसें तें तें ब्रह्म । दिसें व्यक्त पूर्ण ब्रह्म ॥ ५ ॥
जन नोहे, जनार्दन । पूर्ण सेवक कल्याण ॥ ६ ॥

## ४२४. ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या, जीवो ब्रह्मैव ।

मायाकार्य देह-बुद्धि अहंकार । कारण हें स्थिर ब्रह्मात्मैक्य ॥ १ ॥
ब्रह्मात्मैक्यभाव स्वरूपस्थितीं हीं । जग नग पाही मत्स्वरूप ॥ २ ॥
मत्स्वरूप कार्य चराचर जगीं । प्रवेशलों नगीं मीचि आत्मा ॥ ३ ॥
आत्मा मी कारण व्यापक प्रवेश । प्रवेशाप्रवेश खेळ सारा ॥ ४ ॥
सारा खेळ व्याप्य-व्यापक हा भाव । कार्याचा अभाव ना कारण ॥ ५ ॥
कारण ना कार्य व्याप्य ना व्यापक । कल्याण सेवक सच्चिद्रूप ॥ ६ ॥

## ४२५. अन्वयव्यतिरेकसिद्धि

आत्मा मी सर्वत्र निरंतर आहे । जग नग पाहे रामब्रह्म ॥ १ ॥
रामब्रह्म सर्व अन्वयाचें रूप । कार्याचें स्वरूप कारणचि ॥ २ ॥
कारणाचि सोनें अलंकारा पूर्ण । घटासी कारण पृथ्वी आप ॥ ३ ॥
पृथ्वी आप तेज वायु नभ आत्मा । सोडुनि अनात्मा नामरूप ॥ ४ ॥
नामरूप त्याग व्यतिरेक जाण । कार्यासी कारण सच्चित्सुख ॥ ५ ॥
सच्चित्सुख ब्रह्म मीचि आत्माराम । सेवका विराम गुरुकृपें ॥ ६ ॥

## ४२६. गुणातीत स्वानंदस्वरूप आत्माच ब्रह्म

अचिंत्य अखंड अनंत अद्वय । आनंद अव्यय अनामय ॥ १ ॥
अनाम अरूप अलक्ष्य अपार । अज अगोचर अप्रमेय ॥ २ ॥
अमल अचल अजर अमर । अग्राह्य अक्षर अनिर्देश्य ॥ ३ ॥
अस्थूल अनणु अदीर्घ अन्हस्व । स्वानंदानुभव अलक्षण ॥ ४ ॥
अयमात्मा ब्रह्म आत्माराम पूर्ण । सेवक कल्याण अप्रतर्क्य ॥ ५ ॥

## ४२७. मनो बुद्ध्यहंकारचित्तादि नाहम् ।

प्राण नाहीं ज्यासी त्यासी कर्म कैचें । शुभाशुभ साचें आतळे ना ॥ १ ॥
मनरहितासी सकल्प विकल्प । नाहीं नाहीं अल्प पूर्णत्वासी ॥ २ ॥
नसताचि बुद्धि कोठूनि जाणावें । जाणावें नेणावें हारपलें ॥ ३ ॥
चिंतन करावें चित्ताभावें कैसें । अहकार नसे कार्य नाहीं ॥ ४ ॥
नाहीं कार्य, आहे कारण सर्वत्र । नाहीं लवमात्र नाश त्यासी ॥ ५ ॥
सत्य ज्ञानानत ब्रह्म मात्र एक । सदेव सेवक राम पाहे ॥ ६ ॥

## ४२८. मीच देव हा साक्षात्कार

देव भक्त एक दुजें नाहीं रुप । देवाचें स्वरूप भक्त साक्षात् ॥ १ ॥
साक्षाद् भक्त देव अनन्य अभेद । भेदाभेद खेद नाहीं द्वेत ॥ २ ॥
द्वेत नाहीं देव म्हणे मीच भक्त । मी तो देव भक्त सच्चित्सुख ॥ ३ ॥
सच्चित्सुख मी तो ता मी देव भक्त । व्यर्थ देवभक्त नाममात्र ॥ ४ ॥
नाममात्र भक्त देवचि साचार । हाचि साक्षात्कार सेवकाचा ॥ ५ ॥

## ४२९. ऐक्य मुळातच आहे

चिद्रूप हा आत्मा किंवा अचिद्रप । जरी हा चिद्रूप नित्यानित्य ॥ १ ॥
नित्य जरी आत्मा देहाहून भिन्न । किंवा देह जाण देहयुक्त ॥ २ ॥
देहयुक्त न-हे आत्मया कर्तृत्व । नाहीं हो भोक्तृत्व आत्मयासी ॥ ३ ॥
आत्मया न सग असग प्रपूर्ण । कर्मलेप जाण देहिक न ॥ ४ ॥
देहिक कर्माचा लेप जरी नाहीं । ब्रह्माभिन्न पाही न वा आत्मा ॥ ५ ॥
आत्मा ब्रह्माभिन्न साच जरी असे । ब्रह्मात्मैक्य कैसें मर्मोत्पन्न ॥ ६ ॥
मर्मोत्पन्न ज्ञान सशय वारून । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ७ ॥

## ४३०. आत्मानंद स्वयसिद्ध आहे

मर्मोत्पन्न ज्ञान यथार्थाऱ्यथार्थ । जरी हो यथार्थ साधकचि ॥ १ ॥
साधक मुक्तीचें अथवा बाधक । मुक्तीचें साधक होय जरी ॥ २ ॥
होय जरी जीवन्मुक्ति मज न वा । साधे रा अथवा विदेहत्व ॥ ३ ॥

विदेहत्व देहीं कैसें या मजला । संशय माजला अंतर्यामी ॥ ४ ॥
अंतर्यामीं शंका संशय नसावा । कल्याण जोडावा आत्मानंद ॥ ५ ॥
आत्मानंद सिद्ध स्वयंज्योति पूर्ण । सेवक कल्याण रामब्रह्म ॥ ६ ॥

## ४३१. सर्व व्यापक ब्रह्म

जातें जात नाहीं, ब्रह्म दूर जवळीं । सर्वा कवटाळी अंतर्यामीं ॥ १ ॥
अंतरीं सर्वांच्या बाहेरहि पूर्ण । पूर्णाचेंहि पूर्ण स्वस्वरूप ॥ २ ॥
स्वस्वरूप तेज रूप कल्याणाचें । पाहोनियां साचें ब्रह्म होय ॥ ३ ॥
होय ब्रह्म स्वयं सेवक कल्याण । सेव्य-सेवा-हीन सच्चिन्मय ॥ ४ ॥

## ४३२. तीन पुरुषार्थ नाशिवंत ; मोक्ष अविनाशी

ब्रह्मज्ञानें मोक्ष पुरुषार्थ नित्य । धर्मादि अनित्य जन्ममृत्यू ॥ १ ॥
जन्ममृत्यू वार्ता न ये पुरुषार्था । जोडे कृतार्थता ब्रह्मज्ञानें ॥ २ ॥
ब्रह्मज्ञानें ब्रह्म साक्षात्स्वस्वरूप । अनाम अरूप आत्मरूप ॥ ३ ॥
आत्मरूप नित्य शुद्ध बुद्ध मुक्त । ज्ञानी जीवन्मुक्त विदेहचि ॥ ४ ॥
विदेह विशुद्ध ब्रह्ममात्र पूर्ण । सेवक कल्याण स्वयंसिद्ध ॥ ५ ॥

## ४३३. पहिल्या ३ पुरुषार्थांनीं अनित्य सुख, मोक्षानें नित्यसुख

सुखाचें साधन धर्म अर्थ काम । पुरुषार्थ नाम पावलेती ॥ १ ॥
पावती अनित्य सुख भोगरूप । भोगावें अरूप ब्रह्म कैसें ॥ २ ॥
कैसें ब्रह्म जोडे धर्म अर्थ कामें । पुरुषार्थ नामें साक्षात्सुख ॥ ३ ॥
साक्षात्सुख मोक्ष अक्षय्य स्वरूप । कल्याण अमूप सेवकाचें ॥ ४ ॥

## ४३४. मोक्षच खरें सुख-खरा पुरुषार्थ

आब्रह्मस्तंबांत सर्व जीव सुख । इच्छिताती देख सर्वकाळ ॥ १ ॥
सर्वकाळ सुख मोक्षाचें स्वरूप । पुरुषार्थ रूप क्षयहीन ॥ २ ॥
क्षयहीन सुख मोक्ष पुरुषार्थ । व्यर्थ धर्म अर्थ काम होय ॥ ३ ॥
काम होय कैसा नित्य सुखरूप । अनित्य स्वरूप धर्मादिक ॥ ४ ॥

धर्मादि अनित्य नोहे पुरुषार्थ । मोक्षचि यथार्थ पुरुषार्थ ॥ ५ ॥
पुरुषार्थ मोक्ष साक्षाद्‌ब्रह्मरूप । कल्याण स्वरूप सेवक हो ॥ ६ ॥

## ४३५. आनंदरूप मोक्ष हाच मुख्य पुरुषार्थ

दुःखाचा संसर्ग नाहीं मोक्षरूपा । अखंड अरूपा स्वस्वरूपा ॥ १ ॥
नित्य निरबाध अचल आनंद । सच्चिद्घनानंद पूर्ण ब्रह्म ॥ २ ॥
जन्ममृत्युशून्य मोक्षाचें लक्षण । निर्वाण निर्गुण निरंजन ॥ ३ ॥
मोक्ष हाचि जाण मुख्य पुरुषार्थ । बाकी तीन व्यर्थ गौण साच ॥ ४ ॥
मोक्षाचे विषयीं विवाद बहुत । सेवक सांगत कल्याणार्थ ॥ ५ ॥

## ४३६. मोक्षाच्या चुकीच्या कल्पना

मोक्षमार्ग हाचि अश्वमेध याग । राजसूय सांग क्षत्रियासी ॥ १ ॥
शरीरशोषण तप खटाटोप । मोक्षाचा समीप मार्ग तया ॥ २ ॥
दाता म्हणे दान मोक्षाचें साधन । श्रेष्ठ या समान आन नाहीं ॥ ३ ॥
मोक्षाचें साधन व्रत एक जाण । नाहीं कांहीं आन दीक्षितासी ॥ ४ ॥
मोक्षाचे साधनीं भ्रांत सारे जन । सेवक कल्याण रामनामें ॥ ५ ॥

## ४३७. मोक्षाच्या चुकीच्या कल्पना

यथेच्छ भोगावे स्वेच्छा सर्व भोग । नरक न स्वर्ग चार्वाकासी ॥ १ ॥
कामसुखें मोक्ष काम नित्य सेवा । कोकशास्त्र मेवा वात्स्यायन ॥ २ ॥
काव्य नाटकादि कवित्व साधनें । मोक्ष यशें म्हणे कवीश्वर ॥ ३ ॥
सार्वभौम राज्यप्राप्ति मोक्ष म्हणे । सामादि साधनें नीतिशास्त्र ॥ ४ ॥
मोक्षाचे साधनीं भांबावले जन । सेवक कल्याण रामनामें ॥ ५ ॥

## ४३८. मोक्षाच्या चुकीच्या कल्पना

सकाम-निषिद्ध-रहित कर्मचि । मोक्ष म्हणे होचि मीमांसक ॥ १ ॥
शमादि संपत्ति सांख्ययोग म्हणे । मोक्षप्राप्ति येणें निश्चयेसी ॥ २ ॥
मूर्ति उपासना मोक्षाचें साधन । सुसांग पूजन पूजकासी ॥ ३ ॥

शिखासून त्याग हाचि मोक्षमार्ग । संन्यास विभाग श्रेष्ठ म्हणे ॥ ४ ॥
मोक्षाचे साधनीं प्रभिरुचि जन । सेवक कल्याण रामनामें ॥ ५ ॥

## ४३९. भजनादि साधनानें ब्रह्मस्थिति साधावी

न हो दुख कोणा मायिक संबंधें । ब्रह्म सुखबोधें सर्वांसी हें ॥ १ ॥
जनन मरण भवभय भ्रांति । सर्वा हो विश्रांति रामपायीं ॥ २ ॥
भजन कीर्तन स्मरण नमन । श्रवण मनन पूजा ध्यान ॥ ३ ॥
अभ्यास करोनी चित्त एकाग्रता । साधावी तत्त्वतां ब्राह्मी स्थिती ॥ ४ ॥
नित्यास प्रपूर्ण सेवका कल्याण । प्रमेय प्रमाण प्रमा राम ॥ ५ ॥

## ४४०. संपूर्ण दुःखनिवृत्ति म्हणजे मोक्ष

धर्म अर्थ काम मोक्ष हे चत्वार । पुरुषार्थ सार भारतीयां ॥ १ ॥
अर्थ काम दोन इहलोकीं सुख - । साधन हें देख सर्वलोकां ॥ २ ॥
धर्माच्या साधनें परलोकीं सुख । भोगिताती देख विश्वासानें ॥ ३ ॥
तात्कालीक सुख इह - पर जाणा । दुःखाच्या यातना आहेतचि ॥ ४ ॥
दुःखमूळ तुटे मोक्षप्राप्ति एका । कल्याण सेवका सुख सदा ॥ ५ ॥

## ४४१. अद्वैत वेदान्तांत प्रतिपादिलेला मोक्षच सत्य

चार्वाक नास्तीक बौद्ध माध्यमिक । आणि सौत्रांतिक योगाचार ॥ १ ॥
वैभाषिकमत आणि ते अर्हत । रामानुज मत मध्वाचार्य ॥ २ ॥
वैशेषीक आणि गौतमीय सांख्य । जैमिनीय मुख्य हठयोग ॥ ३ ॥
इत्यादि मतानें मोक्षाचें स्वरूप । वर्णिलें अरूप, त्यागूनियां ॥ ४ ॥
अद्वैतमतानें श्रुति आश्रयानें । पूर्ण विवेकानें स्वानुभवें ॥ ५ ॥
पूर्ण ब्रह्म साक्षात् अपरोक्ष एक । कल्याण सेवक मोक्षरूप ॥ ६ ॥

## ४४२. केवळ कर्मानें मोक्ष नाहीं

कर्मठ करिती कर्मचि सर्वदा । नेणोनि आपदा कर्म – वर्म ॥ १ ॥
कर्म – वर्म कर्मामाजीं निष्कामचि । कौशल्य साचचि जाणावें बा ॥ २ ॥

जाणावें वा कर्म ब्रह्म प्राप्तिसाठीं। सांडीमांडी खोटी कासयासी ॥ ३ ॥
कासयासी पाय तोडुनी टाकणें। पांगुळा चालणें काय करी ॥ ४ ॥
काय करी कर्म कर्ता करविता। कोण हा जाणतां भक्तिज्ञान ॥ ५ ॥
भक्ति ज्ञान कर्म जन जनार्दन। सेवक कल्याण राम ब्रह्म ॥ ६ ॥

## ४४३. कोरड्या शब्दज्ञानानें मुक्ति नाहीं

भाव भक्तिवीण ज्ञान शुद्ध नोहे। अभिमानी पाहे शब्दज्ञानी ॥ १ ॥
शब्दज्ञानें ब्रह्म नाहीं भक्तिप्रेम। सगुण श्रीराम समाधान ॥ २ ॥
समाधान साच प्रेमळ सद्भक्ता। भक्तचि मुक्तता भोगीतसे ॥ ३ ॥
भोगितसे राम स्वरूप भक्ति। कल्याण चिन्मुक्ति सेवकासी ॥ ४ ॥

## ४४४. देव भक्तीनें मिळतो, शब्दज्ञानानें नाहीं

शास्त्र ग्रंथाभ्यास परमार्थ नोहे। माया – ब्रह्म पाहे घोंटाळाची ॥ १ ॥
घटपट तर्क खटपट वायां। तेणें काय माया आवरावी ॥ २ ॥
विषयीं आसक्ति वित्त लोभकीर्ति। पूर्ण वसे चित्तीं भवव्यथा ॥ ३ ॥
राम भक्ति शुद्ध ज्ञान मुक्तिदायी। चित्त रामपायीं वसो सदा ॥ ४ ॥
सेवका कल्याण एका रामरूपें। भवभय लोपे सहजचि ॥ ५ ॥

## ४४५. अनुभवावांचून शब्दज्ञान व्यर्थ

उत्कट ही भक्ति अद्वैत श्रीराम। विभिन्न विराम भिन्न नाहीं ॥ १ ॥
भिन्नाभिन्न नाहीं द्वैत ना अद्वैत। स्वात्मदर्शनांत स्वानुभव ॥ २ ॥
स्वानुभव ग्रंथ – मात्रेचि कळेना। श्रुति स्मृति जाणा काय करी ॥ ३ ॥
काय करी शब्द साखर मधूर। गोडी राहे दूर अनुभव ॥ ४ ॥
अनुभव जाणे अनुभवी साच। राम स्वरूपींच सेवक हा ॥ ५ ॥

## ४४६. ज्ञानादेव तु कैवल्यम् ।

प्रकाश अंधार विरोधी सदैव। द्वैताद्वैत भाव ज्ञानाज्ञान ॥ १ ॥
ज्ञानावांचूनिया मोक्षमार्ग नाहीं। कर्मोपासनाहि अनित्यचि ॥ २ ॥

अनित्य साधनें नित्य मोक्ष कैसा । रामनाम ठसा कामा नये ॥ ३ ॥
कामा - नये ज्ञानावांचूनि आणीक । स्वयसिद्ध देख मोक्ष असे ॥४॥
मोक्ष असे साक्षाद अपरोक्ष ज्ञान । सेवक कल्याण रामनामें ॥ ५ ॥

## ४४७. ज्ञानाच्या ६ भूमिका

सप्त भूमिका ज्ञानाच्या । पूर्णपणें जाण साच्या ॥ १ ॥
मोक्षेच्छा प्रथमा भूमी । नित्यानित्य वस्तु धार्मी ॥ २ ॥
करी श्रवण मनना । द्वितीया ती विचारणा ॥ ३ ॥
निदिध्यासन तृतीया । तनुमानसी म्हणा तया ॥ ४ ॥
अपरोक्ष ब्रह्मज्ञान । सत्त्वापत्ति चोथी जाण ॥ ५ ॥
पांचवी वा असंसक्ति । निर्विकल्प होय स्थिति ॥ ६ ॥
चिरकालावस्थापना । षष्ठी पदार्थ - भावना ॥ ७ ॥
तुर्यगा सेवक पूर्ण । परिपाक हो सपूर्ण ॥ ८ ॥

## ४४८. ज्ञानाची सातवी भूमिका म्हणजे ब्रह्मभाव

तिन्ही भूमिका प्रथम । साक्षात्कारा देती नेम ॥ १ ॥
चोथींत हो साक्षात्कार । पचम्यादि मुक्ति थोर ॥ २ ॥
जीवन्मुक्ति अवांतर । तिन्ही भेद वा विचार ॥ ३ ॥
स्वतोत्थान पांचवींत । परोत्थान साहवींत ॥ ४ ॥
नाहीं उत्थान जियेला । तिला सप्तमीचि बोला ॥ ५ ॥
प्रतिभास जग नाहीं । वस्तु होवोनियां राही ॥ ६ ॥
गुरुराज - राम - दास । सेवकाचा ठेवा खास ॥ ७ ॥

## ४४९. माझें भजन करणारांनाहि माझें खरें स्वरूप कळत नाहीं

सर्व माझे दास राम कृष्ण हरि । केशव मुरारी पांडुरंग ॥ १ ॥
पांडुरंग ब्रह्म अनंत नामाचा । नामघोष साचा करिताती ॥ २ ॥
करिताती कामधंदा परमार्थ । मजसी यथार्थ भजताती ॥ ३ ॥
भजताती मज कळेना मी कोण । सेवक कल्याण राम ब्रह्म ॥ ४ ॥

## ४५०. अनंताच्या वाटेवर सर्वच साधक ; सिद्ध नाहींच :

सज्जनसंगतीं सद्गुरूची सेवा । ब्रह्म सुख मेवा साधतसे ॥ १ ॥
साधितो शंकर परमार्थ योग । साधनाचा मार्ग सोडिना तो ॥ २ ॥
सोडिना तो राम नाम सदा मुखीं । अनंताची देखी वाट चाले ॥ ३ ॥
वाट चाले शिव मुक्त – शिरोमणी । इतरांचा गणी कोण लेखा ॥ ४ ॥
कोण लेखा करी सर्वचि साधक । असे जी सेवक कल्याणचि ॥ ५ ॥

# पाकळी १८. गीता ( अभंग ४५१ ते ४६२ )

## ४५१. गीतार्थाचा चक्रव्यूह

एक गीता मूळ सातशेंच श्लोक । ग्रंथ हो अनेक सहस्रचि ॥ १ ॥
अनेक सहस्र गीतेवरी ग्रंथ । झाले, होती, होत आहेतचि ॥ २ ॥
आहेतचि सर्व विद्वान पंडित । परि एकमत कोणाचें ना ॥ ३ ॥
कोणाचें ऐकावें सामान्य जनानें । जो तो खरें म्हणे माझें मत ॥ ४ ॥
माझें मत ऐका म्हणतो श्रीकृष्ण । सेवक कल्याण कृष्णकृपें ॥ ५ ॥

## ४५२. अर्थामध्यें मन घाला

गीतेच्या अर्थासी पहाना कां कोणी । उगीच पठणीं पडतसा ॥ १ ॥
अर्थेविण पाठ व्यर्थ कां करावें । घोकुनि मरावें कासयासी ॥ २ ॥
नाना माप धान्य मोजें काय थोडें । भक्षिलेसे घडे ऐसें नाहीं ॥ ३ ॥
वाहणार अंबे ओझें वाहताती । परि नच खाती एकसुद्धां ॥ ४ ॥
सोनार दागिने बहुत घडितो । काय त्यातें लेतो पाहतांना ॥ ५ ॥
घासामागें घास कासया घालावा । बोकाणा भरावा पुढें कैसे ॥ ६ ॥
सेवक विनंति भल्यानें करितो । गीतार्थ पहातो म्हणोनियां ॥ ७ ॥

## ४५३. निष्कामकर्म करावें कारण कर्मत्याग अशक्य

कर्म आचरावें अलेपकपणें । कर्तव्य करणें म्हणोनियां ॥ १ ॥
म्हणोनियां कर्म – सोडूनि राहणें । कोणासी घडणें नाहीं कदा ॥ २ ॥
नाहीं कदा कर्म – विरहित जीव । नियत कर्मेंव करीतसे ॥ ३ ॥
करितसे कर्म कर्मलेप नाहीं । जीवन्मुक्त पाही ऐसा असे ॥ ४ ॥
ऐसा असे बोध श्रीकृष्ण अर्जुना । सेवक कल्याणा जोडतसे ॥ ५ ॥

## ४५४. भक्ति-ज्ञान हाच गीतार्थ

अर्थ ओढाताण करिती अनेक । तात्पर्य न देख सुलभचि ॥ १ ॥
सुलभ सरळ गीतेचा भावार्थ– । दीपिका यथार्थ ज्ञानेश्वरी ॥ २ ॥
ज्ञानेश्वरी ज्ञानदेव एकनाथ । गीताचि सनाथ सर्वा करी ॥ ३ ॥
सर्वा करीं ज्ञान गीतेचा - प्रकाश । भक्तीसी उदास होऊं नका ॥ ४ ॥
होऊं नका मंद भक्ति - ज्ञानावीण । सेवक कल्याण गीता - भक्ति ॥ ५ ॥

## ४५५. गीतेचें शब्दज्ञान व्यर्थ

गीतेची जयंती सर्वत्र करितीं । परि न वाचती गीताध्याय ॥ १ ॥
गीताध्याय एक वाचीना व्याख्यान । करी प्रवचन सुललित ॥ २ ॥
सुललित बोले साक्षात्कार नाहीं । शब्दज्ञानें पाही डोलवी तो ॥ ३ ॥
डोलवी श्रवण - मनन अभ्यास । साक्षात्कार खास गीतेचाही ॥ ४ ॥
गीतेचा भावार्थ जाणोनि यथार्थ । कल्याण हो हित सेवकाचें ॥ ५ ॥

## ४५६. साक्षात्कार हा गीतार्थाच्या चक्रव्यूहांतून बाहेर पडण्याचा मार्ग

आचार्य अनेक वेदांती सकळ । ज्ञानेश निर्मळ लोकमान्य ॥ १ ॥
लोकमान्य गीता कर्म भक्तिज्ञान । योगाचें विज्ञान नानाविध ॥ २ ॥
नानाविध गीता - तात्पर्य काढिती । आपली ही मति खरी म्हणे ॥ ३ ॥
खरी म्हणे जो तो ओढाताण होते । गीता न जाणे तें भले भले ॥ ४ ॥

भले भले अर्थ-चक्रव्यूह रची । निर्मिती भ्रमचि बुद्धिवादें ॥ ५ ॥
बुद्धिवाद नको साक्षात्कार व्हावा । सेवक स्वभावा स्वात्मानंद ॥ ६ ॥

## ४५७. कर्म - भक्ति - ध्यान - ज्ञान - समन्वय

मानवी जीवन आचार विचार । देव निराकार नी साकार ॥ १ ॥
साकार सगुण निर्गुण श्रीकृष्ण । बोधिले अर्जुन गीतेमार्जीं ॥ २ ॥
गीतेमार्जीं मार्ग मुख्य चार योग । कर्म - भक्ति - योग - ध्यान ज्ञान ॥ ३ ॥
ज्ञान कोणत्याहि मार्गें एक धाम । पावाल विराम समन्वयें ॥ ४ ॥
समन्वय शुद्ध रामकृष्ण हरि । वाचे ये मुरारी सेवक हो ॥ ५ ॥

## ४५८. सर्वांचा उद्धार होतो

तेरावें अध्यायीं भगवंत सांगे । ध्यानाचिया योगें आत्मा पाहे ॥ १ ॥
आत्मा पाहे सांख्य - योग - विचारानें ।
साक्षी नित्य जाणें निर्गुणासी ॥ २ ॥
निर्गुण सगुण ईश्वरा अर्पण । कर्म अनुष्ठान कर्मयोग ॥ ३ ॥
कर्मयोगादिक कांहींच उपाय । नेणुनियां सोय साधक जे ॥ ४ ॥
साधक ऐकून साधन करिती । तेहि उद्धरती श्रद्धायुक्त ॥ ५ ॥
श्रद्धायुक्त मन श्रीराम स्मरण । सेवक कल्याण सर्वत्र हो ॥ ६ ॥

## ४५९. लोकसंग्रहार्थ कर्म आचरावें

त्रिभुवनीं मज कर्तव्य नसेंचि । तथापि कर्मेचि करितों मी ॥ १ ॥
करितों मी कर्म लोकसंग्रहार्थे । कर्मेचि यथार्थ जग चाले ॥ २ ॥
जग चाले जेसें श्रेष्ठ वर्ततो । प्रमाण मानिती लोक सारे ॥ ३ ॥
सारे लोक लावी नीति न्याय मार्गा । स्वयें कर्ममार्गा आचरावें ॥ ४ ॥
आचरावें सर्व ज्ञानी होऊनियां । कर्ममार्ग तया बाधक ना ॥ ५ ॥
बाधक साधक काय ज्ञानियासी । सेवक मानसीं समाधान ॥ ६ ॥

## ४६०. वासुदेवः सर्वम्।

जग नग जीव आत्मा सर्व पूर्ण। जनी जनार्दन वासुदेव ॥ १ ॥
वासुदेव सर्व उच्च नीच काय। ब्राह्मण क्षत्रीय वैश्य शूद्र ॥ २ ॥
वैश्य शूद्र नर नारी सान थोर। जात गोत्र भार वृथा दंभ ॥ ३ ॥
वृथा दंभ विद्या धन मान कुल। सदाचार भूल तोरा ताठा ॥ ४ ॥
तोरा ताठा सर्व सोडोनी श्रीराम। पहा सुखधाम अणुरेणूं ॥ ५ ॥
अणुरेणूं पूर्ण श्रीराम भरला। सेवका भेटला जनीं वनीं ॥ ६ ॥

## ४६१. वस्तुमात्रीं आत्माराम

शब्द स्पर्श रूप रस गंधज्ञान। त्याहून मी भिन्न आत्माराम ॥ १ ॥
आत्मारामा मज नसेचि इंद्रिय। संबंध विषय प्रवृत्ति न ॥ २ ॥
प्रवृत्त इंद्रिय विषय ग्राहक। बाधक साधक नाहीं मातें ॥ ३ ॥
नाहीं मातें बाह्य अंतरीं संबंध। नित्य शुद्ध बुद्ध आत्माराम ॥ ४ ॥
आत्माराम एक सर्वत्र भरला। सेवकें पाहिला वस्तुमात्रीं ॥ ५ ॥

## ४६२. सर्वधर्मान्परित्यज्य।

सर्व धर्म त्याग, मातें ये शरण। तुज उद्धरीन हेळामात्रें ॥ १ ॥
हेळामात्रें सर्व उद्धरीन जग। कोणा न वियोग माझा कदा ॥ २ ॥
माझा आत्मभाव तूंचि परिपूर्ण। वायां मी-तूं-पण लया जाय ॥ ३ ॥
जाय लया सर्व द्वितीय भावना। कृष्ण हा अर्जुना सांगतसे ॥ ४ ॥
सांगतसे नरा नारायण होय। सेवक उपाय गीताधर्म ॥ ५ ॥

## पाकळी १९. संतस्तवन ( अभग ४६३ ते ४८९ )

### ४६३. प्रल्हाद

कयाधूच पोटीं सुत गुणनिधी । देखोनि सुखाब्धि दैत्येंद्र हो ॥ १ ॥
म्हणे याचें चिन्ह सुदर साजिरें । दीर्घायु होवो रे दीपक हा ॥ २ ॥
व्यापक - सेवक - कल्याण जीवाचें । परि या दैत्याचें मरणचि ॥ ३ ॥

### ४६४. सती अनसूया

जालों होतों सत्त्व हराया । इनें केलें आम्हा वाया ॥ १ ॥
देवपण क्षणार्धात । सती हरी सुनिश्चित ॥ २ ॥
सेवकाची ही विनती । नको गर्व दभ मस्ती ॥ ३ ॥

### ४६५. सताचें कार्य

अधर्म वाढला धर्ममार्ग गेला । म्हणोनिया आला सेवक हा ॥ १ ॥
सेवका सेवणें रामनाम भक्ति । जड जीवा मुक्ति रामनामें ॥ २ ॥
रामनाम गुढी उभारोनी वाहे । ब्रह्मस्थिती राहे सर्वकाळ ॥ ३ ॥
सर्वकाळ जना सुखमय मार्ग । दावोनिया भर्ग उद्धरणें ॥ ४ ॥
उद्धरणें अज्ञ स्त्री शूद्र सकल । सेवक पातला कल्याणार्थ ॥ ५ ॥

### ४६६ ज्ञानी संत

सत ज्ञानदेव नामदेव पूर्ण । जनार्दन खूण एकनाथ ॥ १ ॥
एकनाथ जनीं जनार्दन राम । सत तुकाराम रामदास ॥ २ ॥
*रामदास खास भानुदास कस । भक्तिचा उल्हास रामकृष्ण ॥ ३ ॥*
रामकृष्ण हरि वाचे मनीं ध्यानीं । सर्व जनीं वनीं पाडुरग ॥ ४ ॥
पाडुरगमय सत अतर्बाह्य । सेवक सबाह्य सतकृपा ॥ ५ ॥

## ४६७. परि ते स्वरूपीं मिळाले — संत

देवापाशीं भेद नाहीं नर नारी । सदा सर्वांवरी कृपावंत ॥ १ ॥
कृपावंत रामकृष्ण पांडुरंग । भक्त अंतरंग एकरूप ॥ २ ॥
एकरूप एका तुका - राम - दास । मुक्ताबाई खास संत श्रेष्ठ ॥ ३ ॥
संतश्रेष्ठ मीरा सखू जनाबाई । आक्का वेणाबाई रामभक्त ॥ ४ ॥
भक्त राम कृष्ण हरि वाचे गाई । विठाई रामाई सेवतसे ॥ ५ ॥
सेवतसे संत साच सर्वोत्तम । सेवक उत्तम सीताराम ॥ ६ ॥

## ४६८. कांहीं भक्तश्रेष्ठ

ज्ञानोबा ज्ञानोबा विसोबा नामोबा । एकोबा निळोबा तुकाराम ॥१॥
तुकोबा गोरोबा चोखोबा कान्होबा । भानुदास बाबा जनार्दन ॥ २ ॥
जनार्दन जनीं पांडुरंग मनीं । वासुदेव ध्यानीं संतश्रेष्ठ ॥ ३ ॥
संत श्रेष्ठ सुर-दास नि कबीर । झाले भक्तवर अपारचि ॥ ४ ॥
अपार आनंद रामकृष्ण - भक्ता । नामामृतसक्ता सेवकांसी ॥ ५ ॥

## ४६९. ज्ञानदेवांची थोरवी

ज्ञानदेव ज्ञानराज ज्ञानेश्वरी । ज्ञानाचे विचारी परिपूर्ण ॥ १ ॥
परिपूर्ण ज्ञान - देव पांडुरंग । ब्रह्मानंद रंग रंगलासे ॥ २ ॥
रंगला श्रीरंग अनंग असंग । अखंड अभंग आत्माराम ॥ ३ ॥
आत्माराम कृष्ण हरि नारायण । मुखीं मनीं पूर्ण सीताराम ॥ ४ ॥
सीताराम ज्ञान संपूर्ण सेवक । ज्ञाना - ज्ञान देख ज्ञानदेव ॥ ५ ॥

## ४७०. अवतार पांडुरंग

रेडा वेद बोले भिंत स्वयें चाले । ज्ञान - देवें लीलें घडविलें ॥ १ ॥
घडविलें चांग - देव ज्ञाननिष्ठ । कनिष्ठ वरिष्ठ सहजचि ॥ २ ॥
सहज स्वरूप स्वतः सिद्ध सत्य । पूर्ण ज्ञानादित्य ज्ञानेश्वर ॥ ३ ॥
*ज्ञानेश्वर ज्ञान - देव महाराज । विठ्ठल सहज स्वयंपूर्ण ॥ ४ ॥*
स्वयंपूर्ण ब्रह्म साक्षादपरोक्ष । सेवक अलक्ष ज्ञानदेव ॥ ५ ॥

## ४७१. ज्ञानेश्वरमाहात्म्य

ज्ञानदेव माझा सखा पांडुरंग । तयासी साष्टांग नमस्कार ॥ १ ॥
नमस्कार भावें मन विसर्जन । ज्ञानेश्वरी जाण मननेंचि ॥ २ ॥
मनन नमन ज्ञानदेव पूर्ण । सेवक कल्याण ज्ञानेश्वरी ॥ ३ ॥

## ४७२. ज्ञानेश्वरमाहात्म्य

ज्ञानोबा माऊली ज्ञानोबा साऊली । ज्ञानोबा पावली माय माझी ॥ १ ॥
माय माझी गुरू ज्ञानदेव राम । कृष्ण हरि धाम ज्ञानदेव ॥ २ ॥
ज्ञानदेव संत सज्जन सोयरा । नेतसे माहेरा ज्ञानदेव ॥ ३ ॥
ज्ञानदेव विष्णु पांडुरंग पूर्ण । सेवक कल्याण सीताराम ॥ ४ ॥

## ४७३. ज्ञानदेवप्रशस्ति

ज्ञानियां वरिष्ठ वयानें कनिष्ठ । पूर्ण ब्रह्मनिष्ठ ज्ञानेश्वर ॥ १ ॥
ज्ञानेश्वर ज्ञानदेव ज्ञानराज । गुरु महाराज सर्वोत्तम ॥ २ ॥
सर्वोत्तम राम कृष्ण हरि वाचें । पांडुरंग नाचे मागें पुढें ॥ ३ ॥
मागें पुढें राम दश दिशा हरि । विश्व चराचरीं आत्माराम ॥ ४ ॥
आत्माराम ज्ञानदेव पांडुरंग । असंग अभंग सेवक हो ॥ ५ ॥

## ४७४. संतश्रेष्ठ ज्ञानदेव

ज्ञानदेव ज्ञानी चांगदेव योगी । पांडुरंग भोगी एकनाथ ॥ १ ॥
एकनाथ शांत नामदेव राम - । रत तुकाराम जनीं सेवा ॥ २ ॥
सेवा जनीं करी पांडुरंग दळी । भक्तातें सांभाळी सर्व भावें ॥ ३ ॥
सर्वभावें दास वैराग्य प्रखर । समर्थ साचार रामदास ॥ ४ ॥
रामदास रामकृष्ण हरि वाचें । सदोदित साचें सेवकाचें ॥ ५ ॥

## ४७५. ज्ञानेश्वरांचा चमत्कार

आतां काय त्याचें ज्ञानदेव बोले । दुःख दूर झालें शोक हेतू ॥ १ ॥
हेतू स्नुषा पुत्र भेटले जिवंत । चुकलासे अंत रामरूपें ॥ २ ॥
रामरूपें नाम पांडुरंग सोय । सेवक निर्भय राही बापा ॥ ३ ॥

## ४७६. ज्ञानेश्वरीची महती

ॐ नमोजी आद्या भावार्थ दीपिका । ज्ञानेश्वरी देखा स्वात्मसुखा ॥१॥
स्वात्मसुख गीता भाष्य ज्ञानेश्वरी । अलंकार भारी ब्रह्मानंद ॥ २ ॥
ब्रह्मानंद ज्ञान कर्म उपासना । निरुपम जाणा ग्रंथश्रेष्ठ ॥ ३ ॥
ग्रंथश्रेष्ठ ज्ञानदेवी ज्ञानेश्वरी । ओवी एक तरी अनुभवा ॥ ४ ॥
अनुभवसुख सेवक कल्याण । ज्ञानेश्वर पूर्ण पांडुरंग ॥ ५ ॥

## ४७७. ज्ञानेश्वर – ज्ञानेश्वरी

ज्ञानराज योगीराज । भक्तराज महाराज ॥ १ ॥
ज्ञानेश्वर ज्ञानदेव । पांडुरंग एकमेव ॥ २ ॥
ज्ञानेश्वरी ज्ञानदेवी । अनुभवा एक ओवी ॥ ३ ॥
ॐ नमोजी आद्या ऐसें । लागतसें ज्ञान – पिसें ॥ ४ ॥
ज्ञान – पिसें ज्ञान देव । स्वात्म – सेवक स्वभाव ॥ ५ ॥

## ४७८. चार अलौकिक भावंडें

निवृत्ति ज्ञानोबा सोपान मुक्ताबाई । ध्यातसे विठाई पांडुरंग ॥ १ ॥
पांडुरंग जनीं वनीं मनीं ध्यानीं । सदा समाधानीं सान पोरें ॥ २ ॥
पोरें सान परी भित – घोडा चाले । चांगदेव झाले फजीतचि ॥ ३ ॥
फजित योगिया मुक्ता उपदेशी । पासष्टी ज्ञानासी वटेश्वर ॥ ४ ॥
वटेश्वर योगी चांगदेव भक्त । केला जीवन्मुक्त सान पोरें ॥ ५ ॥
सान पोरें थोर पांडुरंगरुपें । जाळी महा पापें रामकृष्ण ॥ ६ ॥
रामकृष्ण हरि पांडुरंग गावा । सेवा मेवा खावा सेवकानें ॥ ७ ॥

## ४७९. एकनाथांची शांति

गरीब ब्राह्मण कोंकणचा आला । मुलाच्या मुंजीला द्रव्यापेक्षी ॥ १ ॥
द्रव्यापेक्षी तया वदती समस्त । कुटिल ग्रामस्थ कार्य एक ॥ २ ॥
एकनाथा कोप निर्माण कराल । दोनशें पावाल तात्काळचि ॥ ३ ॥
तात्काळ शिरला पादत्राणयुक्त । देवगृहां आंत नाथ शांत ॥ ४ ॥
शांत नाथ पूर्ण ब्रह्मचि केवळ । सेवक सोज्वळ कल्याणचि ॥ ५ ॥

## ४८०. ब्राह्मणो मम दैवतम्

उठोनियां नाथ ब्राह्मणा वंदन । भूदेवदर्शन भावें घेती ॥ १ ॥
घेती मोठें भाग्य म्हणोनी पूजीती । परिपूर्ण मूर्ति देवाची ही ॥ २ ॥
देवाची ही मूर्ति सगुण साकार । सेवक साचार कल्याणचि ॥ ३ ॥

## ४८१. एकनाथांची शांति

गिरिजाबाई वाढे ब्राह्मणा भोजन । करोनियां मन दृढविप्र ॥ १ ॥
विप्र धरी कर सुशील मातेचा । झिडकरी साचा तदा साध्वी ॥ २ ॥
साध्वीनाथ बोले हरि बाळ आहे । समजोनि पाहे पांडुरंग ॥ ३ ॥
पांडुरंग सर्व अंतरीं भरला । कल्याण भेटला सेवकासी ॥ ४ ॥

## ४८२. नाथांच्या शांतीनें ब्राह्मणास पश्चात्ताप

काय सांगू नाथा द्रव्यासाठीं सर्व । केला म्यां अपाव अज्ञपणें ॥ १ ॥
रक्षी एकनाथा अपराध कोटी । घालोनियां पोटीं तारी मज ॥ २ ॥
करावें कल्याण सेवका धरोनी । करी जनीं वनीं समाधान ॥ ३ ॥

## ४८३. भक्त एकनाथ खरे सुधारक

अंत्यजाचें पोर कडेवर घेती । एकनाथ होती सुधारक ॥ १ ॥
सुधारक खरे ब्राह्मणा आधींच । अंत्यजास साच वाढिती हो ॥ २ ॥
वाढिती श्राद्धान्न भूतदया पूर्ण । जनीं जनार्दन जाणोनियां ॥ ३ ॥
जाणोनियां वर्म असामान्य धक्का । दिलासे अनेका एकनाथें ॥ ४ ॥
एकनाथा दीन – जन – घोर फार । सेवका अपार तळमळ ॥ ५ ॥

## ४८४. समर्थांची धन्यता

धन्य त्याची माता धन्य त्याचा पिता । धन्य हा तत्त्वता दास पाहे ॥ १ ॥
धन्यचि साधन धन्य जनस्थान । धन्य तप ज्ञान नित्यनेम ॥ २ ॥
धन्य शुद्धमार्ग धन्य तो संसर्ग । रामदास भर्ग धन्य साच ॥ ३ ॥
धन्य रघुवीरदास कृपाघन । समर्थ कल्याण धन्य धन्य ॥ ४ ॥
धन्य रघुनाथ अनाथा सनाथ । करी दीनानाथ दीनबंधु ॥ ५ ॥

धन्य रामदास मुळीं नाहीं भेद । कल्याण निर्द्वंद्व दास राम ॥ ६ ॥
धन्य हा सेवक कल्याणसेविता । नसे भीड आतां मायिकाची ॥ ७ ॥

## ४८५. समर्थ मातेला नेत्र देऊन दर्शन देतात

आश्चर्य जहालें नेत्र सुधारले । मातेनें पाहिलें नारायणा ॥ १ ॥
नारायण धारी लंगोटी जपमाळा । मुखीं तेजकळा अघटित ॥ २ ॥
अघटित सर्व रामरूपा ज्याशीं । सेवक पदासी लुब्ध होतो ॥ ३ ॥

## ४८६. समर्थांना राम – दर्शन

सर्वांग थरारे दातखीळ बैसे । ब्रह्मांडची जैसें कोसळलें ॥ १ ॥
शीतनिवारण दिव्य वस्त्र वेष्टी । निज कृपा दृष्टी रामराय ॥ २ ॥
रंगानें शोभलें हुर्मुजी सारिखें । राम – दासी देखे दिव्य तेजें ॥ ३ ॥
सव्य करीं पत्र राम मुद्रांकित । वाम पाणीं देत राम – बाण ॥ ४ ॥
सेवका समाधि अपूर्व दर्शन । राम अंतर्धान तात्काळचि ॥ ५ ॥

## ४८७. श्रीरामकृष्णांना दर्शन

आई आई आई ! दर्शन तूं देई । व्याकुळता होई अंतरींची ॥ १ ॥
अंतरींची हांक ऐके काली देव । येई एका एक प्रवेशो ही ॥ २ ॥
प्रवेशीच साच रामकृष्ण पाहो । आई आई पाहि मी नेणेंचि ॥ ३ ॥
नेणे रामकृष्ण म्हणे आई आई । विश्वभान नाहीं भावावस्था ॥ ४ ॥
भावावस्था देई सेवका कल्याण । एक रामकृष्ण परिपूर्ण ॥ ५ ॥

## ४८८. श्रीरामकृष्णांना जगन्मातेचा आदेश

विचारी आईस भावावस्था खास । जगदंबा त्यास सांगतसे ॥ १ ॥
' कर जा साधन शिकविण्या तुला । संन्यासी आणिला आज येथें '॥२॥
मातारूपें सर्व सेवका कल्याण । सच्चित्सुखघन रामकृष्ण ॥ ३ ॥

## ४८९. मातामय श्रीरामकृष्ण

ध्यान करूं जातां नामरूप येई । सच्चिद्घन आई उभी ठाके ॥ १ ॥
कांचेचा तुकडा भ्रूमध्यें मारितां । मनीं एकाग्रता जगदंबा ॥ २ ॥
जगदंबारूपें सेवक कल्याण । समाधि निधान रामकृष्ण ॥ ३ ॥

# पाकळी २०. धर्माची ग्लानी व हिंदुसंघटना

(अभंग ४९० ते ४९९)

## ४९० धर्माला ग्लानी आली

आक्रमण सर्व हिंदु धर्मावरी । करिती, विचारी कांहीं मनीं ॥ १ ॥
मनीं कांहीं लाज म्हणविण्या हिंदु । वाटतेचि हिंदु राज्यकर्त्या ॥ २ ॥
राज्यकर्ते नेते पुढारी हिंदूच । हिंदुधर्मासच डावलिती ॥ ३ ॥
डावलिती धर्म न्याय नीति सारी । खून मारामारी चोरी वाढे ॥ ४ ॥
वाढे चोरी हिंसा स्वार्थांध सगळे। राज्यांत या मिळे सुख कोणा ॥ ५ ॥
कोणा सुख नाहीं रडतीच देव । सेवक सदैव पहातसे ॥ ६ ॥

## ४९१. खोट्या विश्वबंधुत्वाच्या भ्रमानें स्वधर्माची उपेक्षा

बुद्ध म्लेंच्छ खिस्त आक्रमण सदा । हिंदूसी आपदा सर्वकाळ ॥ १ ॥
सर्वकाळ सर्वां मुक्तद्वार आहे । द्रव्य सत्ता पाहे पाठीशीं त्या ॥ २ ॥
पाठीशीं न कोणी हिंदु नावडता । काय स्वतंत्रता जाच करी ॥ ३ ॥
करी जाच हिंदु, इतरांशीं गोड । जागतिक वेड प्रतिष्ठेचें ॥ ४ ॥
प्रतिष्ठा जगती, घरा लागे आग । विश्वीत सांग ऐसा कोण ॥ ५ ॥
कोण ऐसा जगीं श्रीरामावांचून । सेवक कल्याण राम जनीं ॥ ६ ॥

## ४९२. धर्माला त्राता नाहीं

कोण ऐसा जया हिंदुधर्मचाड । नाना मत बंड वाढलेसे ॥ १ ॥
वाढला अधर्म हिंसा खून चोरी । लूट मारामारी सर्वत्र हो ॥ २ ॥
सर्वत्र श्रीराम देखतां विराम । हाचि हिंदुधर्म सर्वश्रेष्ठ ॥ ३ ॥
सर्वश्रेष्ठ राम सर्वांतरीं पूर्ण । सेवक कल्याण आत्माराम ॥ ४ ॥

## ४९३. यतींची अधोगति

न्यायालयीं जाती यति म्हणविती । आचार्य मांडती गुरुशिष्य ॥ १ ॥
गुरुशिष्या वाद भांडण सर्वदा । जनाची आपदा काय वारी ॥ २ ॥
वारी काय कोणा द्रव्यलाभासाठीं । उठा उठी गांठी न्यायालय ॥ ३ ॥
न्यायालयीं गेलें धन वय बुद्धि । संन्यासी मी शुद्धि आहे कोणा ॥ ४ ॥
कोणा आहे स्वार्थ सामान्यचि वरे । थोरपण उरे यतिधर्मे ॥ ५ ॥
यतिधर्म काय ! सर्व नारायण । सेवक-कल्याण वादातीत ॥ ६ ॥

## ४९४. धर्मश्रद्धाहीनांची अधोगति

बाह्य आक्रमण अंतराक्रमण । हिंदु मन जाण पोखरलें ॥ १ ॥
पोखरले जन सुशिक्षित पूर्ण । अश्रद्धा निर्माण देवधर्मीं ॥ २ ॥
देवधर्मीं नाहीं श्रद्धा निष्ठा कांहीं । पूज्य बुद्धी नाहीं मायबापीं ॥ ३ ॥
मायबाप गुरु यांचा अनादर । शिक्षित साचार उच्छृंखल ॥ ४ ॥
उच्छृंखलपणें सौख्य ना कोणासी । भजा स्वधर्मासी गीता सांगे ॥ ५ ॥
गीता सांगे सर्वा स्वधर्मीं मरण । सेवक कल्याण देवधर्म ॥ ६ ॥

## ४९५. धर्माचें रक्षण करा

नेते राज्यकर्ते लाजती स्वधर्मा । घाली हिंदु धर्मावरी घाला ॥ १ ॥
घाला घाली हिंदु स्वतःचि असोनि । पुढारी म्हणोनि धर्मातीत ॥ २ ॥
धर्मातीत राज्य हिंदूंचाची छळ । ईसाईची झळ लागतसे ॥ ३ ॥
लागले केरळीं ईसाई रोपटें । समूळ उपटे ऐसा कोण ॥ ४ ॥
कोण ऐसा रडा आचार्य केरळीं । जन्मले ते वेळीं धर्मरक्षा ॥ ५ ॥
रक्षा धर्म टाहो फोडितो सेवक । कोणी तरी एक साह्य करा ॥ ६ ॥

## ४९६. हिंदुसंस्कृतीच्या पुनरुज्जीवनासाठीं संघटना करा

हिंदूंचें जीवन हिंदूंची संस्कृती । आचार पद्धती रक्षावी ती ॥ १ ॥
धान्यें धनें फळें वहरली भूमी । खनिजादि नामी प्राणिजही ॥ २ ॥
आदिभौतिक ही संपत्ती संपूर्ण । कोणा अभिमान याचा नसे ॥ ३ ॥
अध्यात्मिक ज्ञानी आचार्य समर्थ । तुकाराम व्यर्थ झाले काय ॥ ४ ॥

वेदशास्त्रस्मृति पाश्चात्य पहाती । आमची ती मती अन्य ठाई ॥ ५ ॥
संघटणा करा हिंदु रक्षण्यासी । सेवक सर्वांसी विनवीतो ॥ ६ ॥

## ४९७. हिंदुसंघटनेची आवश्यकता

सांखळी टिकण्या सर्व दुवे एक । सांपळींत देख असावेत ॥ १ ॥
दुवा नष्ट होतां सांखळी तुटते । शक्ति कमी होते सांखळीची ॥ २ ॥
सांखळीचा दुवा प्रत्येक अभंग । असावा सर्वांग बलवान ॥ ३ ॥
हिंदुस्थान हिंदूचाच खास असे । हिंदू एक तसे सर्व जाणा ॥ ४ ॥
याचाचि आचार विचार समस्त । नको व्यस्ताव्यस्त दुजें कांहीं ॥ ५ ॥
हिंदु संघटणा संघ एक शक्ति । सेवकांची वस्ती संघटणीं ॥ ६ ॥

## ४९८. संघटनेनें हिंदुधर्माची दुरवस्था दूर करा

पहा हल्लीं देव-धर्म बुडाला हो । अवघा जाला हो एकंकार ॥ १ ॥
कुळ जात याती मानीना कांहींच । ब्राह्मण खासच ऐसे जाले ॥ २ ॥
इराण-हॉटेली चहापान त्यासी । अंडी बडी खासी आवडते ॥ ३ ॥
ब्राह्मण भ्रष्टून सर्वां भ्रष्टविती । उघडी फजिती स्वधर्माची ॥ ४ ॥
धर्महिंदु श्रेष्ठ टिकावा हा जरी । संघटणा तरी आधीं करा ॥ ५ ॥
संघटना संघ कार्य हें विशाल । चोखाळा सेवक मार्ग पूर्ण ॥ ६ ॥

## ४९९. संघटनेनें हिंदूंची दुरवस्था नष्ट करा

इतिहास सांगे पर आक्रमण । होण्यापूर्वी जाण हिंदुस्थान ॥ १ ॥
हिंदूंचेंच स्थान सुवर्णभू खास । परि हल्लीं त्यांस फार त्रास ॥ २ ॥
हिंदु म्हणोनियां जगणें कठीण । स्वकीयांकडून हास्य होतें ॥ ३ ॥
असें कां हो जालें? शक्तिबळ गेलें । शिक्षणें घरलें सर्व हिंदू ॥ ४ ॥
अध्यात्मिक आणि आदिभौतिकही । सर्व शक्ति पाही लया गेल्या ॥ ५ ॥
संघटना संघ शक्ति वाढवावी । सेवक विनवी सेवकांसी ॥ ६ ॥

# पाकळी २१. विविधविषय ( अभंग ५०० ते ५२५ )

## ५००. नारायण कोणाचें ध्यान करितो

नारद पुसती देवा नारायणा । ध्यानमग्न जाणा भक्ति करी ॥ १ ॥
करी भक्ति सर्व लोकही तुमची । आपण कोणची करीतसा ॥ २ ॥
करीत ईश्वर ध्यान सर्वकाळ । कठीण सोज्वळ साक्षात्कार ॥ ३ ॥
साक्षात्कार शब्दें सांगता नयेचि । धरी साधनाचो कांस पूर्ण ॥ ४ ॥
कांस पूर्ण धरी ज्ञान प्राप्त होण्या । कल्याण साधण्या सेवक हो ॥ ५ ॥

## ५०१. नारायणाचें उत्तर – अधिकार प्राप्त करून घे

श्वेतद्वीपीं जाई परमार्थीं पाही । साधक पांचही निरीक्षी वा ॥ १ ॥
निरीक्षण करी परतोनी येई । ज्ञान योग्यता ही प्राप्त करी ॥ २ ॥
प्राप्त करी यत्नें पूर्वतयारीसी । अवश्य सर्वांसी प्रथमाचि ॥ ३ ॥
प्रथम विचारूं नको आत्मज्ञान । घेईजे जोडून अधिकार ॥ ४ ॥
अधिकारियासी ईश्वरप्राप्तीचा । उपदेशी साचा मार्ग शुद्ध ॥ ५ ॥
मार्गशुद्ध भक्ति सेवका कल्याण । म्हणे नारायण नारदासी ॥ ६ ॥

## ५०२. नारदानें काय पाहिलें ?

बृहस्पति-मन संहिता ब्राह्मण । यज्ञ कांडीं पूर्ण प्रवृत्ति हो ॥ १ ॥
प्रवृत्ति म्हणावी ईश दर्शन न । द्वित त्रित पूर्ण तपोनिष्ठ ॥ २ ॥
तपोनिष्ट काया शोषण केलेंसें । देहदंडें नसे ईशप्राप्ति ॥ ३ ॥
ईशप्राप्ति वसुउपरिचरासी । सद्भक्ति मानसी शुद्ध भक्त ॥ ४ ॥
शुद्धभक्ति माना देवाचें दर्शन । सेवक कल्याण भक्तिमातें ॥ ५ ॥

## ५०३. नारद ज्ञानाधिकारी झाले

साक्षात्कारमार्ग आक्रमावयासी । प्राप्त नारदासी अधिकार ॥ १ ॥
अधिकार प्राप्त करूनियां आला । पूर्ण गौरवीला नारायणें ॥ २ ॥

नारायणें त्यास ' एकान्तकोत्तम '। नांवानें प्रथम संबोधिलें ॥३॥
संबोधिलें आत्मज्ञान नारदासी । समाधान त्यासी पूर्ण झालें ॥४॥
पूर्ण आत्मज्ञान एकांतभक्तीनें । कल्याण लाभणें सेवकासी ॥५॥

## ५०४. कुराणांतील खरा धर्म मुसलमानी नर मानीत नाहीं

अहिंसा परम हिंदूंचा धर्म तो । जाणोनि काटतो म्लेंच्छ वेडा ॥१॥
दुसऱ्या छळणें हा हो कोण धर्म । न च जाणी वर्म यवन तो ॥२॥
काफरा कापावें हो ना म्लेंच्छ जरी । कुराणीं न परी ऐसें आहे ॥३॥
कुराण सर्वदा नमाज पढावे । कोणा न छळावे हाचि धर्म ॥४॥
सेवक कल्याण सर्वचि साधीतो । राजा म्हणा हो तो ऐसा वागे ॥५॥

## ५०५. जंगम - संशय - छेद

योगेश्वर सारे समजे अंतरीं । जंगमाचा भारी दुष्टावा तो ॥१॥
संत कृपें झाडी दुर्गुण विनोदें । मठा येती मोदें दिंडीसह ॥२॥
टाळ विणा वाजे मृदंग खणाणी । अभंग ते वाणी गर्जतसे ॥३॥
सेवक कल्याण चांगदेव भक्त । सगुण सुव्यक्त संत ब्रह्म ॥४॥

## ५०६. जंगम गर्वहरण

दासाचा सांभाळ करी पांडुरंग । योग क्षेम सांग चालवितो ॥१॥
माया अघटित पटीयसी देवा । घटनाजी सेवा ध्यानरूपें ॥२॥
वमतां लिंगासी निवाडा तो झाला । जगम मनाला विस्मय हो ॥३॥
सेवक कल्याण संत हें माहेर । करिती अहेर लिंगदानें ॥४॥

## ५०७. समर्थाचें राजकारण

गुह्य – बुद्धि गुप्त राजकारणासी । धन्य श्रीरामासी स्थापियेलें ॥१॥
स्थापियेलें बल – भीम महा पर्वे । ' बलमुपास्स्व ' श्रुति बोले ॥२॥
बोले श्रुति शक्ति युक्ति फळा आली । स्थापना हो झाली स्वधर्माची ॥३॥
स्वधर्म स्वराज्य दिव रामदास । मराठ देशास सोडविलें ॥४॥
सोडविलें बंद म्लेच्छ दुर्जनांचे । सेवक हो साचे आनंदित ॥५॥

## ५०८. स्वातंत्र्यमहती

शतगुणें जाच परतंत्रा पहा । स्वतंत्रता महा - सुख असें ॥ १ ॥
सुख ज्यास हवें राम - दास व्हावें । स्वतंत्र करावें आर्यावर्ता ॥ २ ॥
आर्यावर्ता आतां नको पारतंत्र्य । मिळवा स्वातंत्र्य अखंडित ॥ ३ ॥
अखंडित किती परकीय छळ । सदा तळमळ सेवकासी ॥ ४ ॥

## ५०९. दासबोधाची श्रेष्ठता

नका करूं खटपट । पहा दासबोध नीट ॥ १ ॥
नाना गीता भागवत । वेद सिद्धांत धादांत ॥ २ ॥
कर्म उपासना ज्ञान । राजकारण गहन ॥ ३ ॥
मार्ग सांपडे सुगम । नको साधन दुर्गम ॥ ४ ॥
जाते अज्ञानादि भ्रांती । शीघ्र होते ज्ञानप्राप्ती ॥ ५ ॥
तुटे संशयाचें मूळ । क्रिया पालटे तात्काळ ॥ ६ ॥
नाना दोष लया जाती । पतितही धन्य होती ॥ ७ ॥
भाव असे ज्यासी जैसा । लाभ होय तया तैसा ॥ ८ ॥
सेवका आश्रय एक । ग्रंथराज साच देख ॥ ९ ॥

## ५१०. दासबोधापासून लाभ

दासबोध आत्माराम । सर्वां पूर्ण दे आराम ॥ १ ॥
उपदेश शुद्ध केला । अधिकारी जनतेला ॥ २ ॥
ज्यासी अधिकार जैसा । त्यासी उपदेश तैसा ॥ ३ ॥
ओळखोनी अधिकार । करा साधन अपार ॥ ४ ॥
साधक ते सिद्ध होती । संशय - रहित स्थिती ॥ ५ ॥
प्राप्त होय आत्मज्ञान । सारासार विचारून ॥ ६ ॥
सेवा सेवकें करावी । कृपा समर्थें करावी ॥ ७ ॥

## ५११. सोंवळें ओंवळें हा भ्रम

सोंवळें ओंवळें स्पृश्यास्पृश्य काय । सर्व राममय जाण बापा ॥ १ ॥
जाण बापा किडे रेशमाचे मरे । सोंवळेंचि करे रेशमाचें ॥ २ ॥

रेशमाचें वस्त्र सोंवळें म्हणती । खादी शुद्ध सुती ओंवळी हो ॥ ३ ॥
ओंवळीं हो मनें सर्वचि ओंवळें । अंत्यजादि नळें पाणी सोडी ॥४॥
पाणी सोडी शुद्ध देव भावावरी । पूजा करी वरी मंत्रघोषें ॥ ५ ॥
मंत्रघोष वृथा मन ना सोंवळें । जन न ओंवळें जनार्दन ॥ ६ ॥
जनार्दन सर्व चैतन्य स्वरूप । कल्याण अमूप सेवकाचें ॥ ७ ॥

## ५१२. देवाला विटाळ होणें शक्य आहे का ?

स्पर्शतां विटाळें ऐसा कैसा देव । प्रक्षाळुनी जीव शुद्ध करी ॥ १ ॥
शुद्ध करी पाणी देवाहून श्रेष्ठ । कधीं हो वरिष्ठ ज्ञान नाहीं ॥ २ ॥
ज्ञान नाहीं शुद्ध संशयचि सर्व । संशयानें देव पाविजेना ॥ ३ ॥
पाविजे स्वरूप ज्ञान निःसंशय । आत्मा रामराय सेवकाचा ॥ ४ ॥

## ५१३. ब्रह्मज्ञानीच खरा सोंवळा

ब्रह्मधर्मीचा ब्राह्मण । याती कुळ नाहीं जाण ॥ १ ॥
नाहीं सोंवळें ओंवळें । स्पर्शतांहि न विटाळें ॥ २ ॥
राम सोयरा धायरा । माय बाप बंधू खरा ॥ ३ ॥
आंत बाहेरी संपूर्ण । जन तोचि जनार्दन ॥ ४ ॥
करी सेवा राम जन । पूर्ण सेवक कल्याण ॥ ५ ॥

## ५१४. सर्वभाषा देवाला सारख्याच

संस्कृत भारती देवें केली काय । हा अपौरुषेय वेद म्हणे ॥ १ ॥
म्हणे वेद सर्व ॐकार स्वरूप । भाषेचें अमूप कोणत्याही ॥ २ ॥
कोणत्याही भाषें रामस्तुती केली । श्रीरामा पावली पूर्णपणें ॥ ३ ॥
पूर्णपणें सर्व भाषेमाजीं एक । रुची जाण एक सर्वांसी ॥ ४ ॥
सर्वांसी राम नाम गोड फार । सेवका आधार राम ब्रह्म ॥ ५ ॥

## ५१५. गोकुळचा चोर ( गौळण )

गोकुळचा चोर कान्हा । सांपडला बाई ॥ ध्रु० ॥
दहीं दूध चोरुनी खातो । घट लोण्याचा फोडितो ॥

शिंके तोडुनी टाकितो । गोप मित्र माई ॥ १ ॥
गोपिकांसी हा मारितो । धूळ डोळियां फेकीतो ॥
धरूं जातां पळुनी जातो । सांपडत नाहीं ॥ २ ॥
खोडकर तुझे बाळ । मनमोहन लडीवाळ ॥
सर्गे गोपाळांचा मेळ । यशोदा ग आई ॥ ३ ॥
भवनाटक सूत्रधारी । सदा माझे हृद्‌यांतरीं ॥
सेवकातें मुक्त करी । कल्याण आई ॥ ४ ॥

## ५१६. ईश्वराचें स्वरूप ( गौळण )

गोकुळचा चोर कान्हा । सांपडला आतां ॥ ध्रु० ॥
इंद्रियांचा राजा मन । कृष्ण मनाचेंहि मन ॥
*प्राणाचाहि प्राण जाण । सर्व जगद्भर्ता ॥ १ ॥*
मऊ लोण्याहून पूर्ण । वज्राहून हा कठीण ॥
सूक्ष्मतम अणूहून । चिन्मय सत्ता ॥ २ ॥
नित्य शुद्ध बुद्ध मुक्त । वेद शास्त्र गीता उक्त ॥
सच्चिद्घन सुखयुक्त । ब्रह्मची तत्त्वतां ॥ ३ ॥
स्वप्रकाश स्वात्माराम । सर्ववर्जित पूर्णकाम ॥
सर्वभूतांचा विराम । हृदयस्थ ज्ञाता ॥ ४ ॥
ऋषी मुनी ध्याती गाती । भरलासे श्रीजगतीं ॥
स्थिति-गति-नति-मति । कल्याण-दाता ॥ ५ ॥
जाणें येणें नाहीं कोठें । नभाहून व्यापक मोठें ॥
मन वाचा सर्व कुंठे । स्वरूप वर्णितां ॥ ६ ॥
परतर परमात्मा । *गुह्यांत गुह्यतम स्वात्मा* ॥
चिदानंद स्वरूपात्मा । सेवकाची माता ॥ ७ ॥

## ५१७. कृष्णप्रेम ( गौळण )

*जाऊं दे मजला रे यदुवरा ॥ ध्रु० ॥*
दहीं दूध लोणी, घेऊनि जातें ।

मथुरेंत विकुनी, झडकरी येतें ॥ कान्हा ॥ १ ॥
सासुरवासी, सासु सासरा । रागें भरती, मजला नवरा ॥ कृष्णा ॥२॥
गेलीस कोठें,उशीर कां झाला । वाटेंत चोरटा,तुजसी भेटला ॥नाथा॥३॥
कोंडून घालती, मारहि देती ।
कोणास सांगूं, माझी फजीती ॥ गोपाला ॥ ४ ॥
कृष्णावरती, प्रेम कशाला । ओढून नेसी, माझ्या मनाला ॥ मोहना ॥५॥
विमल प्रेमासी, भयचि कशाचें ।
प्रेमास्पदचि, स्वरूप साचें ॥ प्रभुवरा ॥ ६ ॥
सर्वांतर्यामीं, खेळ खेळसी ।
सेवक कल्याण, सर्वत्र होसी ॥ गुरुवरा ॥ ७ ॥

## ५१८. पारतंत्र्य हा नरक

मीन तरी बरा स्वतंत्र विहार । मानव साचार नाम मात्र ॥ १ ॥
नाममात्र होऊं नका मेषपात्र । होऊं या सत्पात्र नरवीर ॥ २ ॥
नरवीर राम नरवीर कृष्ण । नरवीर विष्ण ढळकची ॥ ३ ॥
ढळक टिळक लोकमान्य शिव । सेवक सजीव राम-कृष्ण ॥ ४ ॥

## ५१९. स्वातंत्र्य ' भिक्षां देहि 'नें मिळत नाहीं

मागितल्या राज्य नाहीं कोणी देत । नाहीं कां प्रचीत अद्यापीही ॥ १ ॥
राजनीती ऐसी साम दाम दंड । भेदनीति बंड करिताती ॥ २ ॥
करिताती सदा आम्हांमधें भेद । भोगिती आनंद रक्ततोंडे ॥ ३ ॥
रक्ततोंडे सज्ज माकाडासारिखे । स्वार्थासी पारिखे कैसे होती ॥ ४ ॥
सभा संमेलनें दरबारें कांहीं । हातां आलें नाहीं किंचितही ॥ ५ ॥
मतें आणि पक्ष वाढलेत मात्र । जनता अरध ग्रस्त फार ॥ ६ ॥
पारतंत्र्य दुःख सर्वविध जाच । नको नको साच ऐक्य करूं ॥ ७ ॥
स्वातंत्र्यार्थ ऐक्य मराया तयार । सेवक साचार निश्चयेंसें ॥ ८ ॥

## ५२०. स्वातंत्र्यासाठीं मरणास तयार व्हा

शृंखला तोडाया सिद्ध कां न होता। मरणासी भीतां नच चुके ॥ १॥
मारावें तरीच वांचावें जीवेंसी। कृष्ण अर्जुनासी काय सांगे ॥ २॥
युद्ध करी पार्था युध्यस्व भारत। आत्मा न मरत कदा काळीं ॥ ३॥
आत्मज्ञान जाणा कार्यप्रवर्तक। विनवी सेवक 'गीता पहा' ॥ ४॥

## ५२१. सुराज्याहून स्वराज्य श्रेष्ठ

जरी असलें सुराज्य। तरी सर न स्वराज्य ॥ १॥
दायी करिते पालन। कैसी आई ती समान ॥ २॥
जरी झाला अन्नदाता। परि काय तो हो पिता ॥ ३॥
जननी ही जन्मभूमी। स्वर्गाहूनि थोर नामी ॥ ४॥
करा स्वतंत्र विवेक। म्हणे कल्याण-सेवक ॥ ५॥

## ५२२. स्वराज्य हवें, केवळ सुराज्य नको

परकीय तें सुराज्य। नको, मिळवा स्वराज्य ॥ १॥
नसो स्वराज्य सुराज्य। परि आपलेंचि राज्य ॥ २॥
जरी कुरूप जननी। बाळकासी प्रीत मनीं ॥ ३॥
रामराज्य शिवराज्य। शिवकल्याण हो राज्य ॥ ४॥
राम-दास्य महा राज्य। सेवकासी साम्राज्य ॥ ५॥

## ५२३. शठं प्रति शाठ्यम्।

नाततायी वधें दोष होत कांहीं। मनुस्मृति पाहीं सांगतसे ॥ १॥
आग लावणार वीष घालणार। शस्त्र धरणार धनहर्ता ॥ २॥
क्षेत्र अपहर्ता दारा हरणार। सहा हे साचार आततायी ॥ ३॥
गुरु बाल वृद्ध द्विज बहुश्रुता। आततायी होता हन्यादेव ॥ ४॥
'अहिंसा परम धर्म आहे ना हो। हिंसाकर्म कां हो सांगतसां' ॥ ५॥
हिंसा न च होय आततायी वधें। इतरांच्या वधें खास होय ॥ ६॥
दुष्टनिर्दाळण शिष्टांचें पालन। हाचि धर्म जाण सेवकाचा ॥ ७॥

## ५२४. कर्मयोगी जर्मन -आर्य

जर्मन म्हणती 'आम्ही आर्यपुत्र'। आर्यचि सर्वच आर्यावर्ती॥१॥
आर्यावर्ती आम्हां अत्यंत जवळ। विचार सोज्वळ शुद्ध पाही॥२॥
शुद्ध पाही मन कर्मयोगी सारे। जर्मन विचारें सर्वोत्कृष्ट॥३॥
सर्वोत्कृष्ट बुद्धि सूक्ष्म संशोधन। सदा सर्व मन कार्यावरी॥४॥
कार्यावरी मन कार्यचि केवळ। सेवक उजळ आर्यश्रेष्ठ॥५॥

## ५२५. मतमतांतरें सोडा, हितार्थ दीर्घोद्योग करा

आपण जर्मन आर्य बांधवचि। कर्मयोगी साची बुद्धि आम्हां॥१॥
बुद्धिनें सहाय्य एकमेकां करा। दीर्घोद्योग बरा हितार्थचि॥२॥
हितार्थ सर्वांचा सद्गुण पाहून। शत्रु मित्र जाण एकरूप॥३॥
एक देव पूर्ण विश्व सारें आस। मतांतरें व्याप्त होऊं नका॥४॥
होऊं नका मंद, कर्तव्यतत्पर। सेवक साचार सुख पूर्ण॥५॥

नमः पार्वतीपते हर हर महादेव।
सीताकांतस्मरण जय जय राम।
श्रीमच्छंकराचार्यमहाराज की जय।
पुंडलीक वरद हरि विठ्ठल।
श्रीज्ञानदेव तुकाराम।
जय जय रघवीर समर्थ।
श्रीगुरुदेव दत्त।
बजरंग बली की जय।
॥ॐतत्सत्॥


समाप्त

# श्रीअभंगवाणी सूचि

## ( आंकडा अभंगक्रमांक )


ॐ

ॐ नमोजी आद्या ४७८

संस्कृत

अयोध्यानगरे २
असारे संसारे १४
दुर्लभ मानव १६
निःसारविषयसेवनं ५८
वीरासनासीनं ३

अ

अचक्षुसी मन ९८
अचिंत्य अखंड ४२६
अच्युत मी अनंत ३५८
अद्वैती भजन २९६
अधर्म वाढला ४६५
अधिष्ठान सर्व ६६
अनन्य भावानें १७५
अनेक पदार्थ ३७७
अपरोक्ष पूर्ण ३४६
अयोध्या पढरी १९६
अर्थ ओढाताण ४५४
,, काम यांचा १२
अर्हत म्हणतो ४१२
अहंकार वृथा ५४
अहं सोहं गेलें ३३६
अहिंसा परम ५०४
अतर्ग्राह्य पूर्ण ९४
,, भेद ३७९
अत्यजाचें पोर ४८३
अधार आदित्या ११०

– आ –

आई आई आई ४८७
आकाशाहून मी ३८२
आक्रमण सर्व ४९०
आंगी लावी नाना १२४
आचरण नाहीं ३७
आचार्य अनेक ४५६
आजवरी कोणा २४१
आज सुदीन पर्वणी ४३
आंतरिक मक्ति २७३
आतां काय त्याचें ४७५
,, कोठें जावें ९६
,, ,, जासी ३४९
आत्ललामाहून १९
,, विश्वासचि ११९
आत्मा परिपूर्ण ९५
,, पूर्ण एक २७४
,, दिव्य तेजें ३४२
,, मी सर्वत्र ४२५

आत्मा राम माझा १३५
„ हा समजे १९७
आनदी आनद ३६३
आपण जर्मन ५२५
आपुल मुकृत ५२
आब्रह्म स्तवात ४३४
आम्ही विठ्ठलाचे १०१
आलों होता सत्त्व ४६४
आश्चर्य जहालें ८८५
आश्चर्य दाटलें १६२
आसक्ति रहित १२९

– इ –

इच्छा ऽ निच्छा नाहीं ३५१
इच्छू नको मान ५१
इतिहास सागे ४९९
इद्रियें चैतन्य ४०७

– उ –

उघडल बोध भाडार १६७
उत्कट ही भक्ति ४४५
उठानिया नाथ ४८०

– ए –

एक गीता मूळ ४५१
एकनाथ जाता १२३
एकरूप स्वार्थ २२४
एकलेंचि यावें ८४
एकवार प्रभु ३१६
एकादशी मन ३२४
एको एक बोल ३५०

– ऐ –

ऐसें कैस हो ५५

– क –

कनक काता कीर्ति २४
कयाधूचे पोटीं ४६३
कारेलात पूजा ३७४
करीं धरिलेंस धनु ३१५
कर्मठ करिती ४४२
कर्म आचरावें ४५३
„ भक्ति ज्ञानधर्म ३७१
„ „ „ श्री ८१
कल्पतरु गुरु २०५
कशाचें तें काय २९
कशाला कोप हृदयात २८
काम अभिलापें १७६
„ लोभाधारें २१
काय उणे भक्ता साग १५२
काय करू म्हणे १७४
„ „ रामा ३०६
काय सागू नाथा ४८२
काया वाराणसी ३००
कार्य करी सर्व ३६४
कार्यक्रम काहीं ३६६
कासया फिराव ८८
काहीं करार साधन २७८
„ करी रामा माझें १९०
„ नाहीं एक पाही ९८
„ „ राम एक ३६१

काँहीं नाहीं रामा वांचोनिया ४२०
कीर्तनाचें वेड देवा १८७
केवळ देऊळीं देव ५६
कैंची जावा कैंची ७
कोठील तू कोण ५७
कोण आहे रामा १३२
,, ऐसा जया ४९२
,, मी कोठील ३०८
कोणी एका काळीं ६
को ऽ हृ गेलें अहृ ३२८
कौसल्येचा बाळ राम २९४

– ख –

खरी भक्ति साक्षात् ३०३

– ग –

गरीब ब्राह्मण ४७९
गिरीजाबाई वाढे ४८१
गीतेचो जपती ४५५
गीतेची शिकवण २५०
गीतेच्या अर्थासी ४५४
गुण गाईं वाचें २८१
,, नाहीं दोप ६७
गुरुकृपें पूर्ण २१५
,, ,, ब्रह्म० ३५७
,, पद पूजुं ४८
,, परमात्मा २०३
,, सतराजा २०६
गुह्य बुद्धि गुप्त ५०७
गुळा कैसें पाठ ४२३
गूळ दिसे परी १७३
गेलें मी तू पण ३५२
गंगा गोदा कृष्णा ३८०
गोकुळचा चोर कान्हा ५१५
गोकुळचा चोर कान्हा ५१६

– घ –

घातकी असोनी ११७
घेई लुटोनि १२८
घेऊनियां तीर्थ ३९४

– च –

चराचर जग ४२२
चार वेद सद्दा २३५
चार्वाक दुसरें ४०६
चार्वाक नास्तिक ४४१
चार्वाक मतानें ४०५
चालते बोलते जनीं ९२
चालते बोलते पर २०७
चिंताग्रस्त कां २४५
चित्त नाहीं वित्तीं ४५
चित्त शुद्ध तरी ५९
चिद्रूप हा आत्मा ४२९
चोर धन लुटे जरी १२५
चंदन आगरूं ३८६

– ज –

जगदेश्वरी मा १०१
जग नग जीव ४६०
जड जीवा नाम ३६७
जन्म जरा मृत्यु ३४४

जन्मा आल्यिाचें क १७
जन्मा आलियाचें जा. १८
जन्माचं देईन मोल ३१३
जय जय राम ३३३
जर्मन म्हणती ५२४
जरी असलें सुराज्य ५२१
जल्पती साधन क. २७६
जाऊ दे मजला ५१७
जाऊ नेदी क्षण २८४
जाऊ शरण कोणाला २९१
जाणोनिया माझा ७५
जाता नये तूज ३३१
जाती कुल गोत्र ९
जातें जात नाहीं ४३१
जिकडे तिकडे आत्म० ३४७
जीवाचें जीवन ३५५
जैमिनीय मत ४१७
जैस वाचे बोले १२०
ज्याचे मुखीं राम २४३
– झ –
झालें माझें लग्न ३६५
– ड –
डोळ्यानीं पहावें १८९
– त –
तप करी परी ३४५
तात्काळ श्रीहरि १४६
तांबूल चर्वण ३८८
तिन्ही भूमिका ४८८
तेरावे अध्यायीं ४५८
तोचि साधु खरा १३०
त्यागूं काय भोगूं ३३५
त्रिपुर सुदरी १००
त्रिभुवनीं मज ४५९
त्रैलोक्य श्रीमत १०४
– थ –
थोताड पापाड ३८
थोर कधीं करी १०९
– द –
दया कृपा स्नेह १७९
दर्शनाची आस २४८
दान तेंचि जाणा ४६
दासबोध आत्माराम ५१०
दासाचा सांभाळ ५०६
दिगबर वस्त्र ३८१
दीनदयाघन ३०७
दुःख देऊ नये ५३
दु खाचा संसर्ग ४३५
दु:खें होती वारवार २८८
देऊ काय तुज ४७
देव कोण कैसा ७३
देव देवपण १५८
देव धर्म नाहीं ३७२
देव भक्त एक ४२८
देव भक्त अर्की १६०
देव भक्तासवें ३३०
देव मीच भक्त १४४
देवापाशीं भेद ४६७

देह आत्मा किंवा ३५
देहमान हारपलें २५२
देहशुद्धि माझी ३४८
देहानें घडावें ३०१
दोन बाहु दोन २११
द्रव्य दारा त्याग ४१
द्वैताद्वैतातीत ६५
– ध –
धन्य तो सखारीं २२८
धन्य त्याची माता ४८८
धर्म अर्थ काम ४४०
धातु पाषाणाचा ६२
धाव पाव सीता ३१८
धाव सीतारामा ३१०
धावला पावला १५१
ध्यान करूं जाता ४८९
ध्यावा एक सीतापती ८
– न –
नका करू खटपट ५०९
नको नको दुष्ट० ३९
नको मायेचा तो १०
नको योग याग २१८
नको वाव सद्यासी ३६
नमन करावें कोणाला ३९३
नमिता गणेश १
नरदेहाचें सार्थक १८४
नवरा न वरा २५
नवरा मारिला ४२
नहो दु ख कोणा ४३९
नाततायी वधें दोष ५२३
नाम घ्यारे राघोबाचें २१९
नामदेव एकनाथ २४६
नामस्मरण नोहे २३९
नाम हेंचि शस्त्र २५३
नामाचा महिमा २२२
नामाचें माहात्म्य २२७
नारद पुसती देवा ५००
नारळ अर्पोनी ३९०
नाशिवत देही १३
नाहीं तें धरून ४२१
नाहीं नाहीं मज ३५९
नाहीं नाहीं येणें ३२७
नाहीं रूप रामा ७१
नित्य गुरुसेवा २०८
नित्य राम नामें २५१
नित्य शुद्ध बुद्ध २०१
नित्य सत्य शुद्ध ६०
निर्गुण निर्वाण ३८५
निर्भय निवर ११६
निवृत्ति ज्ञानोबा ४७८
निश्चल निरस ३९१
निष्काम कर्मानें १७२
नेते राज्यकर्ते ४९५
नैवेद्य निलची ३८७
नोळखावें मज ५०
न्यायालयीं जाती याते ४९३

राम माता राम २८९
,, सर्व भूतातरीं ९३
रामाचा सेवक राम १३९
रामाचें भजन ३०२
रामा धाव आता ३२१
रामानुज मतें तीन ४१३
रामाविण नाहीं ३२९
,, नित्य १८१
रामीं मन रमें २७९
रेडा वेद चोले ४७०

— ल —

लोकाचिये दृष्टीं १३७
लौकिकाकरिता २५५

— व —

वदा रे सदैव श्री २४०
वना जाऊनिया ८९
वर्तमान भूत २६९
वाढे शाति जों जों १२७
वासुदव हरि स १४९
वासनारहित ३८३
विचारी आईस ४८८
विना साधुदर्शन २०२
विलासी जीवन २०
विवक विराग ३४१
,, सद्गुरु १८०
विश्व दु ख नष्ट २२९
विषयाचा अभिलाष २३
विषयीं विरक्ति १९८
,, हो नाहीं ५
वृत्ति ही निमता १९१
वेडे केलें मज १३४
वेद प्रतिपाद्य १९३
,, श्रुति स्मृति २३३
वेदाचें जें गुह्य ९९
वेदान्त श्रवण २६
वेदामध्यें स्पष्ट २३४
वैदिक पडीत ४
वैभाषिक म्हणे ४११
वैशेषिक गौतमीय ४१५
व्यक्ति मनोभाव ११४

— श —

शक्ति युक्ति भक्ति १६६
शतगुणें जाच ५०८
शब्द स्पर्श रूप ४६१
शरणागतीविण २९०
शस्त्रमार मारी १५७
शास्त्रग्रथाभ्यास ४४४
शृखला तोडाया ५२०
श्रीराम आनद १५५
,, दर्शन ३३३
,, भावना १२१
,, माऊली १६१
,, व्यापक ७१
,, सवका २९५
श्रीरामाचा दास १४२
श्रीरामाचे घरी २८३
श्रीरामा निष्ठुर ३२०
श्रीरामें दाविलें १६५

श्रीहरि हरण ३३६
श्वेतद्वीपीं जाई ६०१

— स —

सकाम निषिद्ध ४३८
सगुण कीर्तनें १८५
सगुण निर्गुण १९२
सच्चित्सुख मज ४०१
सच्चित्सुखानंद ३१४
सच्छास्त्रश्रवण १७१
सज्जनसंगती ४५०
सत्य ज्ञानानंत वे ८०
,, ,, ब्रह्म ७४
,, ,, ,, चि ७८
सत्याचा आग्रह ११५
सदा ध्यान ध्यातृ ३७०
सद्गुरुकृपेनें २१६
,, चरण २०४
सद्गुरूच ध्यान २१३
सद्गुरु मुखीच २०९
,, श्रीराम ७२
,, सारिखा २१०
,, सी मार्वे २१२
सन्मान साकडें ४९
सप्तभूमिका ज्ञा० ४४७
समर्था मी तुझा २९३
सर्व कर्म ब्रह्म ३६८
,, कामनांचा २७१
सर्व काहीं एक ३३९
सर्व काहीं पाहे ३६२
,, गत सर्व १०६
,, धर्मत्याग ४६२
,, भावें दास १६३
,, माझ ,, ४४९
,, मीच माझी १४५
सर्वांग धरारे ४८६
सर्वां तारी राम २४७
,, धारा मज ४००
,, भूतीं वासुदेव ११३
,, ,, ,, २८०
सहज सुखाब्धि ३१५
साखळी दिकण्या ४९७
सांख्यमतें जीव ४१६
साधूच्या दर्शनें २६६
साधुमाहिमान २६०
सापडेसा नोहे ७०
सारभोक्ते सार ३२
साराचेंहि सार २२५
सावळ स्वरूप ७६
साक्षात्कारमार्ग ५०३
सिंधु तरवेल २६७
सीताराम दास १४१
,, ध्यानीं २९७
,, माझी १३८
,, वेई यई ३१८
,, सर्व ८२
सीतारामा तुज १३२
,, नेट ३१९

सुखप्राप्ति दु ख २३७
सुखाचें साधन ४३३
सुवर्ण पुष्पाची ३८९
सूर्याचा स्वभाव ४०
सूर्याचे प्रकाशें २३१
सृष्टिपूर्वी नाहीं ८७
सेवा अगम्य यो २४४
सोडुनिया अभि ३१
सोवळ ओवळें ५११
सौत्रांतिक म्हणे ४१०
सत कैसा ओळ ३०
,, पायीं दृढ २६४
,, मन बुद्धि १०४
सत सगाविण २६१
,, सग जोडे २६२
,, सम बुद्धि १०३
,, ज्ञानदेव ४६६
सता सर्वभाव १९९
सदेहानें नेलें २७२
संपूर्ण व्यापक १५६
ससाराचे पायीं १५
ससारीं असोनी २५६
,, आम्हासी ३७३
सस्कृत भारती ५१४
स्नान सध्या पूजा २२३
स्नाना गगा जाता १४३
स्पर्शता विटाळें ५१२
स्वयज्योति तीर्थ १९४
,, पूर्ण ४०३
स्वयज्योति राम ३८६
स्वात्मपूजा करी ३९६
स्वात्मानद विश्वा ४०२
स्वानद समुद्रा २९९
स्वार्थ परमार्थ ११२

— ह —

हरि नाम घेतो २७
,, ,, हरि २१७
हिंदूचें जीवन ४९६
हृदय कमलीं २८७
,, मदिरीं ३२३
हेंकाड पिसाट १२६
होय निर्मूलचि १७७

— ज्ञ —

ज्ञानदेव माझा ४७१
,, ज्ञान ४६९
,, ज्ञानी ४७८
ज्ञान ध्यान मूळ २६३
,, परिपूर्ण १११
,, राज योगी ४७७
,, सूर्य तेज २२०
,, बाजारात २००
ज्ञानिया वरिष्ठ ४७३
ज्ञानेश्वर नामदेव २३८
,, ज्ञानदेव ३३७
ज्ञानैश्वर्य बल ७७
ज्ञानोबा माऊली ४७२
,, ज्ञानोबा ४६८

(१२) भक्तिमाला पुष्पांच्या विक्रीतून छपाई, कागद, जाहिरात, कमिशन आदि खर्च वजा जाता जर काही शिल्लक राहू लागली तर याहिपेक्षा पुढील किंमती कमी करण्यात येतील.

तरी सर्वांनी त्वरित पत्रव्यवहार करावा.

अध्यक्ष — आचार्य भजनी मडळ, संकेश्वर ( बेळगाव )

टीप — वर्षप्रतिपदेच्या ( पाडव्याच्या ) दिवशी ( २८।३।६० ).

( १ ) पुष्पाचे एक श्रीरामभक्त १०१ रुपये देऊन भक्तिमाला पुष्पाचे 'भक्त' बनले आहेत.

---

# शब्दकोश



(खालील शब्द अनेक अभगांत आढळतील. उदाहरणार्थ म्हणून अभगाचा आंकडा दिलेला आहे मात्र विशिष्ट अर्थ त्याच अभगांत आढळेल.)
(संस्कृत अभग २, ३, १४, १६, ५८ व २३२)

– अ –

१६ अक्षर – अविनाशी.
३ अचिंत्य – कल्पनातीत.
१६ अमल – निर्दोष, मलरहित
३ अमित – पुष्कळ, अतिशय.
५८ अवेद्य – न समजणारें, समजण्यास कठीण
१४ अव्यक्त – अज्ञात, अदृश्य, अस्पष्ट.
१४ असारे – नाशिवंत, साररहित.

– उ –

२३२ उपास्व – उपासना कर.

– ग –

५८ गूढ – गुप्त, अदृश्य

– च –

३ चाप – बाण.
२३२ चारु – सुंदर, मनोहर.

– द –

२३२ दधाति – देतो.

– न –

२ निर्वाण – मोक्ष.

– प –

३ पौलस्त्यसूदन – रावणाचा नाश करणारा, श्रीराम, (पौलस्त्य – रावण; सूदन – मारणारा.)
१६ प्राप्येह (प्राप्य + इह) – येथें प्राप्त होऊन.

– भ –

२३२ भूरि – पुष्कळ, अति.

– म –

२३२ मनामहे – आम्ही मानतो.
१६ मास्तु (मा + अस्तु) – नको (आहे)

– व –

१४ वाचातीतं – शब्दांनं-वाचेने न, न सांगतां येणारें
५४ विहाय – सोडून, टाकून.
१६ व्यापक – सर्वत्र असणारें.

– श –

२ श्यामल – घनश्याम, मेघश्याम, सावळा (राम), श्रीराम

– स –

२ समासीन – बसलेला

– अ –

१४ अकल – भागरहित, कलारहित ब्रह्म

१४ अखंड – पूर्ण, त्रिविध परिच्छेद-शून्य

३८६ अगरू – सुगंधी पदार्थ

९० अगोचर – दृष्टीस न दिसणारें, आकलन न होणारें

३५८ अग्राह्य – घेता अगर जाणता न येण्याजोगा, ब्रह्म

३०८ अचल – स्थिर, निश्चल, ब्रह्म.

६८ अचक्षु – नेत्रहीन, अवयवरहित,

१४ अचिंत्य – कल्पनातीत, ब्रह्म

९४ अच्युत – अविनाशी, ब्रह्म

४२६ अजर – जरा म्हातारपण-रहित, अक्षय्य, ब्रह्म

२७१ अट्टाहास – आग्रह, हट्ट, चळेंच

२३५ अठरा – पुराणें

२१२ अडे – आडवे येणें, विघ्न करणें, अडविणे

[1]९७ अणु – यत्किंचित्, किमपि, अत्यल्प, अतक, अतर्क्य – तर्कातीत, अनुमानातीत

३३४ अतीत – दूर गेलेला

२३ अत्र – येथें, या जगात

४२६ – अदीर्घ – लांब किंवा विस्तृत नव्हे

२० अद्वय – एक, अद्वितीय, ब्रह्म.

३०८ अद्वैत – द्वैतरहित, अद्वितीय, ब्रह्म

८४ अधिष्ठान – आधार, आश्रय

४०८ अध्यस्त – आरोपित केलेलें, मानलेलं

१८४ अध्यात्म – वेदान्त

४२० अध्यारोप – नसत्या गुणाचा-धर्माचा आरोप (रज्जु-सर्प, दोरी-साप)

४२६ अनणु – अणु लहान नव्हे तें

१४९ अनन्य – एकविध, पूर्ण, एकनिष्ठ

३०८ अनादि – आदि-आरंभ-उत्पत्तिरहित

४२ अनाम – नामरहित

४२६ अनामय – दुःखरहित, ब्रह्म.

८९ अनायासें – सहज, कष्टरहित

४ अनित्य – नाशिवत

४२६ अनिर्देश्य – अवर्णनीय

३३० अनिर्वाच्य – अनिर्वचनीय, अवर्णनीय, वाचातीत, परब्रह्म.

१९९ अनुदिन – नित्य, नहमीं, दररोज

३०८ अनत – अत – नाशरहित, परब्रह्म
८ अपरोक्ष – दृग्गोचर, जवळचा, प्रत्यक्ष
२६५ अपरपार – पुष्कळ, बहुविध, विविध
११२ अपवाद - दोष, आरोप, निंदा
१५७ अपाय – सकट, दु.ख, अरिष्ट
१६८ अपार – पार – अत ज्याचा समजत नाहीं असें, अमर्याद, अनत
४९२ अपाव – अपाय
४२६ अप्रतर्क्य – तर्कातीत
४२६ अप्रमेय – अपरिमित, पुष्कळ, दुर्ज्ञेय, अगाध
३० अबद्ध – पद्धतीला सोडून वागणारा
७१ अबला – स्त्री
२३ अभिलाष - प्रेम, उत्कट इच्छा
१६ अमल – निर्दोष, मलरहित
४२६ अमर – अविनाशी
१८९ अमाप – अपरिमित, पुष्कळ
३९९ अमाप – अमर्याद, ब्रह्म
१९ अमूप – पुष्कळ, भरपूर, पूर्ण, पार
१२ अरत्र – इहलोकीं, जगतीं
१३ अरूप – रूपरहित, आकार-रहित
३८६ अर्क – सूर्य (अद्वैतार्कोदय = अद्वैत + अर्क + उदय)
१०७ अर्चन – पूजा, सेवा, भक्ति
११ अर्थ - पैसा,धन, वित्त, सपत्ति
३७० अर्घ्य – सन्मान, हस्तोदक
४०८ अर्ध जरतीय - (न्याय) एखाद्या बाबतींत अर्धे मान्य व अर्धे अमान्य असतें तेथें हा न्याय
४१२ अर्हत – जैन मत, जैन देव
४२६ अलक्षण - चिन्हरहित, अतर्क्य.
४२६ अलक्ष्य - दुर्ज्ञेय, अनुमानातीत
४१२ अवगम – जवळ जाणें, प्राप्त होणें
४६ अवदान – आहुती
७८ अवधूत – विरक्त, 'अक्षरत्वात् वरेण्यत्वात् धूतसंसारबंधनात् । तत्त्वमस्यादिलक्ष्यत्वात् अवधूत इतीर्यते ॥ १ ॥ – अवधूतोपनिषत्
२११ अवलोकणें – पाहणें
१६१ अवीट – वीट – कटाळारहित
४२१ अविद्या – माया, अज्ञान
५८ अवद्य – न समजणारें, समजण्यास – जाणण्यास कठीण
१४ अव्यक्त - अज्ञात, अदृश्य, अस्पष्ट
२० अव्यय – अविनाशी
२७ अशेष – पूर्ण, नि शेष, सपूर्ण.
३६७ अध – पाप

१६६ आष्टांगसाधन (अभ्यास) – यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, समाधि.
३३८ अष्टसात्त्विकभाव - कंप, रोमांच, स्फुरण, प्रेमाश्रु, स्वेद, हास्य, लास्य, (हावभाव, नर्तन) व गायन.
११२ असत – असून.
१४ असार – सारहीन, नाशिवंत.
१७४ असिजे – आहे.
४४७ असंसक्ति – आसक्तिरहितत्व, आसक्ति - संसक्ति सुटलेला.
३५८ असंग – अनासक्ति, संगरहित.
३४७ अस्त – अदृश्य.
१६५ अस्त – मावळणे.
४४ अस्थि – हाड.
४२६ अस्थूल – मोठें - लठ्ठ नव्हे तें, स्थूल देहविरहित.
३४२ अस्मिन् – यांत, ह्यांत.
१६७ अहं – मी.
९२ अहंता – मीपणा, अहकार.
१५ अहर्निश – अहोरात्र, रात्रंदिन, सदा.
५१६ अहेर करणें – मानानें देणे.
४२६ अन्ह्रस्व – ऱ्हस्व - थोडें नव्हे तें.
२८ अक्ष – डोळा.
१६ अक्षर – अविनाशी.
१६० अंक – मांडी.
४१४ अंकन - तप्तमुद्रा देणें, डाग देणें.
१९१ अंतर्यामि – हृदयांत, आंत.

– आ –

२३७ आगम – वेदशास्त्र.
८२ आगर – सांठा, ठिकाण, ठाव.
४०० आचमन – तळहातावरून पाणी पिणें.
१६२ आटाआटी – श्रम, खटपट.
२९९ आटापिटा – कष्ट, आदळआपट, कडकडाट.
११२ आड – विघ्न, विरोध, अटकाव.
१३३ आणीक – दुसरा, परका, आणखीन.
५२३ आततायी – महापराधी. आततायी ६ प्रकारचे असतात. आग लावणारा, विष घालणारा हत्यार उपसून मारण्यास येणारा, धन हरण करणारा, शेत – जमीन अपहार करणारा व स्त्री – पत्नी हरण करणारा. (अग्निदो गरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापहः। क्षेत्रदारापहर्ता च षडेते ह्याततायिनः॥)
३४४ आतळणें – प्राप्त होणे, मिळणें.
१९४ आत्मवस्तु – परब्रह्म, परमात्मा.
२७३ आंतरिक – खरें, शुद्ध, अंतःकरणपासून.
२८६ आदळती – प्राप्त होती, येती.
१९५ आदित्य – सूर्य.

